॥ श्री ॥

भारत-इतिहास-संशोधक-मंडळ, पुणें

महाराष्ट्रीय सारस्वत

ग्रन्थ चवथा

# स्फुट प्रकरणें भाग २ रा

पृष्ठांक



हें पुस्तक धुळे येथे शंकर श्रीकृष्ण देव यांच्या **श्रीआत्माराम** छापखान्यात छापून, श्री. रा. खंडेराव चितामण मेहेंदळे, चिटणीस भा० इ० सं० मंडळ, पुणे यांनी पुणे येथे शनिवार पेठेत मंडळाचे कार्यालयात प्रसिद्ध केलें

**वैशाख शके १८३७**

**किंमत बारा आणे**

भारत-इतिहास-संशोधक-मंडळ, पुणें

विठलु गलंडो कृत

# रसरत्नदीपाचें मराठी रूपांतर

# विठ्ठल–गलंडो–कृत

# रसरत्नदीपाचें मराठी रूपांतर

## (सुमारें शक १३००)

१ काशीस पराडकर यांच्या संग्रहास हें बाड होतें. यांत रामदासकृत **रसरत्नदीप** नामक रसग्रंथाचे व इतर अनेक रसग्रंथांतील उताऱ्यांचें मराठी रूपान्तर विठ्ठल गलंडो यानें केलेलें दिलें आहे. रसरत्नदीपकार रामदास दिल्लीच्या उत्तरेस यमुनेच्या काठीं असलेल्य काष्टेन ऊर्फ काष्टा ऊर्फ काठा शहरचा रहाणार. ह्या रामदासानें रसरत्नदीपग्रंथाचा प्रारंभ येणेंप्रमाणें केला आहे.—

"ॐ नमो गणेशाय नमः ॥ शिवाय ॥ श्रीधन्वंतराय नमः ॥

प्रेंखालत्स्फुटनीलनीरजदलाद्वैतप्रतीतिप्रदा
दृष्टि र्दोष्णितमालिनीलिमगुणाद्वाहिण्यनंतस्य वः ॥
लक्ष्म्याः सास्तु सुखाय विदितवती या भाति नीलांबुद-
श्यामश्रीयमुनाप्रवाहजठरे लीलेव मीनांगता ॥ १ ॥
स भवति शिवतातिं र्धः शिवो यस्य कंठे
विलुलदलमूर्न्नि भाति सर्पाधिनाथः ॥
गलगरलसमुत्था कंदलीवस्त्रवन्हि
र्मुकुटमणिसुधांभो विंदुभि र्वर्धितांगी ॥ २ ॥
जयति विदितसारः सृष्टिविश्वोपकारः
प्रबलगदकुठारः संहिताकंठहारः ॥
सकलगुणसमाजः सिद्धविद्यानिकुंदः
त्रिपुरहर ++ ज स्तेजसंस्फारपुंजः ॥ ३ ॥
अस्ति प्रशस्ति रिव भूरि सुवर्णपूर्णा
काष्टेननामनगरी यमुनातटाके ॥
यस्यां नरेंद्रतिलको हरिचंद्रनामा
टंकान्वयैकमुकुरः क्षितिपो बभूव ॥ ४ ॥

यस्यात्मजः क्षितिपति र्जगतिप्रसिद्धः
साधारणो रणविनिर्जितशत्रुशेनः ॥
त्रिस्थानमार्ग मधिगम्य जगद्विरिंचै
र्भूतस्थितं च पुरवास्यकरोत्प्रसादात् ॥ ५ ॥
तस्यात्मजा स्त्रय इमे विदिता जयंति
ज्यायानयं समिति लक्षणसिंहनामा ॥
शत्रून्विजित्य कृतवान्रिपुकामिनीनां
वर्षा विलोचनयुगे हृदये निदाघं ॥ ६ ॥
श्रीमान्परः सहजपाल इति क्षितींद्रः
सोयं सुशीतलविलोचनकैरवाणां ॥
स्त्रीणां नृणां हृदयपंकजकर्णिकायां
तुल्यानुराग इव भाति गुणैः सदा यः ॥ ७ ॥
यत्कीर्त्तिकांतिविमलो वचसां विलासो
हारावलीव लुठति स्तुतिपाठकानां ॥
कंठेग्र वित्तधनिनां मदनो नरेंद्रा
लक्ष्मीविलासनिलयो बलिवद्वदान्यः ॥ ८ ॥
वंशेऽथ विश्वविदिते ++ रत्नपालः
प्रादुर्बभूव करुणा +++ लयेस्मिन् ॥
यस्मादभूत् सुतनयो विनयांबुराशिः
श्रीरामराज इति रम्यतया श्रिया च ॥ ९ ॥
साधारणक्षितिपतेः सुनियोगयोगात्
तं प्राप्य सेवकपदं स च रामराजः ॥
नानामयांधतमसप्रशमाय धन्वो
रम्यं करोति कुतुकात् रसरत्नदीपं ॥ १० ॥
दृष्ट्वैवं रससागरं शिवकृतं श्रीकाकचंडेश्वरी—
तंत्रं सूतमहोदधिं जलसुगंधाभोधि +++++ ॥
व्याडिं सुश्रुतसूत्र मीशहृदयं स्वछंदशक्त्यागमं
श्रीदामोदरवासुदेवभगवद्गोविंदनागार्जुनात् ॥ ११ ॥

वरील श्लोका वरून दिसतें कीं **रसरत्नदीपकार रामरा** याला **काष्टेन**–नगरच्या **टंकवंशीय साधारण** नृपतीचा आश्रय होत राजा **साधारण** याला (१) **लक्षणसिंह**, (२) **सहजपाल** व ( **मदनपाल** असे तीन पुत्र होते. त्याचा हि आश्रय रामराजाला होता. पै

मदनपाल हा शक १३०० च्या सुमारास काष्ठा ऊर्फ काढा येथें राज्य करीत होता, हें डॉक्टर भांडारकरांच्या इ. स. १८८३।१८८४ च्या रिपोर्टावरून दिसतें. अर्थात्, रसरत्नदीपकार **रामदास** शक १३०० च्या सुमारास झाला, ह्यांत संशय नाहीं. ह्या रसरत्नदीपाचें रूपान्तर **विठलु गलंडो** यानें मराठींत केलें. या रूपान्तराची भाषा ज्ञानेश्वरी भाषेच्या सारखी असून किंचित् तत्पश्चात्क आहे, परंतु एकनाथ व दासोपंत यांच्या भाषेच्या पूर्वींची आहे. या वरून असें ह्मणतां येतें कीं **विठलु गलंडो** शक १३०० पासून शक १४०० पर्यंतच्या काळांत केव्हां तरी होऊन गेला असावा. गलांडे हें आडनांव देशस्थ ब्राह्मणांत व ब्राह्मणेतरांत सध्यां आढळतें. तें शक १३०० तील गलंडो या शब्दाचा अपभ्रंश आहे. हा **विठलु गलंडो** काशीप्रांतांत शक १३०० च्या सुमारास रहात असावा व वैद्यकीचा धंदा करीत असावा. तेथें जवळच्या काढा गावांत रहाणाऱ्या **रामराजाचा रसरत्नदीप** त्याच्या दृष्टीस पडला असावा. विठलु गलंडो शक १३०० च्या सुमारास काशीप्रांतांत कसा, असा प्रश्न उद्भवतो. त्याचें समाधान येणें प्रमाणें. शक १२३९ त महाराष्ट्रांत मुसुलमानी अंमल झाला. मुसुलमानानीं त्यांच्या स्वभावानुरूप महाराष्ट्रांतील देवळें व राऊळें यांचा ध्वंस करून व धर्मादाय व ब्राह्मणवृत्या बंद करून, क्षेत्रें व नगरें उद्ध्वस्त केलीं. शक १३५० च्या सुमारास महाराष्ट्रांत एक हि हिंदू संस्थानिक, इनामदार, जहागीरदार, अग्रहारवाला, किंवा वृत्तिवाला राहिला नाहीं. अशा समयीं क्षेत्रोक्षेत्रींचे विद्वान् ब्राह्मण देशत्याग करून काशीवास पत्करते झाले. पुणतांबे, नाशिक, कऱ्हाड, नेवासें, पैठण, वगैरे क्षेत्रांतून विद्वान् ब्राह्मणकुलें वाराणसीस गेलीं. त्यांत च **गलंडो** याचे पूर्वज काशीप्रांतांत गेले. काशीस महाराष्ट्र-ब्राह्मणांची विशेष वस्ती त्या कालीं झाली. असें हि घडलें असल्याचा संभव आहे कीं रामराजाचा **रसरत्नदीप** काशीयात्रेस गेलेल्या महाराष्ट्र-ब्राह्मणांनीं आपल्या बरोबर परत येतांना महाराष्ट्रांत आणिला

**व तो महाराष्ट्रांत विठलु गलंडो** याच्या दृष्टीस पडला. **महाराष्ट्रांत रहाणाऱ्या** विठलु गलंडोनें रूपान्तरिलेला रसरत्नदीप काशीस जाणाऱ्या **यात्रेकरूंनीं** त्या पुण्यक्षेत्रास नेला व त्याच्या प्रती काशींतील **महाराष्ट्र–ब्राह्मणांनीं करून** घेतल्या. कोणता हि पक्ष स्वीकारिला तत्रापि एवढें **निश्चित आहे कीं** विठलु गलंडो हा शक १३०० पासून शक १४०० च्या मध्यंतरीं केव्हां तरी होऊन गेला. ह्या कालांतील चोंभा–कवि–कृत एक कृति प्रसिद्ध होऊन गेली आहे. चोंभा कवीची कृति पद्यात्मक होती. विठलु गलंडो ची ही कृति गद्यांत आहे. तात्पर्य, चोंभा व विठलु गलंडो यांच्या कृती प्रसिद्ध केल्यापासून शक १३०० पासून शक १४०० पर्यंत मराठी भाषेचें गद्य व पद्य रूप कसें असे तें समजण्यास मार्ग झाला. आतां इतकें खरें कीं नकलकारांनीं भाषा क्वचित् स्थलीं आधुनिक केलेली आहे. परंतु हीं आधुनिक स्थलें भाषेचा आस्थेवाईक अभ्यास करणाऱ्यांच्या सहज लक्ष्यांत येतील.

२ भारतेतिहाससंशोधकमंडळाच्या शक १८३५ च्या इतिवृत्ताच्या ७९ व्या पृष्ठावर गलंडसंहितेचा निर्देश केला आहे. त्या संहिताकार गलंडाहून प्रस्तुतचा हा विठलु गलंडो बहुशः भिन्न असावा. परंतु तो व हा एक च असण्याचा संभव नाहीं असें नाहीं. सुश्रुत, हारीत, यांच्या नंतर हरिमेखल, भेड, वृंद वगैरे संहिताकार झालेले आहेत व त्या सर्वांच्या शेवटीं गलंड झाला असें धरल्यास संहिताकार गलंड व विठलु गलंडो एक च असें कल्पिण्यास किंचित् वाव मिळतो.

३ विभक्तिप्रत्यय ह्मणून ज्या शब्दांस अलीकडील मराठी व्याकरणकार ह्मणतात ते ह्या ग्रंथांत तोडून लिहिले आहेत. ते शब्द विभक्तिप्रत्यय नसून स्वतंत्र अव्ययें व सर्वनामें आहेत. स, ला, तें, सिं, हीं अव्ययें आहेत. च ( चा–ची–चें ) हें सर्वनाम आहे. ह्या अव्ययां च्या व सर्वनामा च्या आधीं मराठींत शब्दांना विभक्तिकार्य होऊन गेलेलें असतें. उदाहरणार्थ राम शब्द घेतला, तर स, ला, तें, सिं, वगैरे अव्यया पूर्वीं राम या शब्दाचा रामा असा विकार आधीं

झालेला च असतो. येथें रामा हें विभक्तिरूप आहे व स, ला, तें, सिं, हीं तत्पश्चात् येणारीं अव्ययें आहेत. संस्कृतांतल्या प्रमाणें हुबे-हुब हा प्रकार होतो.

रामं प्रति = रामा तें
रामं परा = रामा ला
रामं सं = रामा स
रामेन समं = रामें सिं

येथें संस्कृतांत प्रति, परा, सं यांच्या पूर्वी शब्दांची द्वितीया होते असें समजतात. तो च प्रकार मराठींत हि अर्थात् होतो. स, ला, तें या कर्मप्रवचनीयां पूर्वी राम शब्दा ची रामा अशी द्वितीया होते. समं या अव्यया पूर्वी संस्कृतांत राम शब्दा ची तृतीया होते. तो च प्रकार जुन्या मराठींत होतो. सि या अव्यया पूर्वी राम शब्दाची जुन्या मराठींत रामें अशी तृतीया होते. रामें सिं या जुन्या प्रयोगाचा अपभ्रंश वर्तमान मराठींत रामा शीं असा होतो. तात्पर्य, स, ला, तें व सिं हीं अव्ययें आहेत व ह्यांच्या आधीं शब्दांना विभक्तिकार्य होऊन गेलेलें असतें. सबब, हीं अव्ययें प्रस्तुत जुन्या मराठी ग्रंथांत तोडून छापलीं आहेत.

४ तसें च, सर्व शब्दयोगी अव्ययें हि ह्या ग्रंथांत तोडून छापिलीं आहेत. जोडून आजपर्यंत तीं कां छापीत तें कळत नाहीं. च, हि, देखील, वगैरे हि अव्ययें मागील शब्दरूपांना जोडून छापण्याचा प्रघात दुष्ट च आहे.

५ प्रस्तुत ग्रंथांत प्रथम कांहीं विभक्त्या टिपांत स्पष्ट करून दाखविल्या आहेत. ज्यांना जास्त माहिती हवी असेल त्यांनीं मीं केलेले सुबंतविचारादि प्रबंध पहावे.

वि. का. राजवाडे

॥ श्रीगणेशायनमः ॥

सुमहूर्त्तीं चंद्रबलीं सरखली घालिजे । विहिसा हलदि । इटाली । जेणा ची मासि । या चे निर षोडसांसे घालूनि कांजिये मर्दिजे ऐसे दिन १ सम रसै मग थाल घालूनि हलु हलू रसु ( सुष ) धुइजे । मग कुवारि चित्रकु त्रिकटुक । त्रिफला निंबूरसे मर्दिजे दिन १ मग धूइजे । मग कांजिया मध्ये घेलिनि । डोलकायंत्री स्वेदिजे । तिया रसा चौथे नि भागे रेवीलें तांम्र घालिजे निंबूरसु घालूनि अवघे मर्दिजे लोणिया सारिखे तैसी पीठी होय । मडकीया चा बुढी ठेविजे सोधन जाले ॥

सपक्षीक दुसरा । माका मीठ । वाझ करटोली । ये णे स्वेदिजे स्थिरु होय । इति रससोधन ॥

कुसि वरी मडके दुधें भरीजे । तोंडी लोंबत लुगडे बांधौनि गंधक चूर्ण करुन घालिजे तेथे । वरि चाकी कलासीजे मडके काठ वरि भरिजे । पुट सेणी वीसा चे दीजे । तो दुधा माजि गलाला ॥ गंधक-शोधन ॥

कोहलेया चा रसु । चुना । तेल । या तूं शोधिला तालुकु ॥ तालुकूशोधन ॥

सावेरी चा रसु मनसीष शोधीली कैसी । देहे सुद्ध होय रसी घाली सुखें ॥ इति मनसीलशुद्धिः ॥

नरमूत्री नीच नवा दीस २१ पापरीया भीजावा शुद्ध होय ॥ सैंधव डहुलून उदकी हींगुल स्वेदीजे सुध होय ॥ ५ ॥

गोमूत्रा मधे दीस सात भीजे[५] घालिजे वीष सुध होय ॥ विष-शोधन ॥ ५ ॥

षापरी घालुनि ताविजे कृष्णाभ्रकु शुध होय ॥ ५ ॥

मग सालिफोतरे रगडीजे । होय धान्याभ्रकु । ते णे सी समु टंकणु धमिजे मुसे घालुनः ॥ मुस्ताक्वाथे गजपूटे दीजेः

---

१ खलुनि. २ षष्ठि. ३ चा=चआ=चा=च्या. चा चा उच्चार संस्कृतांतल्या प्रमाणें करावयाचा. ४ सप्तमीदर्शक अव्यय. ५ भीज या स्त्रीलिंगी शब्दाची दुसरी विभक्ति.

ति[1] सातः देउन अग्नि दी ( जे ) एणें निश्चंद्री अभ्रकु होय ॥
पारंबीरसे पुटीला[2] होइः । अलोहितु ॥ ७ ॥
दहीये प्रहरु १ मर्दिजे रात्री सेणी ५० साचे पुट दीजे या परी सोधिजे अभ्रकु ॥ ७ ॥ इति अभ्रकमारणं ॥ ७ ॥

कवडेसंषु मुक्ताफलें नोवूरसे धूइजेति सुध होती ॥ इति कवडे-मोतीसंषुसोधनं ॥ ७ ॥

टरल्डीं फेडिजेति उदकें कढीजेति जीभा कहाडीजेति ॥ जेपाल सुध होती ॥ ७ ॥
माक्षिकु नरमूत्रांतु । विमला—महीपी--मूत्रांतु । स्वेदिजे प्रहर ४ सुध होती ॥ ७ ॥

कुलीत—कढणा महुरीया हीरा स्वेदिजे प्रहर ४ सुध होय कुसरि काइसी वहुत ॥ ७ ॥
ढेकुणरक्तें माषुन वेला सात ताविजे उष्णी । बदरीकल्कें वेष्ठुनि गजपुट दीजेः ॥ ऐसी पुटें सात हीरा भस्म होय ॥ इति वज्रभस्म ॥ ७ ॥

ती वरसें पल्हें । कां नागवेली चें मूलें वाटुनि कांजिये गोला कीजे गजपुट दीजे हीरा भस्म होय ॥ इति हीरासोधन ॥ ७ ॥
ताड—निवोलिया रसी । वैक्रांत चिकु विझविती । ऐसी सुधि बोलिजति वँडीलीये[3] ग्रंथी ॥ ७ ॥

वाली उतराणी । तीया माकु विक्रांत सुनी दिजेति गजपुटे तीनी होय भस्म ॥ ७ ॥
येही रसी रसायने योजावीं हीरेया चे नि भावे अष्टगुण जाणावे ॥ ७ ॥
हीरेया चे चि ॥ ७ ॥ वैक्रांत सोधन ॥

गोमूत्र तैल तोक कांजी कुलीथकढण यां पाचा माझि वेला सात ताउ ताउ वीझवीजे ॥ सुध आठ लोहे ॥ ७ ॥
निंबूरसे मनसील नागपत्रा सि लेपु केला तीपुटी भस्म होइल ॥ काजला सारीपे ॥ ७ ॥

---

१ दीजे+ति=दीजेति. मध्ये दोन ग्रन्थ निरर्थक दिली आहेत. २ ( पुटणें ) पुटीला ह्मणजे पुट दिलेला. ३ वृद्ध, जुनाट.

नागभस्मे सी सरिसे सुवर्णरज कालवीजे नीबूरसे तीनि पुटी अनयासे होय भस्म ॥ ७ ॥

नीबुरसे माहापुटे देता नागु वीरे सुवर्ण भस्मा तें उरे ॥ योजिले रसी थोरे करी काज ॥ ७ ॥

नीबुरसे माक्षिकु मर्दुनि सोनियां कां रुपेया ची पत्रें लेपुनि दीजेति पुटे २ होइल भस्म ॥ ७३ ॥

नीबुरसे पारजे ताम्रपात्रा लेपु कीजे दुणा गंधकु देउनि घालिजे मडकेयाचा बुडी ॥ ७४ ॥

कलासुनि मीठ भरीजे काठ वरी ॥ पगती ठेवीजे वरी । पचिजे पाहार च्यारि ॥ मरैल ताम्र ॥ ७५ ॥

वांती भले ती बीरके वीण तांम्र होय नीके दीपन होय वीसेषे गुणा ते करी ॥ ७६ ॥

पांडु पित्ररोगु कवलु कुष्ट वातरक्तः फेडी ऐके गुजे कवलु ॥ इत्ती तांम्रभस्म ॥ ७ ॥ ७७ ॥

लाहान रेतीले तीपें । मर्दुनि त्रिफलोदकेः कुंभ पुटे तीस ऐके होइल भस्मः ॥ वारितरु ॥ ७८ ॥

प्रमेह ग्रहणी शूल काश्य क्रीमि पंडु कामला लोहो सेवीलेयां वाल दोनि दोनि वाल निवरावे हे दोष ॥ ७९ ॥

वचि । चा क्षारु का सेलीये ची लेंडी ऐसी कां तीला ची पेडी वंगभस्म कुंडी करीती यो ॥ ८० ॥ इति अष्टलोहो--मारण समाप्तं ॥ ७ ॥ ७ ॥

आतां असो हा षड्गुणा ।
कीजे गंधकजारणा ।
ते णे रसा होतील गुणा ।
असंक्षात ॥
ऐके मुसे उन्हा तीलेला ।
महुरसु घापे सोधिला ॥
एरी मुसे ५कला ।
गधकु घापे ॥ ८२ ॥

दोनी नीरूंधून मुसा माहुआ त्या मुसा दोन्ही निरुंधूनि कलासा विया गंधकु कोलिसा फुकिजे कोलिसा ढाले ढाले ॥ ८३ ॥

नलिये चे नि रंध्रे गंधकुधूम सचरे । रसा समु जीरे ऐकवीस वेलां ॥ ८४ ॥

या परी सां वेलां गधकु—जारणा केली ॥ तरि रोगा ची फुडी उमटे वेगां : ॥ ८५ ॥

शत भरि हंस—पदी—रसें गंधकु भाविला असे तो चि पुटी घापें रस मुसे तातलीये वरि ॥ ८६ ॥

ऐसा जारिजैल षड्गुणा । हे एक ऐक जारणा जालियां आवुली आण रोगा सि वाय ॥ ८७ ॥

आता जारणा ऐकि उमटली । कीजे गंधकु—पीठी । ते आतां परपाटी सांघै वैद्या सी ॥ ८८ ॥

तांभाणीं जोंधले इतुका रसु घापे गंधका किणु किणु घालूनि आटका मर्दिजे गाढें ॥ ८९ ॥

पुडती रसु पुडती गंधकु घालिजे स्तोकं स्तोके मर्दिजे पिंडु ऐकु पडे पीठी ॥ ९० ॥

हंसपदी का निंबूरसां पीठी मर्दुनि सम रसी वैद्ये रस-भस्म दोसे कीजे गोटी ॥ ९१ ॥

ऐसी करून गोटी घालीजे पणती संपुटी दुणा गंधकु देउन पुटीं भूधरिं पाचिजै ॥ ९२ ॥

तुरंगपुर प्रमाणे पुट गोवरिया चे जाणे । निवालिया दिडुपणे रापे चे चि ॥ ९३ ॥

वरि या चि परी एकदाटें । दिजेति सात पुटे । सकल लोहीत गोमटें रसभस्म होय ॥ ९४ ॥

ऐकि आपुलीया उपपती । हा चि रसु मुर्छीत्त करित्ती । ह्मणती जे उथापन अतिपातनायंत्रीं ॥ ९५ ॥

हा सेवीलेयां अनुपाने सी । भले तो ही रोगु नासी । गुंज मात्रा या सि जाणावी निरुती ॥ ९६ ॥

मेह क्षयो दीर्घज्वरु कासु स्वासु कृमि-विकार कृशत्व ज्वरु पांडु हे विसेषे फीटती जाण ॥ ९७ ॥

रसु ये णे योगें सी वरीसें सेविता मृत्या तें जीकेल। वार्धिक्य नासे नीकें : सा मासीं ॥ ९८ ॥ इति रसगंधकुजारणा समाप्त ।।४।।

आता कराविया मुसा का पुडती । आणिजे वावरुली ची मार्ती । तीये चतुर्थांसे घापती चीर्धांया कोलिसे ॥ ९९ ॥

ते आधी चांग कुटिजे । मग लिहीन वाटिजे । तिया कुपी लेपिजे सा सात वेला ॥ १०० ॥

तीये कुपिये आतु घालिजे सम गंधकु सूत । रसा चतुर्थां सीं निभ्रांतु घापे नवसादरु ॥ १ ॥

अलंदिया चा बुर्डी । डोलां पाडुनि ठेविजै निठाली । तेथ कुंसी वरी घाली लिहीन वालु ॥ २ ॥

मग क्रमवृधितु अग्नि प्रहर १२ करुन निवालियां । कुपी फोडूनि घेइजे । रसभस्म ॥ ३ ॥

हें एक कुंकुमपींजर । भस्म परि मागिला चे चि गुण मात्रा-महिमा परियेली । महिमा अती विना ॥ ४ ॥

वर्त्त जाणे कुपी चे तोड करीत जाइजे । अवघड इतुके नि नाही । अवघड कुपीये सि ॥ ५ ॥

वाकुडेया कांडेया चा निवडिंगु । आठ आंगुले तिया चा अग्नविभागु सेणें मातिया बोंबुनि चांगु अल्प पुट दीजे ॥ ६ ॥

तिया नि रसें सि रसु तीनि दीस असो दीजे । इतुके नि सुवर्णाचा ग्रासु दीधलीयां चरैल ॥ ७ ॥

मयूरा चें पित्ते सि रसेलें । चौदिया चे पत्र केलें तें षलिं रसा माझि मिलें मर्द्दना स्तव ॥ ८ ॥

तो रसु भुजपत्रा चां पुडां बाधौनि स्वेदिला फुडा । इतुके नि चडे येवडा । विस्मोदेषां ॥ ९ ॥

रसु चौसटीया चे नि भागे सोने पहीले चारावेः । लागें ॥ मग बत्तीसां चे नि सोला चे नि भागें चारिजे सुषें ॥ १० ॥

सोलावीया भागा अधिक ऐके वेलेन चोखे । कनकः । प्रति यासि राजिका मीठे मर्दिजे ॥ १ ॥

रसु ग्रासुनि कनक होय ॥ अर्धा सारिषे या चे भस्म सुलिका किजे ॥ १२ ॥

ऐसे नि करिती जारणा ।
पंति सास्त्रोक्त गुणं ।
केवला भितिवीजे वणा ।
पिके जवी ॥ १३ ॥

धातुजारणां न करीती रसु मारणें उचितिं । नव्हे हो सर्वथा दोषु लागे ॥ १४ ॥

सिद्धी न वचे उपाउ । नुरे आपुला ठाउ । श्री सिवे सीं द्रोह केला होय ॥ १५ ॥

परि एका चें मत मनोहर । गंधकी असे तांम्र : तें जारणा सर्वे करी रसु जीरे ॥ १६ ॥

दोष करी ते णें भजे । थोडें बहुत फल लाहिजे ह्मणौनि गंधके चि मारिजै । अजरी रसु ॥ १७ ॥

जितुके जारिजे रसु कौसल । तीतुकें सांघो सकल । तरि ग्रंथु थोरावेल न भरे हावे ॥ १८ ॥

असो हें मनी स्मरौनि श्रीगुरु ।
गलंडो विठलु चतुरु ।
रसु निफजवितां प्रकारु ।
निरुपिन ॥ १९ ॥

रसु गंधकु तांम्र तियड । कटुकी । कचोरा । पीपली । हिरडे या समग्रा सम जेपाळ ॥ २० ॥

मर्दिजे निब्रडींग—रसें । जवं अवघें सम रसें या नाम त्रैलो-क्यतापहर । या त्रैलोक्या सारिषे वोषद नाहीं ॥ २१ ॥

मात्रा वालु एकु या सि दीजे आर्द्रक रसें । का साकरे सी नवज्वरु पैजे सी भले तो फीटे ॥ २२ ॥

मुगभातु का ताकभातु भाजी चीली ताकवतु । हा पथ्या चा पंथु भले तीये ज्वरी ॥ २३ ॥ त्रैलोकयडंबरु तापहरण हा चि ॥ ५ ॥

निर्गुंडीरसें रसु गंधकु विष मर्दिजे प्रहरु दोनि एका निर्गुंडी-आलेया चे सप्तक भावना चें ॥ २४ ॥

मात्रा गुंज १ नवज्वरा तें सोषी । ऐथे दोष विसेषीं काज नाहीं॥२५॥

ताकभातु पथ्य दीजे। ताहाने ताक पाजिजे ॥ तेलें माथा मषिजे न्हाणिजे उष्णोदके ॥ २६ ॥

सर्वांगी लाविजे चंदन : फुलें वाजातुरें वजति पडे विजणा। तांबोल भक्षण क्रिजे सुषें ॥ १७ ॥ इति रसुचंडेस्वरु नाम रसु ॥ ५ ॥

तांम्ररसु गंधकु तियड त्रिकटुक। दाति हियावलि। वीष टंकण। कटुकी जेपाल ॥ १८ ॥

अवघीया समान। दाती—क्वाथे चांग लिहीन। निवडिंग-चिके मर्दुन प्रहर च्यारि। बोरा चे आठोलीये येवढी गोली दीजे मीरीयां सी। वडी तीव्र ज्वरा तें दवडी। भले तिया ॥ ३० ॥

सामु भावे निरामु ज्वरु—भावे विषमु। न यावा घामु फीटे वेगे ॥ ३१ ॥

ग्रहणी पांडु। सुलु। क्रमि उदर गुद। कल हे क्रमें नासेति सकल दोष ॥ ३२ ॥ इति विनोदविद्याधरु ॥ ५ ॥

सुवर्णभस्म : मोतीये। त्रिकटुक। हिंगुल। टंकणु विष। चित्रकु। रसे प्रहर दोनि मर्दिजे ॥ ३३ ॥

तो वाफे चुने नि लेपिला दृढे। येके कोंढला निरंधूनि सिवे पुटिला आलुमालु ॥ ३४ ॥

सर्व ज्वरु सन्निपातु ग्रहणी अतीसारु वातु। करी गुंजमात्रा ॥ ३५ ॥

रोगा ची अनुपाने वेगलालीं ॥ अथवा मधुपीपली। पथे दीजेति आपुलाले रोगानुरुपे ॥ ३६ ॥ इति त्रिभुवनकीर्त्ति नाम रसु ॥ ५ ॥

भाग दोनि सोधिला षापरिया भागु १ सोलिली मीरी। गाइ चे लोणिये कालउनियां। मर्दिजे चांग ॥ ३७ ॥

जव जाय लोणीयां चें चोपड—पण : तवं किजे निलुरसे मर्दन मात्रा वाल दोनि : अनुपान मधुपीपली ॥ ३८ ॥

तुटे ज्वरु धातुगतु। विषमु नासे अद्दतः भले तो ही रक्त-जानितु समे रोगु ॥ ३९ ॥

रक्तातीसारु रक्तपित्तः प्रदर अर्शा चे रगतः ग्रहणी भले तें पित्त : समे वेगां ॥ ४० ॥

अथ दुधभातु निसांक : कां पथ्य मधुर ताक । सालि चा भातु शाक पडवळें : तोंडोळें ॥ इति व्याधिगजकेसरी नाम रसु ॥ ४१ ॥

कलिलवी । पाहाड । घेटुलि । कडिसरा । देवडागरी । सकल हे रस : घेउनि मर्दिला रसु घेपे ॥ ४२ ॥

मग ऐही रसें रसु
स्वेदिजे ऐकु दीसु ।
मग त्रिगुणा मेळविजोसु ।
सोधिला गंधकु ॥ ४३ ॥

मग ब्रह्म मांडुकी सहदेवी । बांबि कासोदा । कलिलावी । धोतीरा । विष्णुक्रांता । आठवी कामोणीकाली ॥ ४४ ॥

यां चे नि रसे अटंक प्रहर आठ एक ते मर्दूनिः रस गंधकु किजे गोली ॥ ४५ ॥

तो घालूनि एके कोढलां पहर बारा वालुकायंत्रें पचिला ॥ जालेयां स्वांग-सीतल आलां पुट दीजे ॥ ४६ ॥

तिया सोलावे नि भागे त्रिकटुक टंकणु ॥ लागे मग षलिजे अवघें । भरीजै सेदे ॥ ४७ ॥

थाला अक्षतां चे अष्टदल कीजे । तेथे तेथे श्रीबुधु ह्मणौनि रसु पुजिजे । आटें दले अर्चिजे । लोकपाला तें ॥ ४८ ॥

मग तांबोलवना माझारि । दिजेति रसा वाल च्यारि । अनुपान ही कुसरी । केवल साषरा ॥ ४९ ॥

कुष्ट कृमि ने दीजे । एरि भले तिये रोगी दीजे । पण गुण लाहिजे । पाणीढाले ॥ ५० ॥

विषमु वाचुन ज्वरु ।
सन्निपातु घोरु ।
अजीर्ण सर्व्र अतिसारु ।
ग्रहणी ॥ ५१ ॥

क्षय गुल्म कास स्वासु । ए णे फीटेति सहसा रक्तपित्तः पांडु भरवासा प्राणेस्वरा चा ॥ ५२ ॥

पुडती उदैलीयां उपद्रवा । पाणीढोलु करावा । ते ण्हे उणिवा रोगा सि होय ॥ ५३ ॥

सदा तैल्यादि पित्तलें एकु मासु । इये रसी वर्जिजोसि ॥ एरवी गुणा चा भृंगु होयील रसा सि ॥ ५४ ॥ गणेस्वरु नाम रसु ॥ ७ ॥

रसभस्म हेमभस्म मोतीयेः रसा दुणो रसा चतुर्थांशे टंकणु । गंधकु सर्वा समु ॥ ५५ ॥

कांजी घालुनि कीजे गोळां । कापडमाती देउनी वाळविला । तो लवण भांडा पचिला । प्रहर च्यारि ॥ ५६ ॥

होय मृगांकरसु । क्षयरोगां करी नासु । अनुपाना मीरीये । बतीस मात्रा वालु च्यारि ॥ ५७ ॥

ना तरी दाहा पिपली मधुः अनुपानु विसेषु प्रसिद्ध । सेलीये चे कां गाइ चें दूध तुप ताक ॥ ५८ ॥

आलें सैंधव रुचती तें साक सिजती अहर्निश । एला मिरिये नावें घापे तुप ॥ ५९ ॥

कारलें वांगें बेल । कोहले कांजी तेल कडु चिंचा हें सकल वर्जिजे येथे ॥ ६० ॥

हा रसु ज्वरादिकां तें फेडी । कास स्वास धातुगता ते दवडी दीपना पुष्टि ची प्रौढी । दावी वेगां ॥ ६१ ॥ इति मृगांक नाम रसु ॥ ७ ॥

रसु मनसील तालकु तुथेः षापरिया माक्षिकु सातवां घालिजे गंधकु अवघी समे ॥ ६२ ॥

रसा चतुर्थांसे सुवर्ण-भस्म रुचिकें । मर्दिजे प्रथमेः सावेरी चित्रकः भृंगी नाम । आडुलिसा । पाहाड ॥ ६३ ॥

कलिलवी हे तिया या चा रसी मर्दुनियां मृगाका चिया परि । पचुनियां लवण भाडां ॥ ६४ ॥

आलेरसु त्रिकटुक यां चीया भावना सात सात प्रत्येक दीजेति । कनकसुंदर होय ॥ ६५ ॥

गुंजा २ मात्रा या रसा पवित्रा । सर्व रोगा ते हरिताः ॥ हा चि पेकु ॥ ६६ ॥

क्षयीं मधु पिपली सी दीजे । गुलमी शूली पांडुरोगी हीरडा कांजे पाले सी ढालावया । आरद्रकरसे सन्निपाती । ज्वरी

ते णे सी च देती । पथे पथ्ये चि स्थित्ति मृगांका चीया परी ॥ ६८ ॥ इति कनक-सुंदर नाम रसु ॥ ७ ॥

रसु भागु १ गंधकु १ भाग च्यारि कवडे । संषा टंकणुः तृतीयांसे आइका रसा चेनि ॥ ६९ ॥

दीनु १ मर्दुनियां किजे लाहान । कोंढता घालुनि । रुंधुन कीजे चांग राजहस्त षोलया चे गजपुट दीजे वल सेणी चें । निवालेयां तीया चे कीजे चूर्ण ॥ ७० ॥

मात्रा वाल दोनि । यांसि बतीस मीरीये तुपे सी । रक्त-पित्ति कुष्ठा वाचुनि रोगा सि करि नासु ॥ ७२ ॥

क्षयरोगी विसेषे बोलिलाः अनुपानु तुप पलः तुप-भातु दहीं-भातु । जेवील उत्ताणा भूमी निजे ॥ ७३ ॥

ऐसे दो प्रहरा चे नि अंतरे । पथ्य दूसरे तीसरे । तीही दिसा माजि सारी वमि षंरे । वरि लागला रेसु ॥ ७४ ॥

ना तरि पुडती दीज ये चि रसी । पहिलीये सप्तकी । रो-गिया सि पथ्य विसेषु ॥ ७५ ॥

लावेया चा रसु । मुगवातिया सूरण तुप सैंधवें सिजुनिया । एला मीरी जीरे । ताकवतु साकवत्तीया रुचिकरा । घेपति ॥ ७६ ॥

कफ-वाती उन्हक्षीर । खांती । निवालेया साकर राती चे ः आ-हारु ये पारि चे ः ॥ ७७ ॥

व्याली झालेया वरि संष भस्मा वाल दोनि । च्यारि वालु विजया तुपे सेवी जरि आरोग्य होय ॥ ७८ ॥

दुसरा सप्तकी मासे मीस ः केलें । कालें उस पाजिजे तुप ॥ ७९ ॥

तीसरा सप्तकी गोधूमचूर्ण उडीद या चे प्रकार । अमर्याद करुनि सेवी प्रसिद्ध उपचार हे ॥ ८० ॥

अंगोद्धर्त्तन कीजे ः साहे तैसे उदक घेइजे । भले तेये उ(प) द्रवी ः सेविजे तुपभातु ॥ ८१ ॥

उदेलियां वायो चे भरी । पोइ चा रसु घापे सीरी । अल्प मर्दन सरीरी कीजे तुपे ॥ ८२ ॥

अधी पीता चा ठाइं ः डहुलुनि देउली ची सुइ । पीयीजे उ-ठिला देही । साकर गुलवे-रसू ॥ ८३ ॥

श्लेष्मादिक-सेका पल ॥
मीरीयें भाजिजे केल ।
कनकबीयां स्थल ।
तु । पे दीजेति ॥ ८४ ॥

वाता सि गुलवेली—रसु मधु जरि दिसे क्रिमि चा वाधुः । अजमोदा विडिंगः मधु चाविजें जरि ॥ ८५ ॥

विरेक उदैला जरि तरि दीजे दहींये । पिचकुला दुधे तुपे नस्य घेनल ॥ जरी कपाल दुषेः ॥ ८६ ॥

आणिष होती उपद्रंव ॥ सहितेया उपचारु करावा । तिये लागि सेवा वैद्येचंद्रिके सी ॥ ८७ ॥

बाविसावां दीसी ।
तीलेले माझने तया सी ।
कुमरी-देव-द्विजा सी ।
किजे संतोषु ॥ ८८ ॥

वैद्या सि चांग पुजा किजे ।
आंगा सि दृष्टि पडो नेदिजे ।
सांडिले ते सेविजे ।
ढाले ढाले ॥ ॥ ८९ ॥

ग्रहणीये अतिसारी । हा चि रसु तुप मीरीये सी विजय. संष-भस्मे सीं या वरी तुपे दीजे ॥ ९० ॥

साकरुडुः षडी विजयाः नावेक जीरे घालुनियां । ऐसी चेया दहीयां सवे दीजे॥ ९१ ॥

ये लोकनाथी आदिदैवत :
तो पुजीजे रसु देतां ।
रस-सिधु त्वरिता ।
ततक्षणे लाभे ॥ ९२ ॥

इति लोकनाथ-पोटली ॥ ५ ॥

सुवर्ण मोतीयें भागु एकु ।
रसभस्मा चारि गंधकुः ॥
आठ आठ भागु । कवडे संषु
मर्दिजे ॥ चित्रकरसे ॥ ९३ ॥

ते णे दाहां दातीरियां चे कुरुगें । कवडे भरीजेति । पांच डोंघे । टकण कसी सातेर अवघेनि रुंधीजेति ॥ ९४ ॥

चुन्येन लेपिले लोटिगें । मागिलीये चि परी । गजपुटी पाकु कीजे । परिपाटी लोकनाथा चीया ॥ ९५ ॥

ते चि मात्रा उपचारु ।
सुवर्णबंधु हा लोकेस्वरु ।
ह्मणौनि गुणवंतु ।
मागिला पासुनियां ॥ ९६ ॥

॥ इति लोकेस्वरु नाम रसु ॥

रसभस्म । हेमभस्म । गंधकु । मोती । विष । कवडे । अभ्रकु । अवघीयां दुणा संखु । मेलविजे ॥ ९७ ॥

चित्रकु विजया-रसे मर्दिजे
तो गोला चुनेन लेपिजे ।
मृगांका चिया परी । पचीजे
लवण भांडा ॥ ९८ ॥

मग ते लोहपात्रीं । चित्रकरसे पचिजे घडीया च्यारि : सीसे । मग षलुनि पोटलीये ऐसे प्रयोजिजे ॥ ९९ ॥

वात श्लेष्मा तरि रोगी ।
मीरीयें तुपें देतां चांगी ।
पित्तप्रकोपा चां । लागी
मधु—पिपली ॥ १०० ॥

सर्व ग्रहणी सर्वातीसारी । समे मद्यसुल येरु मात्रा वालु । चमत्करु क्षया ते ही जीणे ॥ १ ॥

पथ्य तुप-दही भातु दीजे ।
रुचि मोडो नेदिजे ।
आतीरेकी चाटिजे ।
कुटजा आवले होय ॥ २ ॥

इति ग्रहणीकपाट नाम रसु ॥ ५ ॥

तीनि भाग पांच लवणे : । चिंचाक्षारु सवे निंबूरसु दुणा । डहुलुनि हे पूर्ण झोल किजे ॥ ३ ॥

तेथ संधु सात वेला
ताउ ताउ विझविला ।
तेयां भाग सोला ।
हिंगु भाग च्यारि ॥ ४ ॥

सूठि । मीरी । पीपली । हींगा बराबरी : रसु गंधकु विष घाली । एक एक भागु ॥ ५ ॥

वाल संष-वटिका । नासी सर्व शूल ग्रहणी । अजीर्ण अरुचि । विषुचिका अग्निमांद्य ॥ इति संषवटिका ॥ ६ ॥ ७ ॥

रसु हिंगुलु गंधकु । ये भागु येकु येकु षलूनियां । कृष्ण-कनकरसे भावना सात ॥ ७ ॥

विजया रसु । त्रिकटुक ये ही भावना प्रत्यक दीजेति । या सिद्धिदायका गणेस्वरा सी ॥ ८ ॥

दारुणु तले तो ज्वरु निरामु । अतिसारु वांतिकारु । अथवा ज्वरातीसारु वांतिकारु ॥ ९ ॥

इतुकियां ते नासी । वालु मात्रा यासि दीजे मधु-पि(प)ली सी । कां आनुपानुभेदे ॥ १० ॥ सिद्धगणेश्वरु नाम रसु ॥ ७ ॥

रसु गंधकु विष : या सम त्रिकटुक । निबूरसे नावेक मर्दिजे । आटे ॥ ११ ॥

रस समाने विष धूपिजे । बुद्धिविषेषे ॥ कोरडे षलिजे निके । मात्रा गुंज १ ॥ १२ ॥

सनिपातु निवारे तंद्री मौढ्य निवारे हौंकार शय्या शैत्य निवारे । आर्द्रकरसे सी दीजे ॥ १३ ॥ इति सांन्निपातुभैरव ॥ ७ ॥

रसु : गंधकु : हरितालु । मनसील । माक्षीलु । लोह । तांम्र । नागु । अभ्रकु । वंगु । सुवर्ण ॥ १४ ॥

मुसलीकंदु । चित्रकरसे मर्दूनि कूपिये घालिजे । बुद्धि-विषेषें । ते कापड मातिया लेपिजे जो सोसे उन्हवतिये ॥१५॥

मग त्यासि लघु पुट दीजे । कापडमाती फेडिजे । कुपीस-कट रगडीजे षलीजे चांग ॥ १६ ॥

ज्वालामूषी माका चित्रकु । आघाडा षारु । अजमोदा : विष । समुद्रफल गुगुलु । आर्द्रकरसु ॥ १७ ॥

अजा : माहिषी । मयूर । रोही मासा सोरु । या चिया पित्ता चिया भावना सात ॥ १८ ॥

मग रसा सि वेधी विषें धूपुनि आद्रकरसे मर्दुनी किजेति वटिका ॥ १९ ॥

ते आर्द्रकरसे सन्निपाती भले तीया स्थिती उपद्रव निवारेति जलयोगा स्तव ॥ २० ॥

असाध्या ते सचेतन करी । विसेषे सावधान करी । आपुली घाववी आण सन्निपाता सि ॥ २१ ॥

बहु पाणी ढालीजे । सीतोपचारु किजे । पथ्य दहीभातु दीजे वालुक साकर । उस ॥ २२ ॥

इति कालविध्वंस नाम रसु ॥ ४ ॥

जेपाले नि निंबू उसुनि बाधिजे घुई भाग दोनि । सोलिली मीरी ही असो मासु १ मग निबूरसे तीया चिया पलूनि किजेति वडीयां । स्त्रीदुधे प्रतुनियां उषोत डोलां लासुभे ॥ २४ ॥

थोर ज्ञानी होय रोगिया सि
परि तंद्री मौढ्य नासी
विसंग्यता केसी
वेगा फीटे ॥ २५ ॥

सोप नुरे सर्व विषा ची । नासे अजीर्णा विषुचिका । परि डोले सविया ची लोहीवे होती ॥ २६ ॥

तरी जीरे दुध वाटिजे । पातीयां वरि लेपु देइजे । ढाले ढाले लाहिजे । नेत्रसुषा ते ॥ २७ ॥

इति अमृतसंजीवनी नाम रसु ॥ ५ ॥

षापरिया । रसु । गंधकु । मनसील । विमला: तालकु मर्दूनि दिसु १ कारलीरसे ॥ २८ ॥

वालु कारि तौली भरिजे । एकि वरि कलासिजे चाकी । तिया वरि मर्दिलिया ची गोली ठेविजे ॥ २९ ॥

वरि ताम्बवाटी कलासिजे । त्या वरि साली चा दाणा ठेविजे तो करपे तों अग्नि कीजे ॥ ३० ॥

ते निवालेयां वरी दीस दोनि कारल-रसे षलौनि मात्रा वाल तीनि कीजेति वडीया ॥ ३१ ॥

ते वडी दीजे गुलकेले सी । पाचा ही विषमा तें नाशी । पाचारुनि पैजे सी ॥ ३२ ॥

पहीलीये चि मात्रे एकाहिक जाय । द्याहिक त्र्याहिक चातुर्थिक निवारे मात्रा चौथीये ॥ ३३ ॥

दाहपूर्वका ते जीणे । एकादा वेलु वमन करी । सकुमारा ची वांति धरणे । कढणे मुगा चे नि ॥ ३४ ॥

पथ्य दधभातु साकर मासु एकु सेवी गोडरे । बल पुष्टि होय थोरु दीपन करी बहुत ॥ ३५ ॥

इति विषमसोधन नाम रसु ॥ ५ ॥

रसभस्म । गंधकु कुमारीरसे षलूनि प्रहरु एकु । बाधिजे एरंडपत्री ॥ ३६ ॥

धान्यराशी दीन तीनि असो दीजे पूरुनि । मग दीजे मधें त्रिफले नि वा च्यारि ॥ ३७ ॥

कां रोगानुपाने । अथवा दीजे रसायने : ते पडविजे वाणें माहारोगा वारि ॥ ३८ ॥

प्रमेही तारि या चा भरवसा विभाडी स्वासा कासा क्षय रोगु कैसा या पुढे ॥ ३९ ॥

वर्णु शूल वातरोग कुष्ट । मंदाग्नि । पंडुरोगु । कामला । ग्रहणी । कृमिरोगु ॥ इत्यादिक फीटती ॥ ४० ॥

आणिषा रसा नाव वैद्य ठेविती । कीरु सर्व । पारि या वोषदा च हेवा पीउपे न करावा ॥ ४१ ॥ इति लक्ष्मी-विलास ॥ ५ ॥

कुमारीरसे प्रहरु १ मर्दिजे रसु । तेया अर्द्ध गंधकु दोही सम ताम्रपत्रे कलंकु लेपिजे तो ॥ ४२ ॥

तो मडकिया चा बुडी ठेविजे वारि पणती कलासीजे । वरिते मींठ भरौनि रुधिजे पचिजे पाहार च्यारि ॥ ४३ ॥

मम स्वाग शीतल षलौनि दीजेति गुंजा दोनि ॥ देवदारु : इद्रवारुणी । मूल । त्रिकटुक । साकर । या पाचा चे समभागे चूर्ण किजे । अनुपान ते णे स्वास कासु दारुण भर्यसें नि जाय ॥ ४४ ॥

इति स्वासकासारि नाम रस : ॥ ५ ॥

रसु मनसील । तालकु । टंकणु । हींगुल । माक्षिकु । यें भागु पेकु । ताम्र गंधकु भाग दोनि । दोनि ॥ ४६ ॥
लोह भाग च्यारि । निबूरसे मर्दिजे चांग पुटे सात दीजेति ॥४७॥
था षोडशांशें विष । मेलविजे सारती । कुष्ट जाती सदेषा । करी देषा ॥ ४८ ॥
उन्हवणीयें बाउचिया गद्याणे तीनि । वाटूनिया हे अनुपान सांविया सांप्रतेया ॥ ४९ ॥
कालेमंडल उदुंबर । काकण । पसुल । पांडुर । जाति कुष्ट-विशेष अपार सप्तक सातां ॥ ५० ॥
पथ्या ताक पातल । कां पाणीभातु केवल । पास तया आले पडवलें । दोडके । तोडोली ॥ ५१ ॥
हा क्षइ दीजे दीर्घा तापा सि दीजे । मधुपीपली सी । प्रलापीं आद्रकरसे । अन्येका ते ॥ ५२ ॥
वातरोगीं । सन्निपाती । उन्मादु । प्रसूतिवातु सुल शोफा पांडु ॥ सि घातु करी हिरडे गुले सी ॥ ५३ ॥
अवस्ता पाहोन उचितें । अनुपान पथ्य योजिजे । हा कल्पतरु हाती असतां चिंता काइसी ॥ ५४ ॥ इति कल्पतरु नाम रसु ॥ ५ ॥
चव्य : तीन्ही लोणे । पीपलीमूल । हींगु । जीरे चोहतरा । त्रिफला । अजमोदा । त्रिकटुक । चित्रकमूल । दाडिबसाल । हींगां अर्ध नागु । घालावा सर्वां समु । ओवां निबूरसे भावावा वेला तीनि ॥ ५६ ॥
वाल च्यारि दीजे वटिका । शूल समे । अग्निमांद्य । विशू-चिका जाय । वात श्लेष्मा । सुषदायका वटिका नाम ॥ ५७ ॥
इति सुषदायक वटिका ॥ ५ ॥
रसभस्म । लोह । गंधकु । या भागु एकु एकु । ती ही समु अभ्रकु । एला । पत्रज । नागकेसर । मोचरसु । आसंदु । षजुर । मुसली । सतावरी । गोषुरु । कौचा । द्राक्ष । सर्वां समु मालेषडा । का साकर घालिजे । त्रिफला । क्वाथे भावना बाराबर ॥ इक्षुरसा चिया ॥ ६० ॥

गदियाणा मात्रा । वटिका सेविजे एक एक । दुध सेरु १ वरि घेइजे । अम्ल तेल राइते वर्जिजे: । राषोन रुचि दीपन । ते सेविजे मधुर ॥ ६२ ॥

राते शक्ति आहुति उठी । वातरोगा ते जीणे उठा उठी । दीपन बल पुष्टी वाढे चांग ॥ ६३ ॥

इति मदनसुंदर नाम रसु ॥ ५ ॥

रसु गंधकुं । वीष चित्रकु । रसु नावेक मर्दुनि भरिजे कवडे । वरि बिबवा १ बाबुले चा काटा ऐसे थरोथरी भरिजे । तोड निरुधूनि गजपुट दीजे । षलुनि वाल १ सेविजे विजया—जीरेन सी ॥ ६५ ॥

का मीरीये तुपे सी अनुपान । ए णे रसे अतिसारु नासे भले तैसा ॥ ६६ ॥

ग्रहणी भूल मंदाग्नि । अजीर्ण जाती भरवसें न । अतिसार-दहनी नवल थोरु ॥ ६७ ॥

इति अतिसारु-दहन रसु ॥ ५ ॥

समान रसु गंधकु । मर्दिजे नावेकु । दोंही त्रिगुण सोधिला जेपाल । घापाति ॥ ६८ ॥

गीथ चांग मर्दिजे । वाल दोनि तुपे सी दीजे । वाल दोनि तुपे सी दीजे । अमा ते रेचिजे सुषोपाय ॥६९॥ सुषरेचकु ॥५॥

रसु गंधकु हिंगुलु । सर्वा सम जेपाल । मर्दिजे दीनु सकलु । दंती-काथे मर्दिजे । दीधलीयां साकरे सी । प्रबल दोंही प्रहारी ज्वरु पले । पथ्य ताकभातु ॥ ७१ ॥

बालसूर्योरस । विषुत्रिगुणा हिंगुलु षलीजे अर्ध गुंज साकरे सी दीजे । दीर्घ तापु जिणीजे । सप्तके एके ॥ ७२ ॥

यासि मीनापित्ता चिया भावना सात दीधलीयां तरि सन्नि-(पा)ता वांकुलीया वाइजोसि ॥ ७३ ॥ इति उदयभास्करु नाम रसु ॥ ५ ॥

हलदि । निंबपत्रे । विष वावडींगे : मुस्ता त्रिकटुक । अजामूत्रे चणक प्रमाणे वटिका ॥ ७४ ॥

सर्वां रोगि योगवाहक । काइ बोलू विसेषु । आरोग्यदायक हे चि एक ॥ ७५ ॥

इति क्षयवटिका ॥ ५ ॥

तालीस : निबु । पाहाड । मीरीये । पीपली । वेषंड । विष । आसंदु । बोकडमूत्रे मर्दिजे ॥ ७६ ॥

हे योगवाहक । वडी । दीजे चणेया एव्हडी सर्व रोगा ते दवडी अनुपानभेदे ॥ ७७ ॥

इति जयंतीवटिका ॥ ५ ॥

बिबवे सेर २। । वोवा सेर भुस २। । बोल पावसेरु -।- वेषंडे पावसेर -।- हलदि पावसेरु -।- या चे चूर्ण करून टाक ३ घेइजे पाणी पारिसे निसि घेइ वायु समे ॥

उडिदा ची मूलें तांबोला मध्ये घेइजे प्रदर समे ॥ श्वेत साट हडीमूल मधे सी दीजे श्वेत प्रदर समे ॥ त्रिकटुक ब्रह्मदोडी तीला च्या पाणिये सी पीजे स्त्री स फुल ये ॥

तुबीचीया कलिया जवषारु । दाती नींबुं पिपली । गुल । मेढल । निवडिंग दूध आणि घालिजे पाजिजे स्त्री स पुष्प ये ॥ पलस-बीज मधु सम योनि घालिजे गर्भवती स्त्री होय । आंबा मूल मधु कपूर मेलवीजे योनी मध्ये घालिजे योनि गाठि पडे ॥ हरिताल पलास-षारु । चुना भाग पाच पाच एकत्र कीजे योनि लेपु पाणिये सी लोम जाय ॥

ॐ नमो, काला कुत्ता, वोंके ना भुंके, ये, वीष उत्तर, अजेपाल ची रक्षा, वीरा हणवंता ची रक्षा । वाल मंतून बारावे कुतरि पडेति । भुम्यामलकी मूल कुवासूत्र मस्तकात् अंगुष्ठप्रमाण ते णे गुंडुन धूप देउन कडवा बांधिजे गाठि ठाया ये ॥

रक्त अपामार्गमूल वामांग कुक्षी राषिजे उलवणी जाय ॥

गोली वरावी ॥ रसभस्म तोला १ कापूर वाल ८ बोल वाल ८ मेषरासी टांक २ लवंग १६ मीरी १६ लोबानु टाक १ बोरप्रमाण गोली कीजे गोली १ सायंकाली भक्षिजे उतार तुपसाकर ॥ यादि भूतो वराडीया ब्राह्मण ॥

मरकटाचास्ति आदित्यवारी नरमूत्रे उगालुन नासु दीजे अप-स्मारु समे ॥

कोलउदीरा चे पोटी वेषंड घालिजे उताना पुरीजे दीस २ ते काहाडुन सेली च्ये दुधे नासु दीजे अपस्मारु जाय ॥

पिचकुलेया मूल दांता षाली धरीजे न्याउ जीकीजे । अथवा राजेया पुढे बोलीजे विजयो होय ॥

संवजडी । तगरु । बेहडा । आवेठा । पाढरा फेडरा । या ची मूले आणिजेति श्रीषंडातु उगालुन टीलकु कीजे । विजयो होय ॥

॥ इंद्रवारुणी चा चमत्कारु ॥

इंद्रवारुणी पुष्प नक्षत्रे घेइजे । उत्तरमुखे होउन छाया सुक-वीजे । त्रिकटुक घालुन सेली चे नि मूत्ते भावना ती ३ दीजे । वडीया २ कीजे टीलकु कीजे जे वस्त पाहे ते कडु होय ॥

टीला पुसीजे मागुते मधुर होय ॥

तया ची टीलेयांतु रात्तंजन घालिजे टिलकु कीजे सर्व जन वश्य ॥

गोरोचन-मिश्रीत टीलकु कीजे जुं खेलीजे हारि न ये ॥

मयूरसिषा पुष्यार्की घेइजे । लेकुरा च्या गला बांधिजे भूत प्रेत पिशाच पलती ।

ते पांचाग चि धूप दाखविजे ज्वरु जाय ॥

ते चि माथा धरिजे राजा वश्य होय ॥

ते चि हाती बांधिजे डावे वाटुं जीतिजे ॥

ते शत्रु चीया घरातु रोविजे मुखबंधन होय ॥

ते चि आपुले घरी रोवीजे चोरभय नव्हे ॥

ते चि जुझा मध्ये माथा धरीजे कांडे न लगे ॥

ते चि हाती बाधिजे अपमृत्यु चुके ॥

ते चि रितुकालीं स्त्रिये सि दीजे गर्भु धरी ॥

ते चि पुरुषा सि नाभि-लेपु कीजे विर्यस्तंभ होय ॥

ते सर्पा सि तुपे सी दीजे नासु सर्प-वीष उतरे ॥

ते तुपे सी पाजिजे त्रिमिर जाय ॥

पारा तोला १ तुथे मासे २ लोषंडा चे वाटी मध्ये षलावा तो गोला होइल मग षापरा च्ये वाटी चा संपुष्ट करावा रुपे तोला त्या च्या वाटिया चा संपुष्टातु घालावा मग माती च्या संपुष्टा मध्ये घालु माती कापड देउन मग कोलीसे धमावे फोरउन काहाडावे ते रुपे उत्तम होय ॥ १ ॥

सूठि मीरी पीपली लवंग एला जाइफल जायपत्री सम-भागें टांकु टांकु मीरीं ऽऽ।० तुप ००.॥ उत ३ जाति तव कढउनु सीतागीं दीन ३ दीजे सचेतन होय घामु जन्मांतिकु जाय ॥ छ ॥

हीरडे ००.५ मांकां समूली सपत्री ००५ कुमारी डीरीया ००५ लोणे पांच ००५ पाडी चे मूत्र ००२ कालहवडे चे मूत्र ००२ अवघें एकत्र करुनु आंबिली ऐसे राधिजे । वालउनु चूर्ण कीजे सीतलोदके दीस २ उष्णोदके सी जं वारि झटे तो वारि दीजे षैनु स्वास जन्मा चा जाय ॥ अम्ल वर्जावे ॥ छ ॥ षैना सि प्रकारु ॥ ७ ॥

हींगुलु तोला १॥ बोकडीया च्या पित्तातु डोलिकायंत्रीं रांधिजे पुटें दीजेति १२० मग मेणा सारिषा होय तो सीसे तोलियासि मासा दीजे सुध हेम होय ॥ छ ॥

खापर तोला १ वाटिया दोनि कीजेति । त्यातु पारा तोला घालिजे १ हींगुल तोला १ हरितालु तोला १ त्यातु घालिजे मग वोल्या निवडिंगा चें लाकुड वाटोले तोडिजे त्या चा मोव काहाडुन तो सपुष्ट त्यातु घालिजे त्यातु आघाडेया चा खारु थोडासा घालिजे मग त्या चे चि डाबीर दीजे मग माती कापडे २ दीजेति मग माती चा लेपु दीजे मग रानसेणी चा अग्नि घडिया २ दीजे मग रुपेया तोलेया सि मासा १ दीजे हेम होय ॥ छ ॥

त्रिकटुक त्रिफला । कोष्ट । कोलांजन: । आकलकऱ्हा । जाइफल जाईपत्री ऐला लवंगा आदोनी वेषंड वोंवा । षुरासानी । समुद्रसोष । लोणें ४ घेटुली । मूल । हाडसाकली । नापनिर्गुडी । नागार्जुनी । तरवड टाकलि वाघाटी तरडी नेपती । सतावरी धाइटी कोलीसाबीज मऱ्हाटी बिबवे आगोया आगिदवणी पीसोला उटाटी उतराणी निंबु अर्क-क्षारु अपामार्ग-

क्षारु खिचे चोक्षा नागु आदित्या चे मूल गोराडु रींगणीं डोरली एकत्र करून सम-भागें कीजे नींबुरसें भावना ७ दीजे सर्व दोषीं दीजे सर्व व्याधि ॥

॥ वातविध्वंसन या चे नाव ॥ ५ ॥

सीसे सेरु १ ससेया चे रगत केसुबा ची फुले केली चा षारु आघाडेया चा षारु ऐकत्र वाटुन सीसेया ची पत्रे करुन त्यासि लेपु दीजे ॥

गाइ च्ये सींगी घालुन सेणी चे गजपुट दीजे नाग—रजु होय ॥ १ ॥

संपा चे वाटोले रवे कीजेति साहाणे वरी घासोन गोण-तागुका वरी घासोन सरसे कीजेति तुथे नीबुरसे वाटुन ते रवे माषावे तोबेया चा ताइत करुन त्या मध्ये घालुन उक-रडेया मध्ये मास ३ रोवीजे मग काहाडावे रवे पेरोजो होती ॥ १ ॥

सोमोल तोला १ नीबुरसे पलजे दीस ३ मग सीदीरसे ३ मग घोडेया च्ये नलि मध्ये घालुन उडीद व अभ्रक व षडी तोडी डाबीर दीजे मग गजपुट दीजे मग तोलेया ता-बेया सि मासा १ दीजे फीरवीजे मासे ३ वीजे दीजे जोडा उत्तम होय ॥ यादि तानबा ॥

सापसुरली चे पुस लोहवीती चे पुस तोडुन घेइजे ते तोडुलीया मध्ये घालीजे घोडे आंधले होय ॥

गाइ च्ये ताके झुइजे वरवे होती ॥ ५ ॥

रसगंधक टंकण त्रिकटुक समभागे अर्ध जेपाल मर्दिजे वाल २ मात्रा उष्णोदके चुल जीतके तीतुके वेला रेची ॥ इछाभेदु ॥ ५ ॥

ताम्रपत्रे सेरा ची कीजे मग गोमुत्रा मध्ये अथवा कांजिया मध्ये रांधिजेति पाहारु १ मग काहाडु धुइजेति पारा पाव-सेरु गंधकु षेर ॥ नीबुरसे दोनी खलुन पत्रासि लेपु दीजे हांडी मध्ये घालिजेति गजपुट दीजे ॥ वांती भ्राती रहीत होय ॥ ताम्रभस्म ॥ ५ ॥

तालकु भाग दोनि । तुथे भाग १ चुना भाग २ मात्रा जंब प्रमाणे साकर जीरे सी दीजे पथ्य दुधभातु शीतज्वरु जाय ॥

बाबुले ची साली बोरा ची साली महुवा ची साली कहु ची साली लोषंडी ची साली पीपला ची साली चीचे ची साली पलसा ची साली । या साली चा काढा कीजे जी स पाणी असे ती स दीजे पाणी सोपी ॥

श्रीगणेशायनमः ॥ प्रथम आदि ची अनादि अनादी चा वोंकारु वोंकारा चा वेदु ॥ वेदा चे हव्य । हव्या चा धर्मु : ॥ धर्मा चा मेघु । मेघाचे उदक । ते उदक एकवीसांवें ब्रह्मांडी वाजिनले । ते समै आदिनारायण विष्णु जलशयनी पहुडेले होते पहुडलीया वरी अनेक सहश्र वरुषे जाली ॥ मग षीरसागरा मध्ये नारायण पहुडलीया वरी यौगे चौदा जाली ॥ तेया योगा विना प्रथम तृतीय यौग १ ॥ मदयौग ॥ बुद्धयौग ३॥ बुदबुदाकार यौग ॥ मन यौग ॥६ मन्वतर यौग । ७॥ धर्म यौग ॥८ दमदमाकार यौग ९॥ तारका यौग १०। नक्षत्र योग ११ अतीत योग १२। असंण्य योग १३। वर्त्तमान योग १४ ऐसी चौदा योगे जाली ॥ तेथे आदि नाही । पृथ्वी नाही ॥ आप नाही ॥ अग्नि नाही ॥ एक तत्व नाही ॥ तेज वायो नाही । आकास नाही । चंद्रसूर्यो नाही । ते समै आदिविष्णुनारायणें तेज उपजवीले तेजा पासौनि जोती जोती पासौनि फेनु फेना पासौनि बुदबुद ॥ तया पासौनि अंडज उपजवीले ॥ अंडजा पासौनि ब्रह्मा उपजवीला इतुके न कास्य । पादिक पृथ्वी जाली आता कास्यपा ची नारायणीया १३

प्रथम राणी अदिती ॥ १ दुसरी राणी द्वितीया ।२ तीसरी राणी कद्रजा ३ चौथी राणी सना ४ पाचवी राणी ब्रह्मणी ५॥ सेवका ६ वैच्यना ७ सुप्रभा ८ षंडनेत्रा ९ कालींद्री ११ कनकरेषा ॥१२ अभिवंदा १३ एसी नारायणीया तेरा १ त्या राणीया पासौनि उत्पति जाली द्वितीये चे देवते तीस कोडी । अदिती चे दानव सैन्यका चा सूर्यो ब्राह्मणी चा चंद्रु सेवके चे आठ्यासी सहस्र रुषिस्वरु ॥ वेनते चे अरुण : गरुड कुद्रजे चे तीस नागकुल ॥ सुप्रभे चे ण्व्हाणौ सरीता ॥ निक्षेके चे राक्षस ॥ धनुर्धरु ॥ सडनेत्रे च्या च्यारि खाणी ॥ त्या कोण कोणी ॥

उद्धोज । अंडज । जारज । स्वेद्ज एस्या च्यारि खाणी ॥ ४ ॥ जालिया त्या षाणी पासौनि चोरियसी लक्ष जीवा जनी । जालिया तेया मध्ये बेतालीस थलचरे ॥ ४२ ॥ बेतालिस जलचरे असताति । त्या जीवा सौनि यौगे ४ जाली कार्त्रिक सुद्ध नवमी ॥ ९ ॥ कृतायोगा चा प्रवेसु जाला १७२८००० इतुके कैतायौगप्रमाण कृतायोगा चे अंती ब्रह्मा जन्मला ॥ ब्रह्मा चा मरोची । कास्यपु । मुनु दृष्यानु । इस्वमनु आराणवु ॥ काकुस्या विस्वावसु गाहमनु नीवव्ये पुरष्कर्मा धर्नुधरु ॥ महीदसा : ॥ घेवनस्या : मांधाता : हे एकतीस राजे जाले ॥ २१ ॥ चक्रवति जाले ॥ याची चक्रे फीरती ॥ अधर्मा ची मस्तके छेदीती ॥ पैसे राजे कृतायो जाले ॥

एकवीस ताल पुरुष उच होता । सती सा सहस्र ग्रहणे जाली । स्वर्गी आया गमन नोहते ॥
धर्म मूर्तिवंत होता ।
विप्रा सि वेचावया ची चींता नोहोती ।
पृथ्वी सदा धान्यवं(त ) असे ॥
वनस्पती सदा फलत असे ॥
मातापिता पुत्रा चा सोमु न देषती
ते अस्तिगतु प्राणु होता ॥
ते मनुष्या सी लक्ष वरुसे आयुष्य होते ॥

मग कृतायुगी चौदा देत्यवंसी जाले । १४॥ प्रथम राजा मछ ।१ दुसरा ( रा )जा भैरव ।२ तीसरा राजा भैरवानंदु ॥ चोथा नंद्नु ॥ ४ पाचवा अर्धांग ५ साहावा हीरणकास्यपु ६ प्राधुं । ७। वेरोचन ८ । बली ९। बाणासुर १०। संषासुरु ॥ ११ गवासुर १२ कापिलासुरु १३ कपीलभद्र जाति ॥ १४ हे देत्यवंशी राजे जाले ॥ येही दगदगीली वसुंधरा ॥ ते देखोनि आदिविष्णुनारायणु पृथ्वी चा भारु फेडावया कारणे अवतार च्यारि घेतले ॥ ४ ॥
प्रथम मछु माता साषावती । पी—
रुपेया चा पीठी भाग १ निवीडींग-चूर्ण भाग २ बांवी चूर्ण भाग २ यकत्र करुन मर्दिजे वटीका कीजे एणे दांत घासी-

जसी । दृढ होती दंतदृढकरण ॥ पारा टां ४ गंधकु टां ८ ताम्रभस्म टां १ लोहटा २ तालकु टा ३ विष टा २ टक ण टा ३ पीपली टा ४ मीरी ५ सूठि ४ जाइफल ४ लवग ४ संखक्षारु टा १८ इये समस्ते वोषदे सम रसु मर्दिजे मात्रा वालु १

अनुपान आलेरसु अग्निमाद्य ॥ शूल संनिपातु श्लेष्मा अग्निकुमारु रस ॥

फीटकडी टां १॥ नवसादर टां १॥ जंगाल टां १॥ राशक टां १॥ मायफूल शे '।' लोहपात्रे आमला: केशरंजन: ॥ जवषारु टांकु २ गुल टांक ॥ चूणिया चि आसि ॥ ताकें सि दीजे ॥ मूत्रनिरोध फीटे ॥

हिंगा गुजा २ गुल वाल २ वडीया करीजे ॥ दीन २१ एककी वडी सेवीजे विद्ल अन्न वर्जीजे क्षोभक अर्श नाशति अर्शकुठारो रसः ॥

हिरडे ॥ बेहडे ॥ पींपली ॥ मीरे ॥ बेहडा चीया वियां ॥ नाभिशंप ॥ कणेरी मनशील ॥ सैंधव । समुद्रफेन ॥ राल ॥ पापरीया च्यान्ही लेणें ॥ मोर तुथें ॥ कायफल ॥ समभागे मेलवावीं मग सेली चे न दुधें पलीं मर्दिजे मग वडीया करीजे प्रातःकालीं मधु सि डोळां घालीजे ॥ अंजनः ॥

अथ नेत्रांजन: माइनी चा पाला ॥ मांका ॥ तुलसी ॥ पयां चे न रसे पापर माजिजे वेला ३ मग वेपंड रुइ-चिकें उगालुनु सुता ची वाति मापिजे वेला ३ तीलेले अथवा सिरसेलें घाजलून काजल धरिजे ॥ ते काजल ॥ पापरीया ॥ मोरतुथें ॥ फीटकडी ॥ त्रिकटूक ॥ वडागरें ॥ बीबवे भाजले २ लवंगा ॥ जाइफल दोन्ही जीरें ॥ वाला चेया पाना चा रसु ॥ माहोलिंगा ची चुरडि ॥ गाइ चें लोणीं घालुन कास्यपात्रा वरी तांबिये मर्दिजे मग कुपीये घालीजे ॥ डोळां अंजन करिजे ॥ फुल । पडल । त्रिमिर । पिचडें षरुज । हे रोग नाशति ॥ इति नेत्रवटिका ॥

तालक भागु १ वंगभस्म गद्याणे १२ लवंगा गद्याणे ४ लांगली गद्याणे १ एकत्र कारळीरसे पलिजे पश्चात् तुवरी गद्याणा १ घालिजे गुंजा १ एकी मधे सी लेपु दीजे सद्य अर्श नासती तालीकेस्वर: ॥

रसु । गंधकु । तालुकु । मनशील समभागे मेलवुनु कांजियें मर्दिजे जव नष्ट पिष्ट होय ते पहे कापड लेपिजे तेले माषुनु कापड—वाति करिजे मध्ये सांडसें धरी । जे वाती लावीजे षालि कांश्यपात्र ठेवीजे तेथे तेल पडे तें घेइजे । मात्रा गुंजा २ नर्श्यां । पानीं ॥ लेपना दीजे । सर्वांगकंपु नाशे दीस ३ सेवीजे विजयभैरवो नस्य ॥

नवसारा टांक १८ गंधक टांक ३६ । पारजा सेरु १ धत्तूर-रसें मर्दिजे दीन ३ कायकुपीये घालिजे । कापडमातीया ७ दीजेती वालुकायंत्रीं पचिजे ॥ दीपाग्नि पासुनु हटाग्नि वेन्हि करिजे पाहारु २४ सेंदुरवर्ण होय रसभस्म ॥ इति रसभस्मं ५ ५ ५

जवषारु टाक २ गुल टांक ।॥। चुणिया ची आसी ॥ ताकें दीजे मूत्रनिरोध फोटे ॥ निरोधशम ॥

हिंगा गुंजा २ गुल वाल २ गोलीया करीजती दीन २१ एक एकी वडी सेवीजे विदल अन्न वर्जिजे ॥ क्षोभक अर्श नासती ॥ नीली चेंया मूलां चें चूर्ण टांक ४ गाइ चे दहे सी दीजे श्रवते अर्श नासती ॥

पारजु ॥ हियावली ॥ कामीयें-सेंदुर ॥ मनशील ॥ नवसादर ॥ काचलोण ॥ साजीषारु ॥ टंकणषारु ॥ निंवडींगा चे न दुधें मर्दुन वालवीजे ॥ मेदें फांसुनुं निंबुआ चे न रसे लावीजे : मेद जाय ॥

चिंचे चीं अंतरसाली लाहान वस्त्रगालित करिजे । गाइ चे ण तुपें सीं बेहडे प्रमाण वडीया करिजेती ॥ दीनु २१ से-वीजेती चोषां तांदुलां ची पेज भोजन दीजे ॥ मूत्रप्रमेह जाय ॥

तारकेश्वरो रस : ॥

हिंगुल सेरु १ गहुंवां एवडे कुटके कीजेती मग षापरीया टांक २ तुथे १ पीटकडी १ ए तीन्हीं वोषदें वस्त्रगालित करुन मग या चूर्णा तुन चूर्ण टांक १ घेइजे ते टाक ३ चौं पाणियांतु टाक १ चूर्ण डहुलिजे ते णें डहुलिणि पा-णिए तें हिंगुला चे गडे माषीजे मग नावेक वालवीजेती मग डमरुयंत्रे करुन मुखावरोधन करुनु वरी जला स दीजे दीपाग्नी कीजे प्रहर २४ रस उर्धपातनी लागे नव्हे टांकां उना सेरु उतरे ॥ इती रसउर्द्धपातन ॥ ५ ५

अवघा रसु एकत्र करुनु आलेरसे १ भावना देयावेया। टंकणु भाजुन पाठीं घालावा एवं रसु सीद्ध होय।

मृदुकोष्टीं गुज १ देया बद्धकोष्टीं गुंजा २ देयावीया अनुपान साकर मीरींएं देयांवीं वात पित्त श्लेष्म ज्वरीं देयावा रसदीपकोरसः॥

रसभस्म भाग १ गंधक भाग १ पांढरी किण्ही भाग ३ यकत्र करुन चूर्ण करीजे। उर्द्धश्वासु। उदानु। जल्युः। तंद्री। भ्रांति। फीटे। सूर्यकलां नस्य॥

पातालगरुडी चे मूल टांक ३॥ आबटें ताकें सीं भीतरी दीजेती। दीवस २१ पथ्य पानीभातु दीजेती श्वेतकुष्ट जायः॥ जाइ चा पाला पाणियें वाटून लावीजे श्वेतकुष्ट जायः॥

आद्सेर पारा॥ सेर तुरटी १ पाउनसेर गंधक ।॥ सेर सैंधव १ येकत्र कीजे नव टांक फटीक्यासोमलु नीवडींग दुधें पलीजे डंबरुकायत्रे घालीजे संद् लेप कीजे सात माती कापड दीजेती पडी ची कुंभारा ची माती ची चुन्या ची चोवीस पाहारु रांधिजे वरी पोतारा पान्या चा दीजे भडाग्नी दीजे मग मंदाग्नीः या नांव कर्पूरः मधुपीपली सी दीजे जव मात्रा वालु मात्रा पथ्य तादुला चा भातु मुग तुप चवळी सेगा उतार नीबु सापर नवाद्ः॥

मुंडी मुसली रुदंती वरुणा सापरे सीं दीजे पुरुष होय तरुणाः

पडी। काथु। अफीम। लसणु। षोबरे। राष। लोहकीट। बोल। तीवरी। स्पागुळ। यें येकत्र कीजे पोट तुपें माषीजे वर ळेप दीजे वात गुलमः बेरा चें बीज पारीसेया पानीयान लावीजे वरी पींपाळा चीं पानें बांधीजे दीस तीन गंडमाला कर्णमूल जायः॥

वीष पापरी बांधिजे कट्टू षीचा कांदा उद्कें घाटीजे फीरगी च्या गाठीं वरी बांधीजे वरी पीपला चीं पानें बांधीजे वरी साहादेवी च पींडीं बांधिजेः॥ ७॥

फीरंगवाया चें बेंड असे तव तींडीक असे तेथे गंगावती चा पाला बांधिजे बरं होयः

समुद्रफळें गोमूत्रा मधे दीवस ७ व सेळी चे मुत्रा मध्ये दीवस ७ भीजवीजे ताका मध्ये दीवस ७ मग सावली स वाळवीजे चूर्ण कीजे त्या मध्ये सेंधव टाक ४ व खुरासानी अजवान् टाक ३ घालीजे प्रत्यही टाक दोन प्रमाणे सेवीजे : भुक लागे वाता स तोडी मळ नासे ती

जवषार : मीरी : शुरण : भल्लातक : हरितकि : जीरुद्वी

| | | |
|---|---|---|
| पीपर २ | सुंठ ५ | त्रीलामा १६ |
| ४ पीपलमूल | यवक्षार ४ | हरीतकी १० |
| ३ चव्यक | मीरीच २ | जीरुद्वी २ |
| ४ चीत्रक | सुरणा ३२ | |

पारा तोले तीन ३ गंधक तोले ३ येकत्र काजली कीजे मग : अभ्रका ची पत्रें हांडी मध्ये पत्रे ४ घालीजे वर १ भुरका घालीजे मग मागत्यान पत्रें घालीजे वर सरांउ दीजे वर मीठ भरीजे तोंड नीरुधीजे अशी प्रहर च्यार ४ कीजे पारा सीध :

ग्रहणी ॥ मोचरसा ॥ सुंठी ॥ बालबेल हिंग । पडीया काथु ॥ रायफुल ॥ वालांबा ॥ जायफल ॥ सम : चूर्ण कीजे ग्रहणी स दीजे पथ्य तुपभातु ॥ ५ ॥

लोणारषारु साजीषारु ॥ संष ॥ चुना सम चूर्ण करुन दीजे गुलम शूल समे ॥ ७ ॥

कोरांट ॥ आसंदु ॥ मयूरसिषा ॥ वांझकरटोल ॥ एकवर्णा गाई चें दुधें सी दीजे ॥ निघंटू पुत्र होय ॥

लेंकरु आडवे ये तरी त्या स वोषद ॥ हींग ॥ सैंधव ॥ मोहरीया समभागें वाटून पाजीजे अस्त्री स लेंकरुं पडे ॥ ५ कढची चा कंद पानीयें सी वाटीजे पोटी लेपू दीजे लेंकरुं पडे ॥

गुर्वाणी दोष उपजला असे त्या स वोषद् ॥ सीवनी पाडल ॥ कवीठ । बेलकी मुली साकर दुधें सी कढवीजे भीतरी दीजे ज्वर जाय ॥

श्रीषंड नीलोत्पल पदमक साकर सम दुधें सी दीजे सर्व—दोष—ज्वर—नाश ॥

साली चेया लाहीया साकर सैंधव सम अवलेह करावा गुर्वीणी ची थोर छर्दी नाशे

पींपल पाहाड । पींपलमूळं । चीत्रक । सुंठी सम क्षाथ सीतल करुन दीजे । अतीसार समे ॥ ५ ॥

आवलकंठी ८८।· बेहडे ८८।· नबाद् ८०॥· येकत्र करुन गौडा· गरीया ऊंस त्या चे रसें सीं भावना ३ दीजे येकत्र गोला करुन ठेवीजे टांका ४ प्रमाणें गाई चे न दुधे सी घेइजे दीवस ७ प्रमेह—तीडोक व पुंव उन्हाले समेती ॥

जेपाल सेर १ टंकण-षारु टांक १२ उत्राणा चे न रसे मर्दुन थाला लपेजे सूर्या चे रस्मी ठेवीजे तें तेल पडेल तें घेईजे ॥ ते ण्हें तेलें हातीं—पाइ—चीं नषें चोपडीजती बोबी लेपीजे ढाळू होय ॥

शुद्ध रसा तोले १ गंधका तोले ४ एकत्र काजली करीजे ॥ मग ववे टाक २ काले जीरें टांक २ विडिंगा टाक २ सैंधवा टाक २ मृत तांबेया वाल १६ घालुन मंदाग्नी प· चीजे ॥ जंव कालें होय ॥ वछनाग टाक १ घापे । षलुन सेंदे घापे । मात्रा वाल १ त्रीकटुके सी घेपे । कुष्ट वात रक्त दोष । प्रसूतवायु । सर्व दोष नासती ॥ वैश्वानरो रस ॥

सतीनाथें सांगितलें ॥

सहस्रमूली ची साली टाकुन तें लाकुडे घेयावीं तीया लाकु डा मधील गाभा टाकावा ते लाकुडे सावलीये सुकवीजे । तो लाहान भुका वस्त्रि गालीत करावा तो भुका ची फाकी करावी एकवर्ण गाइ चें दुधें सी घेइजे तीसरा दीसी न्हाजे तीनी दीस षाइजे वांझि सी मुल होय ॥

गंधकु पावसेरु ·।· तालकु टाक ३ हीगुल टांक ३ या मध्ये गोमांस अथवा शुकरमांस घालौनि कुटिजे कुटुक हांडी मध्ये ठेविजे तेथे किडे पडेतिल असके मांस व वोख(द) खातील मग त्या चे तेपालयंत्रे काहाडीजे ते तेल रूपेया सि दीजे पीत होय ः ॥

पारा पावसेरु ·।· दुध अर्क सेरु २॥ सीसी मध्ये घालोनि मोहर करुन चुल्ही वरि ठेविजे चोवीस प्रहरु अग्नि कीजे स्वाग सीतल उरीजे कथीला सि दीजे ॥ यादि मुखदुम ॥ ५ ॥

कंपिला टाक ३ हींगु टाक ३ पलासपापडा ३ इंद्रजव ३ हे समभागे चूर्ण कीजे टांक २ भक्षिजे वरि षोबरे जुने दीजे कटूदाने पडेति यादि साउबा ॥ ७ ॥



## ब्रह्मदेवकृत

# करणप्रकाश वरील मराठी टीका



१ हा ग्रंथ येवल्या स सांपडला. ग्रंथा चीं पहिलीं सात पानें नाहींत व आठवें पान दोनदां लिहिलें आहे. प्रतिपृष्ठा स बारा पासून पंधरा ओळी आहेत. अक्षर एकनाथकालीन आहे. भापा हि एकनाथा च्या सुमार ची आहे. जर ग्रंथा ची टीका स्वतः ब्रह्मदेवा नें केली असेल, तर नकलकारा नें भापा अर्वाचीन ह्मणजे एकनाथकालीन केली असें ह्मणावें लागतें. नकलकार शक १५४१ त नकल करता झाला. अर्थात्, तो ही नकल एकनाथा नंतर थोड्या च वर्पा नीं करता झाला. खुद्द ग्रंथांत स्वतः ग्रंथकारा नें टीका केली किंवा त्या न्या नंतर दुसऱ्या कोणीं केली या चा निर्देश नाहीं. शक ९६१ तील श्रीपति आपण स्वतः टीका केली असें जसें स्पष्ट ह्मणतो, तसें ब्रह्मदेव ह्मणत नाहीं. तेव्हां दुसऱ्या कोणीं टीका केली असण्या चा संभव आहे. स्वतः ब्रह्मदेवा ने हि टीका केली असण्या चा पुष्कळ संभव आहे. ब्रह्मदेव हा महाराष्ट्रांतील ज्योतिपी दिसतो. कारण, त्या च्या ह्या करणप्रकाशग्रंथा वरून महाराष्ट्रांतील वैष्णव एकादशीनिर्णया चें गणित करतात. ब्रह्मदेव शक १०१४ त झाला. सबब, ब्रह्मदेवानें च जर ही टीका केली असेल तर प्रस्तुत मराठी टीका शक १०१४ च्या सुमार ची आहे, असें ह्मणतां येतें.

२ प्रस्तुत ग्रंथांत विभक्तिप्रत्यय व शब्दयोगी अव्ययें पूर्वील शब्दा पासून तोडून छापिलीं आहेत. बहुतेक विभक्तिप्रत्यय संस्कृत अव्ययां चे अपभ्रंश आहेत, सबब स्वतंत्र अव्ययें च आहेत. ह्या अव्ययां चें स्पष्टीकरण प्रथम प्रथम कांहीं टीपा देऊन केलें आहे. त्यां वरून पुढील ग्रंथा च्या भाषे चें दिग्दर्शन होईल. ग्रंथा चीं एकंदर १५ पृष्ठें उपलब्ध आहेत.

वि. का. राजवाडे

खां तु २ उणे करूनु तो अंक अर्धिजे । तो वरि ठेविजे इतुक्या नें वर्गमूळ होय ।

॥ दोर्ज्याहतेति ॥

भागील भुजज्या ठेउनु आपुलेया शीघ्रगुणकें व्यस्त गुणिजे । सवर्णछेदार्थ ६० गुणिजे । कर्ण ६० गुणून त्या स भाग दीजे । अंशादिफळ घेउनु त्या चें चाप कीजे । ज्यांविशोध्य ये णें क्रमें धनुक करूनु तें भागादिफळ अर्धिजे । तें केंद्र-क्रमें मध्यग्रहां सि संस्कारकीजे । केंद्रक्रियादि ६ धन । तुळादि ऋण ॥ हें प्रथम फळ ॥ दळीकृत शीघ्रफळ संस्कारिला ग्रहा मध्यें मृदुतुंगभाग ३० चढऊन राश्यादि शोधिजे । तो मृदुकेंद्र होय ॥ राश्यादिमंदोच्यानि ॥

| मं | बु | गु | शु | श |
|---|---|---|---|---|
| ३ | ७ | ६ | ३ | ७ |
| २८ | ० | ० | ० | २६ |
| ० | ० | ० | ० | ० |
| ० | ० | ० | ० | ० |

॥ प्राग्वद्वाहुरीति ॥

त्या मृदुकेंद्रा चि पूर्वप्रकारें भुजज्या कीजे । ते ज्या ठेउन व्यस्त ५ गुणिजे । भौमा स ४८ भागिजे । बुधा सि १५६ गुरू सि १०८ शुक्रा स ३६० शनी स ६६ भागु दीजे ।

---

१ पंचमी. २ कर्तरि विधिलिङ् किंवा कर्मणि विधिलिङ्. अर्धयेत् किंवा अर्ध्येत. हा च क्रम ठेविजे, गुणिजे, दीजे, कीजे, इत्यादि रूपांचा पुढें जाणावा. ३ संस्कारिलेया=संस्कारिलया=संस्कारिल्या=संस्कारिला ( षष्ठी )

लब्धभागादि घेउन अवघें मंदफळ मंदकेंद्र प्रमाणें संस्कारकीजे[1] । क्रियादिरहितौ तुळादिसहितौ । ऐसें मंदफळ मध्यग्रहां सि दिल्हियां मंदग्रह होय । तो मंदग्रह आपुल्या शीघ्रोच्चां तु[2] फेडिजे । पूर्वप्रकारें शीघ्रोच्चग्रहवर्जितं ये णें क्रमें शीघ्रफळ आणिजे । तें शीघ्रफळ भागादि अवघें मंदग्रहां सि केंद्र-क्रमें दीजें । क्रियादि स्वं तुळादि ऋणं । ऐसि ३ तीन फळें । आणि रवि दोः फळ । चरफळ । ऐसिं फळें ५ दिल्हियां कुजादिपंचग्रह स्पष्ट होति ॥ बुधशुक्र आणितां मध्यरवी स पांच फळें दिल्हियां बुधशुक्र स्पष्ट होति ॥

## ॥ दस्राहतमिति ॥

कुजादिपंचग्रहां सि मंदफळ देतां मृदुकेंद्रभुजजीवे चें भोग्य-खंडक आलें असेल तें २ दोंगुणिजे[3] । भौमा स ९ भागिजे । बुध १६ गुरु १२८ शुक्र ३६ शनी स २०० भागिजे । आलें लब्ध कळादि आपले[4] मध्यगती स केंद्रक्रमें संस्कारिजे[5] । मृगादि ऋण । कर्कादि धन । इतुक्या नें ग्रहां च्या मंद-गती होति ॥

## ॥ तदूनेति ॥

त्यां[6] मंदगति अपल्या शीघ्रगतीं तैं[7] फेडिजे । तैं शेष ३१ गुणिजे[8] । द्वितीयशीघ्रफळ आणितां चापा च्या[9] भोग्यखंडकें गुणिजे । छेदसवर्णार्थ ६० गुणिजे । शीघ्रकर्ण ८ गुणूनु सवर्णून भाग दीजे । कळादिफळ ईल[10] तें शीघ्रोच्चगतीं तु फेडिजे । शेषग्रहां च्या स्पष्टगती होति ॥

---

१ संस्कारीक्रियेत. मंदफळ प्रथमा एकवचन. कर्मणि विधिलिङ्. संस्कार हा शब्द जर प्रथमान्त मानला तर मंदफळ ऐवजी मंदफळा असें षष्ठी चें रूप हवे. तें प्रस्तुत नाहीं. सबब संस्कारकीजे एवढें क्रियापदरूप मानणें भाग आहे. २ पंचमी, तु, तून हे पंचमी चे प्रत्यय. उच्चतः=उच्चत्तो=उच्चांतु=उच्चातून. ३ द्विगुण्येत= दुगुणिजे=दोंगुणिजे. ४ आपुलिये=आपुल्ये=आपले, चतुर्थी. ५ संस्क्रियेत. कळादि कर्म. ६ तिया=त्या. प्रथमा अनेकवचन. ७ पंचमी. तः=त्तो=तु=तून, त. ८ एक-त्रिंशद्गुण्येत. जसें द्विगुण्येत. ९ रामा चें हस्तें=रामस्य त्येन हस्तेन. रामा च्या हातानें=रामस्य त्यकेन हस्तेन. त्येन=च्चेन=चेन=चें=त्यकेन=च्च=ऑ=च्यां= च्या. १० एइल=इल.

॥ यदाधिकमिति ॥

आलें लब्ध शीघ्रोच्चगती हूनं अधीक तरि शीघ्रोच्चगति लब्धां त फेडिजे । शेषग्रहां चि कळादि वक्रगति होय ॥

॥ रामामिति ॥

स्वकीयचलकेंद्रा चे भाग करावे । कुजा चे वक्रभाग १६३ बुधा चे वक्रभाग १४५ गुरू चे वक्रभाग १२५ शुक्रा चे वक्रभाग १६५ शनी चे वक्रभाग ११२ कुजादिपंचग्रहां चा शीघ्रकेंद्रभाग जहलियां ग्रहे वक्रऋजुगति होति । केंद्रभागा सि

पृष्ठ ८

राश्यादिमंदोच्चानि

| मं | बु | गु | शु | श |
|---|---|---|---|---|
| ३ | ७ | ६ | ३ | २६ |
| ० | ० | ० | ० | ० |
| ० | ० | ० | ० | ० |
| ० | ० | ० | ० | ० |

त्यां तु २ उणे करुनु तो आखु अर्धिजे । तो वरि ठविजे । इतुक्या नें वर्गमूळ होय ॥

॥ दोर्ज्याहतेति ॥

मागील भुजजीवा ठेऊनु आपुलेया शीघ्रगुणकें त्र्यस्थ गुणिजे । सवर्णछेदार्थें ६० गुणिजे । कर्णु ६० गुणूनु भागु दीजे । भागादिफळ घेइजे । तया फळा चें धनुक कीजे । ज्यांवि-शोध्य ये णें क्रमें धनुक कीजे । तें भागादिफळ अर्धिजे । तें केंद्रक्रमें मध्यग्रहां सि दीजे । केंद्रक्रियादि तरि धन । तुळादि तरि ऋण । दलीकृत शीघ्रफल संस्कारिला ग्रहा

१ पंचमी. २ ग्रहक=ग्रहा. अनेकवचन ग्रहे. ३ सवर्णछेदार्थें=सवर्णछेदाथे=सवर्णछेदातें.

मध्यें मृदुतुंगभाग तिसें चढऊनु राश्यादि शोधिजे तो मृदुकेंद्र होय।

## ॥ प्राग्वद्बाहुरिति ॥

चि पूर्वक्रमें भुजा करूनु जांवा कीजे । ते भुजा जीवा ठेऊनु ५ त्र्यस्थ गुणिजे । भौमा सि ४८ ये णें भागिजे । बुधा सि १५६ भागु दीजे । बृहस्पती सि १०८ भागु दीजे। शुक्रा सि ३६० भागु दीजे । शनी सि ६६ भागु दीजे । आलें लब्धभागादि घेऊनु अवघें फळ केंद्रप्रमाणें क्रियादिर-हितौ तुळादिसहितौ ये णें क्रमें तें मंदफळ मध्यमग्रहां सि संस्कारुकीजे । अैसें ( क्रियादि स्वं । तुळादि ऋणं । ) फळ दिल्यां मंदग्रहो होय । तो ग्रहो अपुलया शीघ्रोच्चवांतु फेडिजे। पूर्वप्रकारें शीघ्रोच्चं ग्रहवर्जितं ये णें क्रमें शीघ्रफल आणिजे। तें शीघ्रफळ भागादि अवघें मंदग्रहां सि संस्कारु केंद्रक्रमें कीजे। ये णें क्रमें इतुक्या नें कुजादिपंचग्रह स्पष्ट होति । पांच फळें तिं कोण कोण येक शीघ्रफल । दुसरें मंदफळ। आणिक तिसरें शीघ्रफळ । चवथें ++फळ । पांचवें चर-फळ अैसीं पांच फळें देइजे । बुधशुक्र आणितां मध्यरवी स पांच फळें देइजे । ग्रह स्पष्ट होति ।

## ॥ दस्राहतमिति ॥

कुजादिपंचग्रहां सि मंदफळ देतां मृदुकेंद्रभुजा जीवे चें भोग्यखंडक आलें असेल । तें कुजादिपंचग्रहां चें जीवाखंडक २ गुणिजे । मंगळा सि ९ भागु दीजे । बुधा सि १६ गुरु सि १२८ शुक्रा सि ३६ शनी सि २०० भागिजे। आलें लब्ध-कळादि पंचग्रहां चें मध्यगती सि केंद्रक्रमें धनऋण कीजे । मृगादि ६ ऋण। कर्कादि ६ धन । इतुक्या नें ग्रहां च्या मंदगति होयें ।

## ॥ तदूनेति ॥

ग्रहां च्या अपुलाल्या शीघ्रोच्चगतीयां तु मंदगती फेडिजे । ३१ ये णें गुणिजे । शीघ्रफळ दुसरें आणितां चापा चें भोग्यखंडक आलें असेल ते णें मागुतें गुणिजे । छेदसव-र्णार्थें ६० गुणिजे । शीघ्रकर्णु ८ गुणूनु ६० सवर्णूनु भागु

---

१ षष्ठि. २ शेष होय चा कर्त्ता.

दीजे । कळादिफळ घेइजे । तें शीघ्रोच्चगतीं तु फेडिजे । उरलें शेष ग्रहां च्या स्पष्टगति होयं[1] ।

## ॥ यदाधिकामिति ॥

शीघ्रगती हूनु आलें लब्ध अधीक जाहालें तरि ते शीघ्रगति तयां तु चि फेडिजे । उरलें शेष ग्रहां ची वक्रगतिकळा होय । ये णें क्रमें वक्रगति जाणिजे ।

## ॥ रामामिति ॥

स्वकीयचलकेंद्रा चे भाग करावे । मंगळा चे वक्रभाग १६३ बुध १४५ गुरु १२५ शुक्र १६५ शनि चे वक्रभाग ११३ कुजादिपंचग्रहां चा शीघ्रकेंद्रभाग जहालियां ग्रहे वक्रऋजुगति होति । शीघ्रकेंद्रभागा सि*
अणि ग्रंथोक्तभागा सि अंतर करुनु कळा कीजे । ग्रहा च्या स्पष्टगती सि अणि मंदगती सि अंतर करुनु भागु दीजे । आले लब्ध वक्रादिवस जाणावे । जरि शीघ्रकेंद्रा च्या भागा हून सांगितले भाग अधीक तरि गतदिवस जाणिजे । उणे तरि येष्यदिवस जाणिजे । ऐसा वक्रिया ग्रहो जाणावा । वक्रभाग चक्रां तु फेडिजे । ते मार्गभाग जाणावे । चक्र ह्मणिजे ३६० कुजा चे मार्गभाग १९७ बुधा चे २१५ गुरू चे २३५ शुक्रा चे १९५ शनी चे २४७ ह्या मार्गभागा सि आणि केंद्रभागा सि अंतर करुनि कळा कीजे । ग्रहा च्या स्पष्टगती सि अणि मंदगती सि अंतर करुनु भागु दीजे । आले लब्ध गतैष्यदिवस होति । इतुक्या दिवशिं ग्रहो मार्गी होइल ऐसें जाणावें ।

## ॥ रसर्त्तव इति ॥

कुज ६६ बुध २१ गुरु ११२ शुक्र ५२ शनि १३४ हे कुजादिपंचग्रहा चे वक्रदिवस जाणावे ।

---

1 शष होय चा कर्त्ता. * येथ पर्यंत आठवें पृष्ट पुनः दुबार लिहिलें आहे. एक नक्कल अशुद्ध झाल्या मुळें दुसरी नक्कल केली आहे. दोन्ही नकला एका च लेखाकानें केल्या आहेत. परंतु प्रत्येकींत रूपें निरनिराळीं आहेत, हें पाहण्यासारखें आहे. पहिली नक्कल शुद्ध समजावयाची आहे. म्हणून ती प्रथम दिली आहे. नंतर दुसरी नक्कल दिली आहे.

## ॥ नागाश्विभिरिति ॥

कुज २८ बुध २०५ गुरु १४ शुक्र १८२ शनि २० या भागा समान शीघ्रकेंद्रभाग जाहलेयां पूर्वें ग्रह उदैजति । हे चि भाग चक्र-भागां तु ३६० उणे केल्यां भागा समान चलकेंद्रभाग होति तरि पश्चिमे ग्रहे अस्तमयहोति ।

## ॥ रूपेषुभिरिति ॥

बुध ५१ शुक्र २३ या भागा समान बुधशुक्रां चें चलकेंद्र भाग होति । तरि दोन्हीं ग्रहे पश्चिमे उदयहोति । ते भाग चक्रभागां तु ३६१ फेडिलयां भागा समान चलकेंद्रभाग होति । तरि पूर्वें बुधशुक्र अस्तमानहोति । पूर्वि अस्तमयहोऊनु बुध ३२ इतुक्या दिवसां पश्चिमे उदैहोति । शुक्र ७१ इतुक्या दिवसां पश्चिमे उदेहोय ।

## ॥ व्योमाक्षि क्षितयोरिति ॥

कुज १२० बुध १६ गुरु ३० शुक्र ८ शनि ३६ कुजादिपंचग्रह इतुके दिवसां पश्चिमे अस्तमानजहले ते पूर्वें उदयहोति । कुज ६६० बुध ३७ गुरु ३७२ शुक्र २५१ शनि ३४२ हे कुजादिपंचग्रह इतुके दिवस उदयहोऊनु पूर्वें असति ।

## ॥ वक्रेति ॥

सांगितले वक्रउदयअस्तभागा हूनु स्वस्वग्रहां चें शीघ्रकेंद्रभाग अधीक असती अथवा उणे असति । तरि तया भागा सि आणि केंद्रभागा सि अंतर करुनु कळा कीजे । ग्रहा च्या स्पष्टगती आणि मंदगती सि अंतर करुनु भागु दीजे । आले लब्ध गतैष्यदिवस होति । शीघ्रकेंद्रा च्या भागा हूनु सांगितले भाग अधीक तरि गतदिवस जाणिजे । उणे तरि येष्यादिवस जाणिजे ।

॥ इति पंचतारास्पष्टीकरणं ॥

॥ नाम तृतीयाधिकारः ॥

## ॥ सूर्येति ॥

तुळसंक्राती । मेषसंक्राति गते गेली असे । ते दिवसीं मध्यान्हीं शंकुछाया पाहिजे । मग दोहिं सि अैक्य कीजे । तें २ भागिजे । आलें लब्ध अंगुलादिअक्षप्रभा होय । ते अक्षप्रभे चा वर्गु कीजे । आणि १२ अर्कवर्गु कीजे । दोन्हीं वर्ग मेळऊनु त्या चें मूल घेइजे । तो अंगुळादिअक्षकर्णु होय । तो अक्षकर्णु वर्गु । अणि अर्कवर्गु दोहिं सि परस्परें अंतर करुनु त्या चें मूळ घेइजे । ते मागुती अक्षप्रभा पूर्वील होय ।

## ॥ सूर्येति ॥

त्रिभज्या ह्मणिजे १२० तें दों ठांई मांडिजे । येकी प्रति १२ गुणिजे । दुसरी अक्षप्रभे नें गुणिजे । दोन्हीं प्रति ६० सवर्णुन दोहिं सि अक्षकर्णु सवर्णूनु भागु दीजे । व्यस्तफळ घेइजे । १२ बारें गुणूनु कर्णें भागूनु व्यस्तफळ घेतलें असेल त्या नावें लंबजीवा ह्मणिजे । अक्षप्रभे नें त्रिज्या गुणूनु कर्णें भागूनु व्यस्तफळ घेतलें त्या नावें अक्षजीवा । ते अक्षजीवे चें धनुक कीजे । ते चि दक्षिणाक्षभाग । ते दक्षिणाक्षभाग २ ठांई मांडिजे । एके प्रती सि भागु १२० दीजे । व्यस्तफल घेइजे त्या नाव खार्कांशभाग ० । ९ । १७ । तें खार्कांशफळ दुसरे प्रती सि उणें कीजे । मग ते दक्षिणाक्षभागु स्पष्ट होति ।

## ॥ ग्रहस्येति ॥

ज्या ग्रहा चि क्रांति अणनें लागेल तो ग्रहा ठेवूनु अयनांश दीजे । मग त्या ची भुजा कीजे । ते भुजे ची जीवा कीजे । ते जीवा २५ गुणिजे । ६२ ये णें भागूनु व्यस्तफळ घेईजे । आलें लब्धा चें धनुक कीजे । ते भागादिक्रांति होय । ते क्रांति अपलाला विक्षेपादिक्रमें संस्कारिजे । तो ग्रहा कोणें

---

१ हीं चार अक्षरें शोध ह्मणून मागाहून केव्हांतरी समासावर लिहिलीं आहेत. शोध करणाऱ्याच्या सवर्णूनि किंवा सवर्णूनु हीं रूपें नित्याच्या प्रचारांतील किंवा बोलण्यांतील नव्हतीं; अर्थात् शोध फार पाठीमागूनचा आहे.

गोळि चा असे । ते गोळि ची क्रांति होय । सूर्या ची क्रांति करितां विक्षेप नाहिं । अन्यच्च । स्युः क्रान्तिखंडानि रस ६ र्तु ६ बाणा ५ ब्धि ४ द्वि २ चंद्रै १ र्ग्रहबाहुभागाः । तिथ्युद्धृता लक्षमितानि तानि योज्यानि भोग्या हतशेषकस्य । तिथ्यंशयोः क्रांतिलवा भवंति युक्तायनांशाद्ग्रहगोळदिका ॥ २

## ॥ लंकोदयेति ॥

मेष २७८ वृषभ २९९ मिथुन ३२३ यां तु चरखंडकें क्रमें चि फेडिजे । कर्क ३२३ सिंह २९९ कन्या २७८ यां तु चरखंडकें क्रमें चि मेळविजे । तुळादि ६ राशी सि हे चि उदयउत्क्रमें गणिजे । इतुक्या नें बारा राशी चे स्वदेशउदय होति ।

## ॥ सूर्येति ॥

लग्न आणितें लक्षण । सायनसूर्य कीजे । राशी वेगळ्या करुनि भागादिका चें भोग्य घेइजे । सूर्य जे राशी असेल ते राशी चा स्वोदय प्रति ३ ठेउन भागादिका निं गुणिजे । वरिले प्रति सि भागु ३० दीजे । आलें लब्ध सूर्या चीं भोग्यपलें होति । ज्या इष्टघटिका चें लग्न आणिजेल त्या चीं पलें कीजे । त्यां तु भोग्य-आदि करुनु जितुके राश्योदय फिटतिल तितुके फेडिजे । शेष ३० गुणिजे । जो राश्योदय फिटे ना ते णें भागूनु व्यस्तफल घेइजे । ते लब्ध पहिले राशि संख्ये खालि ठेविजे । राश्यादि इष्ट-लग्न होय ।

## ॥ तदेवेति ॥

रात्रिचें लग्न आणिजेल तरि । सूर्यराशी सि ६ मेळविजे । पूर्वप्रकारें लग्न आणिजे । आतां लग्नघटिका आणिता प्रकारु सांगिजेल । जें लग्न जितुकें भागीं देइल तें सायन कीजे ।

---

१ खालील श्लोक समासांत बारीक अक्षरांनीं मागाहून लिहिला आहे. शेवटीं जो २ चा आंकडा घातला आहे, तो असें दाखवितो कीं, हा शोध पोथीच्या पानांतील खालून दुसऱ्या ओळींत घालावयाचा आहे. २ रात्रीयं= रात्रिज्जं=रात्रिच्चं=रात्रिचें. हें रूप तद्धित आहे. षष्ठी धरली तर रात्री चें असें लिहावें लागेल. तत्पक्षीं, रात्र्याः स्यत्=रात्री चें.

स्वोदयो गुणिजे । भागु ३० दीजे । आले लब्ध लग्ना चीं भुक्तपळें । रविभोग्यपळें । लग्नभुक्तपळें । लग्नसूर्या मध्यें जितुक्या राशि असति तितुके राश्योदय घालुनु मेळविजे । ६० भागिजे । लब्धघटिकाशेषपळें ।

## ॥ सवितुरिति ॥

रविभोग्या हूनु इष्टविनाडिका उण्या[1] असति तरि । तथा इष्टविनाडिका ३० गुणिजे । जे राशी स सूर्य आहे ते णें स्वोदयें भागूनु अंशादिफळ घेउनु सूर्य जो राश्यादि आहे उदयकाळिचा सायन त्या शीं च मेळविजे अैनांशहीन कीजे । इतुक्या नें उदयलग्न होय । आतां सूर्य आणि लग्न एकराशि जहली तरि । राशि सोडुनु सायनलग्न सूर्याच्या भागादिका सि परस्परें अंतरकीजे[2] । स्वोदयप्रति २ ठेवूनु अंशादिकें गुणिजे । माथां ३० भागु दीजे । लब्ध विनाडिका होति ।

## ॥ क्रांत्यक्षेति ॥

क्रांति आणि अक्षभाग येकेंगोळिचे[3] तरि मेळविजे । भिन्नगो[4]ळिचे तरि अंतरकीजे । तया नाव नष्टभाग ह्मणिजे । ते भाग ९० फेडिजे । उरल्या शेषभागा ची जीवा कीजे । ते ठेविजे । आतां त्रिज्या ठेवूनु १२० बारें १२ गुणिजे । छेदसवर्णार्थें ६० गुणिजे । ते ठेविली विनष्टभवनजीवा ६० सवर्णूनु १२ गुणिलेया त्रिज्ये सि भागु दीजे । आलें लब्ध मध्यान्हकर्णु अंगुळादि होय । तया कर्णा चा वर्गु कीजे । आणि अर्क १२ वर्गु कीजे । दोहीं वर्गां चें अंतर कीजे । तयाचें मूळ घेइजे । ते अंगुळादिमध्यान्हप्रभा होय ।

## ॥ काळोगत इति ॥

जया अपुलेया इष्टघटिका चें नत कीजेल त्या घटिका । मध्यान्हा हूनु उण्या असति तरि तें पूर्वनत जाणिजे । अधीक तरि अपरनत जाणिजे । तया इष्टघटिका अहर्दळां तु फेडिजे । शेष उरे तें पूर्वनतघटिका होति । घटिकां त

---

१ उदयकालीयः २ अंतरीक्रियेत. ३ येकगोलीयाः ४ भिन्नगोलीयाः

दिनार्ध फिटे तरि शेष अपरनतघटिका होति । रात्रि[1] चें नत करिजेल तरि रात्र्यर्ध मांडिजे । तें नत ६ गुणिजे । ते भागादि होति । ते भागा ची उत्क्रमें जीवा कीजे । उत्क्रमजीवा मणिजे खंडकें विपरीतभुजज्यका जाणिजे ।

## ॥ मेषादिगोति ॥

चरखंडविनाडिका ६० भागूनु घटिका कीजे । तया घटिका ६ गुणिजे । ते भाग होति । तया भागा ची जीवा कीजे । ते चरखंडजीवा मेषादि ६ राशि[2] सूर्य असतां त्रिज्यां तु मेळविजे । तुळादि ६ राशी[2] सूर्य असतां त्रिज्यां तु उणें कीजे । त्या नाव अंत्या जीवा होय । ते अंत्या जीवा ठेऊनु मध्यान्हकर्णें गुणिजे । छेदसवर्णार्थें ६० गुणिजे । मगु[3] ते अंत्यजीवें तु नतउत्क्रमजीवा फेडिजे । ते ६० सवर्णूनु पूर्वप्रती सि भागु दीजे । आले लब्ध अंगुळादि इष्टकर्णु होय । तया कर्णा चा वर्गु कीजे । आणि अर्कवर्गु कीजे । त्या दोहिं वर्गा अंतर करुनि मूळ घेइजे । ते अगुळादिइष्टप्रभा होय ।

## ॥ इष्टोन्नत इति ॥

इष्टनतघटिका ठेऊनु १८० ये णें गुणिजे । दिनमानघटिका नें भागु दीजे । भागादिफळ घेइजे । तया फळां ची जीवा कीजे । आतां त्रिज्या ठेऊनु मध्यान्हकर्णें गुणिजे । पहिलें केल्या जीवे नें भागु दीजे । हे[4] णें एकें प्रकारें अंगुळादिइष्टकर्ण होय ।

## ॥ अंत्या इति ॥

अंत्यजीवा दों २ ठांई माडिजे । येके प्रती सि मध्यान्हकर्णें गुणिजे । इष्टकर्णें भागुनु व्यस्तफळ घेइजे । दुसरी अंत्या प्रति सि उणें कीजे । उरल्या शेषा चें उत्क्रमविधि धनुक कीजे । त्या धनुका सि ६ भागूनु व्यस्तफळ घेइजे । लब्ध नतघटिका होति ।

---

१ रात्रीर्थ. २ सप्तमी. ३ माङ्=माग=मग=मगु. ४ एणें ( अदस्, इदम् या सर्वनामां पासून ). हेणें ( एतत् या सर्वनामा पासून ).

### ॥ दिनार्धकर्णेति ॥

त्रिभज्या १२० मध्यान्हकर्णे गुणिजे । इष्टकर्णे भागूनु ह्मस्त-फळ घेइजे । क्रमें चि त्या चें धनुक कीजे । तें धनुक भागादि ठेऊनु दिनार्धें गुणिजे । ९० य णें भागूनु ह्मस्तफळ घेइजे । तया नाव उन्नतघटिका होति ।

॥ इति छायाधिकारो नाम चतुर्थः ॥

---

## ॥ अथ चंद्रग्रहणं ॥

### ॥ तिथिगतैष्येति ॥

तिथि च्या गतेष्यघटिका पळां अक्षरा नें त्रस्तगोमूत्रन्यायें चंद्रसूर्यराहू च्या स्पष्टगति गुणिजे । ६० भागूनु कळादिफळ घेइजे । सूर्योदया हूनु मागिल गतघटिका तरि उणें कीजे। येष्यघटिका तरि मेळविजे । राहु स विपरीत कीजे । इतुक्या नें पर्वांति समकळग्रहे होति ।

### ॥ भुक्तिर्दशांशेति ॥

सूर्या ची स्पष्टगति १० भागूनु कळादिफळ घेइजे । मागुती स्पष्टग-ति घालुनु मेळविजे । मेळऊनु अर्धिजे । लिप्तादि सूर्यबिंबमान होय ॥ ॥ चंद्रा ची स्पष्टगति ३ गुणिजे । ७४ ये णें भागूनु कळादिफळ घेइजे ॥ आतां तमोबिंबा सि सूर्या ची गति १९ गुणिजे । २४ भागूनु कळादिफळ घेइजे । तें ठेविजे । मागुती चंद्रा ची गति १० गुणिजे । ७५ या णें भागूनु कळादिफळ घेइजे । दोहिं गतीं चें भागुदीलहें फळ येकां तु येक अंतरकीजे । इतुक्या नें कळादिराहुबिंब होय ।

### ॥ आवरणमिति ॥

चंद्रा सि राहु ग्रहकु चंद्रग्राह्य । सूर्या सि चंद्र ग्रहकु सूर्यग्राह्य । ग्राह्यु आणि ग्रहकु यां दोहिं चीं बिंबें येकत्र करूनु तें अर्धिजे । तें मानैक्यार्ध होय ।

## ॥ पातोनशीतेति ॥

समकळ चंद्र ठेऊनु त्यां तु समकळ राहु फेडिजे । उरल्या शेषा ची भुजाजीवा कीजे । ते जीवा ९ गुणिजे । भागु ४ दीजे । तो कळादिविक्षेपु होय । राहु फेडिल्यां चंद्र जे दिसे चा असेल ते दिसे चा विक्षेपु होय । तो विक्षेपु मानैक्यार्धां तु फेडिजे । इतुक्या नें छन्न होय । तें छन्न ४ भागिलेयां ग्रासांगुळें होति ।

## ॥ ग्राह्यस्यबिंबादिति ॥

तिं ग्रासांगुळें ग्राह्या चा बिंबा हूनु अधिक जाहलेयां तैं सर्वग्रासु ग्रहण होय । विक्षेपा हूनु मानैक्यार्ध उणें जाहलेयां ग्रहण नाहिं ऐसें जाणिजे ।

## ॥ ग्राह्यार्धेनेति ॥

ग्राह्या चें बिंब अर्धिजे । त्यां तु ग्रहकबिंब अर्धूनु मेळविजे । त्या नाव मानैक्यार्ध । त्या चा वर्गु कीजे । त्या वर्गां तु विक्षेपा चा वर्गु करूनु फेडिजे । त्या चें मूळ घेइजे । तें मूळ ६० गुणिजे । चंद्रसूर्यां चें गत्यंतर करूनु ते णें भागु दीजे । आलें लब्ध स्थित्यर्धघटिका होति । आतां मर्दार्धघटिका अणिता क्रमु । ग्रहकबिंब अर्धूनु त्या मध्यें ग्राह्यबिंब अर्धूनु फेडिजे । तया चा वर्गु कीजे । तया वर्गां तु विक्षेपुवर्गु फेडिजे । त्या चें मूळ घेइजे । तें मूळ ६० गुणिजे । गत्यंतर करूनु भागु दीजे । आलें लब्ध मर्दार्धघटिका होति । हे मध्यकाळिची स्थित्यर्धमर्दार्ध होति । जेधवां सर्व ग्रासुग्रहण होइल तेधवां मर्दार्धघटिका आणिजे । स्वल्पग्रहणि नाणिजे ॥

## ॥ स्थित्यर्धेति ॥

स्थित्यर्धघटिका नें चंद्रसूर्यराहु यां चा गति गुणिजे । भाग ६० देऊनु कळादिफळ घेइजे । तें फळ चंद्रसूर्यो वेगळाले प्रति २ ठेविजे । येके प्रती सि स्तिथ्यर्धां चें फळ फेडिजे । येके प्रती सि मेळविजे । राहु सि या चें विपरीत कीजे । ते फेडिले प्रति स्पर्शकाळ ग्रह होति । मेळाविले प्रति मोक्ष-

काळ ग्रह होति । आतां मर्दार्धघटिकागति गुणूनु ६० भागूनु कळादिफळ घेऊनु पूर्वप्रकारें स्छित्यर्धा चे क्रमें ग्रहा सि संस्कारिजे । तें मर्दार्धफळ फेडिले ठांईं सन्मीळनकाळिचे ग्रह होति । मेळविले ठांईं उन्मीळनकाळिचे ग्रह होति । आतां स्पर्शकाळ ग्रह ठेऊनु । पातोनशीतद्युति ये णें प्रकारें विक्षेप आणिजे । तो स्पर्शकाळिचा विक्षेप होय । त्या विक्षेपा चा वर्ग करूनु मानैक्यार्धवर्गा तु फेडिजे । पूर्व· प्रकारें ग्राह्यार्धेन ग्राहकार्धे युतोने । ये णें प्रकारें स्छित्यर्धें आणिजे । तें स्पर्शमोक्षकाळिच्या स्छित्यर्धघटिका होति । तें स्पर्शमोक्षस्छित्यर्धघटिका वेगळाल्या ठेऊनु त्यां तु मध्य· स्छित्यर्धे मेळविजे । तिं दोन्हि स्पर्शमोक्षकाळिचे स्छित्यर्धें स्पष्ट होति । आतां सन्मीळनकाळिचे ग्रह ठेऊनु पातोनशीत- द्युति । ये णें प्रकारें विक्षेप आणिजे । त्या चा वर्गु करूनु मानांत- रार्धवर्गा तु फेडिजे । पूर्वप्रकारें ग्राह्यार्धेन ग्राहकार्धे युतोने । ये णें प्रकारें मर्दार्ध आणिजे । तें सन्मीळनकाळिच्या मर्दार्ध- घटिका होति । आतां उन्मीळनकाळिचे ग्रह ठेऊनु पातोन- शीतद्युति ये णें प्रकारें विक्षेप आणिजे । तया चा वर्ग करूनु मानांतरार्धवर्गा तु फेडिजे । ग्राह्यार्धेन ग्राहकार्धे युतोने ये णें क्रमें मर्दार्ध आणिजे । तें उन्मीळनकाळिचें मर्दार्धे होय । हें[1] सन्मीळनउन्मीळनकाळिचें[2] मर्दार्धें[3] वेगळाळिं[4] ठेऊनु मध्य· विमर्दार्धें दोहि ठांईं मेळविजे इतुक्या नें सन्मीलनउन्मीलनका- ळिचीं मर्दार्धें स्फुट होति ।

## ॥ तिथ्यंतामिति ॥

तिथि च्या स्पष्टघटिका दों २ ठांईं ठेविजे । येके प्रति सि स्पर्शकाळिचें स्थित्यर्धस्फुट उणें कीजे । येके प्रति सि मोक्ष- काळिचे स्थित्यर्धस्फुट मेळविजे । उणें केले[5] प्रती सि स्पर्श- काळिचा[6] घटिका होति । मेळविले[7] प्रति चा मोक्षकाळिचा

---

१ एए=हें; अनेकवचन. २ चियें=च्यें=चें; अनेकवचन. ३ मर्दार्धें=मर्दार्धे; अनेकवचन. ४ लिं=ळिं. ५ केलिये=केल्ये=केले. ६ चिया=च्या=चा; अनेकवचन. ७ लिये=ल्ये=ले. ८।९ चिया=च्या=चा.

घटिका होति । तिथि च्या स्पष्टघटिका तो चि मध्यकाळु जाणिजे । आतां स्पर्शमोक्षकाळिचें[1] स्फुटस्थित्यर्धें दोन्हीं मेळविजे । त्या आद्यंत पुण्यकाळघटिका होति । तंव पर्यंत चंद्र न दिसे ।

## ॥ तिथ्येतेति ॥

तिथिस्पष्टघटिका दो २ प्रति ठेविजे । स्फुटमर्दार्धें येके[2] प्रति[3] सि फेडिजे । येके प्रति सि मेळविजे । फेडिले[4] प्रति सि उन्मीळनकाळ होय । मेळविले प्रति सि उन्मीळनकाळ होय ।

## ॥ अभिष्टेति ॥

आतां इष्टग्रासु आणिता क्रमु सांगेन । मध्यस्थिति आणि अभीष्टघटिका दोहीं सि अंतर कीजे । तया[5] घटिका ठेऊनु चंद्रसूर्या चा गतिअंतर करूनु या घटिका नें गुणिजे । भागु ६० दीजे । तें फळ भुजा होय । स्पर्शकाळिचा चंद्रराहु तात्काळ कीजे पूर्वप्रकारें विक्षेप साधिजे । तो विक्षेपकोटि ह्मणिजे । ते कोटि चा वर्गु अणि पहिल्या भुजे चा वर्गु कीजे । दोहिं वर्गां चें ऐक्य कीजे । तया चें मूळ घेइजे । तो अंगुळादिइष्टकर्णु होय ।

## ॥ गत्यंतरेति ॥

आतां गत्यंतर करूनु मर्दार्धें गुणिजे । पूर्वप्रकारें भुजा कोटि कर्णु आणिजे । तें आलें लब्ध कर्णुमानैक्यार्धां तु फेडिजे । तो संदर्शग्रासु जाणिजे । पहिलें आला इष्टकर्णु तो मानैक्यार्धां तु फेडिजे । शेष इष्टग्रासांगुळें होति ।

## ॥ इष्टग्रासेति ॥

मानैक्यार्धां तु इष्टग्रासु फेडिजे । त्या चा वर्गु कीजे । त्यां तु विक्षेपा चा वर्गु फेडिजे । त्या चें मूळ घेउनु ६० गुणिजे । मागुतें ४ गुणिजे । चंद्रसूर्या चे गत्यंतरें भागु दीजे । तें लब्धस्थित्यर्धां तु फेडिजे । तो इष्टकाळ होय ।

## ॥ स्पर्शेति ॥

स्पर्शकाळिच्या घटिकां चें नत कीजे । नत करिता क्रमु

---

१ चियें=च्यें=चें; अनेकवचन. २ येकियें=येक्यें=येके. ३ प्रती. ४ लियें=ल्ये=ले. ५ ट.य, षष्टी.

सांगेन । अहर्दळादारभ्य मध्यरात्री पर्यंत चंद्रा सि पूर्वनत जाणिजे । मध्यरात्रादारभ्य मध्यान्हपर्यंत अपरनत जाणिजे । हें चंद्रग्रहणिचें नतसाधितें लक्षण ।

अहर्दळाद्रात्रिदळावसानं यावत्कपाळं कथयंति पूर्वं ॥

ततो दिनार्धादपरं तदिंदो र्भानो भव+ग्रहणेंन्यथाकृति ॥

सूर्यग्रहणीं या चें विपरीत कीजे । ये णें क्रमें स्पर्शकाळिच्या नतघटिका ठेउनु नतो रसघ्ना घटिकाल वा स्यु ये णें न्यायें नतघटिका सा नि ६ गुणिजे । तें भागादि होइल तया ची जीवा करूनु अक्षप्रभे नें गुणिजे । त्या सि अक्षकर्णें भागु दीजे । लब्धा चें चाप कीजे । तें वळन होय । पूर्वनत जहलियां उत्तरदिसे चें वळन होय । अपर तरि दक्षिण-दिशे चें वळन होय । ये णें क्रमें मध्यवळनमोक्षवळन आणिजे ।

यदा भानो र्नतं पूर्वं तदेंदोः परसंज्ञकं ॥
यदा परनतं भानो स्तदा पूर्वं विधोः स्मृतं ॥

## ॥ ग्राह्येति ॥

जया चें ग्रहण तो ग्रह ठेउनु तया सि ३ राशि मेळविजे । पेनांश कीजे । तया ची भुजा कीजे । ते भुजा ची विलोमगति भुजा कीजे । ते जीवे ची पूर्वप्रकारें क्रांति कीजे । ते क्रांति राशि स ३ मेळविला ग्रहा जे दिसे चा होईल ते दिसे ची क्रांति जाणिजे । भिन्नदिशा जहलियां अंतर कीजे । सूर्यग्रहणवळनीं क्रांती स शरसंस्कार नाहिं । मग तया ची जीवा कीजे । ते जीवा ४ भागिजे । तें अंगुळादि-वळन स्पष्ट होय । चंद्रग्रहणीं वा सूर्यग्रहणीं दिनमान मांडिजे । त्या चा चि त्या सि चतुर्थांश मेळविजे । नतदिनार्धा तु फेडिलियां उन्नत होय । तें उन्नत मेळविजे । या च प्रकारें मोक्षकाळिचा ग्रह करून मोक्षवळन कीजे । त्या सि अर्दळें भागु दीजे । तया लब्धा नाव छेद ह्मणिजे । ते णें छेदें मानार्धा सि अणि मानैक्या सि विक्षेपा सि इष्टकर्णा सि भुजा सि कोटि सि या सि भागु दीजे । तिं अंगुळादि होति ।

## ॥ आदौ व्योम इति ॥

आतां परिलेखना चें लक्षण सांगेन । ग्रंथांतरे ।

ग्राह्यग्राहकयोर्बिंबे तयोर्मानार्द्धमेव च ॥
शराश्च वळने सर्वे परिलेखे प्रयोजकः ॥

बिंबमान । मानैक्यार्ध । विक्षेप । मध्यविक्षेप । मोक्षविक्षेप । भुज । कोटि । कर्णु । वळन । यां चें[1] अंगुळप्रमाणें शलाका वेगळाल्या कीजे । आणि अंगुळें ३० प्रमाणें शलाका येकि १ कीजे । पहिले ३० अंगुळा ची शलाका ठेऊनु वृत्त ते णें प्रमाणें लिहिजे । तें आकाशमंडलवृत्त होय । तया मध्यें मानैक्यार्धशलाका ठेउन ते णें प्रमाणें येक वृत्त लिहिजे । तें वळनाश्रयवृत्त होय । त्या मध्यें ग्राह्यार्धशलाका येकवृत्त लिहिजे । ते वळनाश्रयवृत्ता सि मध्यें सूत्र धरूनु पूर्वपश्चिमउत्तरदक्षिण दिक्साधन कीजे । चहुं दिशां ४ बिंदु दीजे । पूर्व दिशे हून स्पर्शवळन आणि मोक्षवळन जे दिशेचें होइल ते दिसे सि दीजे । आतां पश्चिमदिसे चा बिंदू हूनु[2] स्पर्शमोक्षवळन जे दिसे चें होइल ते दिसे चें अन्य दिसे दीजे । ये णें क्रमें चंद्रसूर्या ची कीजे ॥

## ॥ शिलीमुखाख्येति ॥

मध्यविक्षेपा ची प्रमाणशलाका घेऊनु दाक्षिणदिसे चा बिंदू नु पश्चिमदिसे सि दीजे । मागुती उत्तरदिसे चा बिंदु नु पूर्वदिसे सि दीजे । हें सूर्यग्रहणा चें लक्षण । चंद्रग्रहणीं या चें विपरीत कीजे । मध्यविक्षेपप्रमाणें शलाका दाक्षिणदिसे चा बिंदू नु पूर्वदिसे सि दीजे । उत्तरदिसे चा बिंदू नु पश्चिमदिसे सि दीजे ॥

## ॥ वृत्तेति ॥

दुसऱ्या वळनाग्र वृत्ता चे ठांई स्पर्शविक्षेपु जे दिसे चा होइल ते दिसे चा अन्य दिसे सि त्ये[3] णें प्रमाणें शलाका दीजे । ये णें क्रमें चंद्रसूर्या सि कीजे ॥

---

१ पुढील शब्द जो अंगुळ तो नपुंसकलिंगी असल्यामुळें च चें नपुंसकलिंग एकवचन केलें आहे. वस्तुतः शलाका कडे संबंध असल्यामुळें च्या असें रूप हवें होतें. २ हूनु, नु व हून हे पंचमी चे प्रत्यय. बिंदू हुनु; बिंदू नु; बिंदू हून. ३ त्यत् या सर्वनामा पासून त्ये. तत् या सर्वनामा पासून ते हें रूप होतें.

## ॥ ग्राह्येति ॥

स्पर्शविक्षेपु दिल्हिया ठाउ नु ग्राहकार्धशलाकाप्रमाणें येक वृत्त लिहिजे । मोक्षविक्षेपु दिल्हिया ठाऊ नु ग्राहकार्धशलाकाप्रमाणें येक वृत्त लिहिजे । ते दोन्हि स्पर्शमोक्षदिशा होति । मध्यें जितुकें खंडिलें आहे तितुका मध्यग्रासु जाणिजे ॥

## ॥ प्राग्ग्रासेति ॥

आतां इष्टग्रासा चें लक्षण । चंद्रा सि स्पर्शवळन दिल्हेयां ठाऊ नु तें वळन जे दिसे चें होईल ते दिसे सि भुजाप्रमाणें शलाका दीजे । मोक्षवळना चे ठाऊ नु अन्य दिसे सि ते भुजाप्रमाणें शलाका दीजे । आतां सूर्या सि भुजा स्पर्शवळना चे ठांई अन्यादिसे सि दीजे । मोक्षवळना चे ठांई स्वदिसे सि दीजे । ते भुजा चे शेवटु नु कोटिप्रमाणे शलाका दीजे । आतां मध्यवळना चे ठाऊ नु मध्यवळन जे दिसे चें होईल ते दिसे चे अन्य दिसे सि इष्टकर्णप्रमाणें शलाका कीजे । इतुक्या नें कोटि आणि इष्ट यां दोहिं चा योगु होइल तया योगा चे ठाऊ नु ग्राहकार्धशलाकाप्रमाणें वृत्त लिहिजे । तें वृत्त ग्राह्यार्धमंडला सि जितुकें खंडीति तितुका इष्टग्रासु जाणिजे ॥

## ॥ आद्येति ॥

आतां चंद्रग्रहणाचा वर्णु । स्पर्शकाळीं आणि मोक्षकाळीं चंद्र धूम्रवर्णु होय । अर्धग्रासिं भृंगवर्णु होय । अर्धग्रासा हूनु अधिक जाहलेयां रक्तश्यामु होय । सर्वग्रासिं पिंटगवर्णु होय ॥

॥ इति चंद्रग्रहणाधिकारो नाम पंचमः ॥

---

## ॥ तिथेर्नतेति ॥

ज्यां घटिका अमावास्या असेल त्या घटिका चें पूर्वप्रकारें नत साधिजे । तया नतघटिका विघटिका ठेऊनु ५ भागु दीजे । लब्धराश्यादिफळ घेइजे । तें ऐसें । नता सि पाचें

५ भागु दीजे । आलें फळ राशि । शेष तिसें ३० गुणूनु खालिल अंक मेळविजे । भागु पांचें ५ दीजे आलें फळ भाग होति । शेष ६० गुणिजे ५ भागूनु कळाविकळा आणिजे । तया नावें राश्यादि ग्रहादिक होय । तें ग्रहादिक पूर्वनत जाहलें तरि समकळसूर्या तु उणें कीजे । अपरनत जाहलें तरि मेळविजे । तया सूर्या सि अयनांश देउनु पूर्वप्रकारें क्रांति । ग्रहस्य दोर्ज्यांशरनेत्रनिघ्नी ये णें प्रकारें क्रांति कीजे । ते क्रांतिभाग आणि अक्षभाग येके गोळिचे जाहलेयां ऐक्य कीजे । भिन्न गोळिचे जाहलेयां अंतर कीजे । तया नाव अक्षांश होय । अक्षभाग अणि क्रांतिभाग । या चा अंकु जो अधिकु होईल ते दिसेचे स्पष्ट अक्षांश होति ॥

## ॥ लवोनेति ॥

आले अक्षांश ९० फेडिजे । त्या ची जीवा कीजे । आणि ग्रहादिका ची जीवा कीजे । पहिली जीवा ग्रहादिक जीवे नें गुणिजे । ३६०० ये णें भागु देइजे । आलें लब्ध घटिकादि लंबन होय । पूर्वनत जाहलेयां ऋणलंबन होय । अपरनत जाहलेयां धनलंबन होय । तें लंबन तिथ्यंतघटिकां तु लंबनक्रमें ऋणधन कीजे । तें लंबनसंस्कृतपर्व होय । आतां सूर्या चि स्पष्टगति ठेऊनु लंबनघटिका नें गुणिजे । भागु ६० देऊनु कळादिफळ घेइजे । समकळसूर्या सि लंबनक्रमें ऋणधन कीजे । तो लंबन तात्काळ सूर्या होय । आतां पहिलें लंबनसंस्कृतपर्व ठेऊनु पूर्वप्रकारें नत साधिजे । तें ५ भागूनु राश्यादिफळ घेइजे । तें ग्रहाद्य होय । तें लंबन तात्काळिक सूर्या तु पूर्वप्रकारें संस्कारूकीजे । त्या वरि क्रांति आणिजे । ते क्रांतिभाग अणि अक्षभाग पूर्वप्रकारें संस्कारिजे । ते अक्षांश होति । तया अक्षांशा वरि पूर्वक्रमें लवोनपूर्णांकज ये णें क्रमें लंबन आणिजे । तें लंबन तिथ्यंतशुद्धघटिकां तु पूर्वक्रमें धनऋण कीजे । त्या लंबनें सूर्या चि गति गुणूनु ६० भागूनु कळादि आलें लब्ध समकळसूर्या तु पूर्वप्रकारें धनऋण कीजे । ये णें क्रमें लंबन स्थिर होय । तव पर्यंतर आणिजे ॥

## ॥ लंबनेन गुणितेति ॥

जेथें लंबन स्थिर होइल तया लंबनघटिका नें चंद्रसूर्य राहु चा गति गुणिजे । ६० भागूनु कळादिफळ घेइजे । आलें लब्ध चंद्रसूर्या सि लंबनक्रमें संस्कारिजे । समकळग्रहां सि दीजे । या चें विपरीत राहु स कीजे । स्थिरभूतलंबनें तात्काळिक ग्रह होति ॥

## ॥ भुक्त्यंतरमिति ॥

लंबन स्थिर जाहलें ठांई अक्षांश ठेऊनु त्या चि जीवा कीजे । ते जीवे नें चंद्रसूर्या ची गति अंतरकरूनु गुणिजे । १८०० ये णें भागु दीजे । ते कळादिअवनति होय । ते ४ भागिजे । अंगुळादिक होय । अक्षांश जे दिसे चे ते दिसे चि अवनति अंगुळादि । आतां लंबन तात्काळिक चंद्रां तु । लंबन तात्काळिक राहु फेडिजे । पूर्वप्रकारें पातोनशीतद्युतिबाहुजीवा । ये णें प्रकारें विक्षेप आणिजे । तो विक्षेप आणि अवनति । येक दिशा तरि ऐक्य । भिन्न दिशा तरि अंतर कीजे इतुक्या नें अवनतिसंस्कृतस्फुटविक्षेपु होय ॥

## ॥ स्थितीति ॥

आतां चंद्रग्रहणप्रकारें । चंद्रसूर्या चें बिंबमान आणिजे । ग्राह्यग्रहकबिंब ऐक्यकरूनु अर्धिजे । तें मानैक्यार्ध होय । या मानैक्यार्धां तु अवनतिसंस्कृतस्फुटविक्षेपु फेडिजे । उरलें शेष ग्रासांगुळें होति । तया मानैक्यार्धवर्गा तु । अवनतिसंस्कृतस्फुटविक्षेपवर्ग करूनु । त्या मानैक्यार्धवर्गा तु फेडिजे । ग्राह्यार्धेन ग्राहकार्धे युतोने ये णें प्रकारें स्थित्यर्ध आणिजे । आलें स्थित्यर्धघटिका द्विगुणिजे । त्या तिथ्यंतघटिका स्फुटमध्यलंबनसंस्कृत दोनि प्रति ठेऊनु । येके प्रति सि फेडिजे । येके प्रती सि मेळविजे । फेडिले प्रती च्या घटिका स्थूलस्पर्शकाळ होय । मेळविले प्रति स्थूलमोक्षकाळ होय । आतां स्थित्यर्धघटिकीं चंद्रसूर्यराहु । या च्या गति गुणिजे । ६० भागु दीजे । आलें लब्ध द्विगुणिजे । चंद्रसूर्या सि येके ठाइं फेडिजे । येके ठांई मेळविजे । राहु

सि या चें विपरीत कीजे । फेडिले प्रति स्पर्शकाळिचे ग्रह होति । मेळविले प्रति मोक्षकाळिचे ग्रह होति । तें स्थूळ स्पर्शकाळ ठेउनु । पूर्वप्रकारें नत साधिजे । तिथेनेता बाणहृता ग्रहार्धं । ये णें प्रकारें लंबन आणिजे । तें लंबन स्थूलस्पर्शकाळां तु संस्कारू । नतक्रमें करित जाइजे । लंबन स्थिरभूत जाहलेयां ठांई आपुल्या ग्रहां च्या गति गुणूनु स्वस्वग्रहां सि लंबनक्रमें संस्कारिजे । तें संस्कारूनु पातोनशीत ये णें क्रमें विक्षेप आणिजे । लंबन स्थिरभूत जाहले ठांई । गत्यंतरं लवगुणेन ये णें प्रकारें अवनति आणिजे । ते अवनति अणि विक्षेप पूर्वप्रकारें संस्कारिजे । तो स्फुटविक्षेप होय । तो स्फुटविक्षेप वर्गकरूनु मानैक्यार्धवर्गां तु फेडुनु । ग्राह्यार्धेन ग्राहकार्धे युतोने ये णें क्रमें स्थित्यर्ध आणिजे । ते स्पर्शकाळिची स्थित्यर्ध होय । आतां स्थूळ मोक्षकाळिच्या घटिका ठेउनु नत साधिजे । तया वरि तिथेनेता बाणहृता ग्रहार्धं य णें प्रकारें लंबन आणिजे । आलेया लंबन पूर्वप्रकारें । स्थूळमोक्षकाळघटिकां तु संस्कारित जाइजे । लंबन स्थिरभूत जाह लेयां ठांइ चंद्रसूर्य राहु च्या गति गुणूनु । ६० भागूनु लंबनक्रमें ग्रहां सि दीजे । ते मोक्षकाळिचे ग्रह होति । तो मोक्षकाळिचा चंद्र ठेऊनु पातोनशीतद्युति ये णें प्रकारें विक्षेप आणिजे । तो मोक्षकाळिचा विक्षेपु होय । तया विक्षेपा चा वर्गु कीजे । तो वर्गु मानैक्यार्धवर्गां तु फेडिजे । पूर्वप्रकारें ग्राह्यार्धेन ग्राहकार्धे युतोने । ये णें क्रमें स्थित्यर्ध आणिजे । ते मोक्षकाळिची स्थित्यर्ध होय । स्पर्शकाळिची आणि मोक्षकाळिची स्थित्यर्धे दोन्ही ठेविजे । तया दोहिं स्थित्यर्धां तु मध्यकाळिचें स्थित्यर्ध मेळविजे । इतुक्या नें स्पर्शमोक्षकाळिचें स्थित्यर्धे स्फुट होति । आतां सर्वग्रासुग्रहण जाहलेयां तरि । चंद्रग्रहणीं बोलिलेयां प्रकारें मर्दार्ध आणिजे । स्वल्पग्रहणीं नाणिजे ॥

## ॥ प्रागलंबनमिति ॥

प्राग्लंबनमिति ॥ अस्यान्वयः । यदि ऋणाख्ययोः स्पर्शमोक्षलंबनयोः "मध्याविलंबनात्प्राग्लंबनं अनल्पं भवेत् मोक्षलंबनं अल्पं

भवेत् ॥ यदि धनाख्ययोः स्पर्शमोक्षलंबनयोः मध्यविलंबनात् मोक्षजं अधिकं स्यात् प्राग्ग्रासं अल्पं स्यात् ॥

आतां स्पर्शमध्यमोक्ष तीन्हीं लंबनें ठेविजे । पूर्वनत जाहलेयां मध्यलंबना हूनु स्पर्शलंबन अधिक असावें । मध्यलंबना हूनु मोक्षलंबन उणें असावें । अपरनतिं मध्यलंबना हूनु स्पर्शलंबन उणें असावें। मध्यलंबना हूनु मोक्षलंबन अधिक असावें। आतां सांघितल्या प्रकारा सि लंबन विपरीत असे तरी । पूर्वनतिं मध्यलंबना हून स्पर्शलंबन उणें । मध्यलंबना हूनु मोक्षलंबन उणें । हा विपरीतक्रमु जाणिजे ।

## ॥ तदंतरेणेति ॥

सांगितलया प्रकारें असे तरि दोन्हि लंबनें अंतरकरूनु दोन्हि स्पर्शमोक्षस्थित्यर्धां तु मेळविजे । विपरीतप्रकारें असे तरि दोन्हि लंबनें अंतरकरूनु दोहिं स्थित्यर्धां तु फेडिजे । इतुक्या नें स्फुटें स्थित्यर्धें होति। आतां मर्दार्धा सि लंबनास्थित्यर्धें प्रकारें संस्कारिजे । आतां मध्यकाळिचें लंबन स्थिरभूत जाह- लेयां ठांईं लंबनसंस्कृतपर्व ठेविजे । तो मध्यकाळु जाणिजे । इतुक्या नें लंबनसंस्कृतस्थित्यर्ध येके प्रती सि फेडिजे । येके प्रती सि मेळविजे । आणि स्पर्शकाळु पूर्वनत । मोक्षकाळ अपरनत । या चें भिन्नकपाळ मेळविजे । ते दोन्ही स्फुट- स्पर्शमोक्षकाळ होति ।

## ॥ स्याद्वाहुरिति ॥

आतां चंद्रग्रहणप्रकारें ग्रासादिक अवघें साधिजे । इष्टग्रासु आणितां भुजे चा ठांईं लंबनसंस्कृतस्फुटस्थित्यर्ध घेइजे । अवनतिसंस्कृतस्फुटविक्षेपुकोटि जाणिजे ॥

## ॥ मार्त्तंड इति ॥

सूर्यग्रहणिं चंद्रबिंबा चा षोडशांशु ग्रस्तु जाहालेयां दिसे चंद्र अमृतकिरण ॥

॥ इति श्रीब्रह्मदेवाचार्य कृते करणप्रकाशे सूर्यग्रहणं नाम षष्ठाधिकारः ॥

---

## ॥ ऊनो ग्रह इति ॥

सूर्या ची गती हूनु जो ग्रह अल्पगति असे तो ग्रह भागा चे ठाईं अल्प होऊनु असे । तो पूर्वदिसे सि उदय होय । अणि सूर्या चे गती हूनु अधिकगति अणि भाग अधीक तरि तो ग्रह पश्चिमे उदय होय । आतां सूर्या चे गती हूनु अधिकगति अणि भागा चे ठाईं उणा ऐसें असतां तो ग्रह पूर्वे अस्तमान होय । सूर्या चे गति हूनु उणि गति अणि भागा चे ठाईं अधिक ऐसा जो ग्रह असे तो पश्चिमे अस्तमान होय ॥

## ॥ काळांशकैरिति ॥

आतां काळांश सांगेन । चंद्र १२ या भागा हूनु उणा असे तरि अस्तमान होय । अधीक असे तरि उदय होय । शुक्र ९ गुरु ११ बुध १३ शनि १५ भौम १७ या भागा हून ऊनाधिक्य सूर्या सिं असति जे ग्रह । याचा उदयास्तु होईल जाणिजे । या णें प्रकारें ग्रहां चें उदयास्तमान पाहत जाइजे ।

## ॥ ग्रहस्येति ॥

ज्या ग्रहा चें उदयास्त आणिजेल । त्या ची भुजाजीवा कीजे । ते जीवा त्रिभज्यें तु १२० फेडिजे । उरला अंकु अपुले अपुले विक्षेपें गुणिजे । विक्षेपु अणिता प्रकारु पुढें ग्रहयुतिं मध्यें सांगेन । भागु २९७ ये णें भागूनु कळादिफळ घेइजे । हें फळ अणिल्या ग्रहां चे आणि विक्षेपु येक दिशा तरि ग्रहां सि कळादि उणें कीजे । भिन्न दिशा तरि धन कीजे ॥

## ॥ क्षेपेति ॥

आतां आपुला अपुला विक्षेप ठेउनु अक्षप्रभे नें गुणिजे । १२ भागूनु कळादिफळ घेइजे । तें ग्रहां सि विक्षेपु दक्षिणे चा तरि धन कीजे । विक्षेपु उत्तरे चा तरि ग्रहा सि ऋण कीजे । हा पूर्वील[1] उदयास्तु आणिता क्रमु । आणि पश्चिमील उदयास्तु आणितां या चें विपरीत कीजे । दक्षिण विक्षेपु तरि ऋण उत्तरें तरि धन । हें पश्चिमेचें लक्षण ॥

---

१ पूर्वील, पश्चिमील, दक्षिणील, उत्तरील अशी तद्धितें पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर यां पासून होतात. दक्षिणिल किंवा दक्षिणील याचें स्त्रीलिंग दक्षिणिली. दक्षिणिली याची दुसरी विभक्ति दक्षिणिलिये.

## ॥ येष्योत्पादिति ॥

सूर्य अणि ज्या ग्रहा चें उदयास्तमान आणिजेल । त्या दोहिं सि अंतर कीजे । ते अंतरभागिं । जे राशि अंतरकेला ग्रह असे । ते राशि चा स्वोदयो ठेऊनु अंतरभागिं गुणिजे । हा क्रम पूर्व दिसे चा । पश्चिम दिसे चा उदयास्तु अणितां ग्रहा सि राशि ६ मेळऊनु । ते राशि चा स्वोदय ठेऊनु अंतरभागिं गुणिजे । भागु ३० दीजे । आलेया लब्धा सि मागुती १० भागु दीजे । इतुक्या नें जे लब्ध येतिल ते कालांश होति । या काळांशा हूनु ग्रहो अंशा चे ठाईं उणा असे तरि तो अस्तमितु होय ॥

## ॥ उक्तेति ॥

हे आलेया काळांशा सि अणि पहिलें सांगितलेयां काळांशा सि अंतर कीजे । त्या च्या कळा कीजे । त्या ६० सवर्णिजे । ज्या ग्रहा चा उदयास्तु आणिजेल त्या ची गति आणि सूर्या ची गति अंतरकरूनु ते ६० सवर्णून भागु दीजे । आलें लब्ध गतैष्य दिवस येति । ग्रह वक्रगति जाहला तरि सूर्या ची गति अणि ग्रहा चि गति मेळऊनु भागु दीजे । गतैष्य दिवस येति ॥

## ॥ इष्टांशकेति ॥

आणि गणितागत आलेयां कालांशा हूनु पहिलें सांगितले कालांश अधिक असति तरि आले लब्ध गतदिवस जाणिजे । इष्टांशा हूनु पहिले उणे असति तरि येष्यदिवस जाणिजे । हे अस्तमानिचा प्रकारु । उदया चा प्रकारु या चें विपरीतक्रमें पाहिजे ॥

## ॥ यदा रवरांशुरिति ॥

सिंह्य रासि ५।१३ भागासमान सूर्य असतां अगस्त्यु अस्तमाना थें[1] पावे । कुंभ रासि १३ भागासमान सूर्य असतां अगस्थि उदया थें पावे ॥

---

१ अर्थे=अत्थे=थे=तें.

## ॥ उदयास्ताधिकारो नाम सप्तमः ॥

### ॥ अक्षप्रभेति ॥

अक्षप्रभा ठेऊनु चंद्र विक्षेपें गुणिजे । ७२ ये णें भागु देऊनु कळादिफळ घेइजे । तें फळ चंद्रा सि अक्षप्रभा दक्षिणे ची आणि विक्षेपु दक्षिणे चा तरि तें फळ चंद्रा सि मेळविजे । विक्षेप उतर तरि उणें कीजे । या वरि भुजीकृतस्पष्टसहस्र-रश्मे ये णें प्रकारें चरार्ध आणिजे ॥

### ॥ प्राग्वदिति ॥

पश्चिम दिसे च्या चंद्रा चें शृंगोन्नत आणितां चंद्रा सि राशि ६ मेळविजे । त्या चंद्रा वरि पूर्वप्रकारें लग्न अणिजे । जे काळिचें शृंगोन्नत आणिजेल त्या कालिचया चंद्रा वरि सूर्या चे नि प्रकारें इष्टप्रभा आणिजे । क्रांत्यक्षयोगाविवरं । हा प्रभा आणिता क्रमु ॥

### ॥ चंद्रार्कयोरिति ॥

आतां चंद्रसूर्या ची क्रांति आणिजे । चंद्रा चे क्रांति सि वि-क्षेपसंस्कारु कीजे । आणि चंद्रसूर्या ची क्रांति अणिजे । चंद्रा च्यां क्रांति येक दिशा तरि अंतर कीजे । भिन्न दिशा तरि ऐक्य कीजे । ऐक्य अथवा अंतर करूनु । उरल्या शेषा ची जीवा कीजे । ते जीवा चंद्रा च्या इष्टकर्णें गुणिजे । भागु लंबजीवे नें दीजे । आलें लब्ध चंद्र जे दिसे चा होइल तें दिसे चें फळ होय ॥

### ॥ चांद्रेति ॥

आलें फळ अणि अक्षप्रभा येक दिशा तरि अंतर कीजे । भिन्न दिशा तरि ऐक्य कीजे । तें अंगुळादि इष्टभुजा होय । अणि कोटि ची कल्पनासंख्या १२ या चा वर्गु कीजे । अणि इष्टभुजे चा वर्गु कीजे । ते वर्ग मेळविजे । तया चें मूळ घेइजे । तो कर्णु होय ॥

## ॥ भानुरिति ॥

विक्षेपसंस्कृतस्फुटचंद्र ठेउनु त्या मध्यें सूर्य फेडिजे । शेष उरलें त्या चे भाग कीजे । ते ५ भागिजे । आलें लब्ध शितांगुळें जाणिजे । उरलें शेष १८० यां तु फेडिजे । मागुतां १५ भागु दीजे । आलें लब्ध अशितांगुळें ॥

## ॥ इंदोरिति ॥

आतां परिलेखा चें लक्षण । मध्यें बिंदु येकु दीजे । आणि भुजा जे दिसे ची होइल ते दिसे सि बिंदु नु भुजाप्रमाण शलाका दीजे । बिंदु नु पूर्व दिसे सि कोटि १२ प्रमाण शलाका दीजे । पश्चिम दिसे हूनु बिंदु अणि कोटि च्या ग्रहा मध्यें कर्णप्रमाणें शलाका तिर्यक् करूनु दीजे ॥

## ॥ कर्णकोटि इति ॥

कर्णा सि अणि कोटि सि अैक्य होय अैसें अंगुळें ६ मंडल लिहिजे । त्या मंडळा च्या पश्चिम दिसे पासूनु शीतांगुळप्रमाण शलाकाकर्णा पासूनु दीजे । तें उरलें मंडल अशितांगुळ होय ॥

## ॥ शीतांगेति ॥

अणि शीतांगुळा मध्यें असितांगुळें फेडिजे । तें अर्धिजे । त्या सि ९ भागु दीजे । आल्या लब्धप्रमाणें शलाकाकर्णु जे दिसे चा होइल तं दिसे सि ते शलाकाप्रमाणें शीतांगुळ मंडला चे ठाईं उन्नत कीजे । इतुकया नें शीतांगुळोन्नत सिद्ध होय ॥

॥ इति शृंगोन्नति ॥

---

## ॥ अनल्पेति ॥

अधिकगति च्या ग्रहा हूनु स्वल्पगति चा ग्रह अधिक असे तरि पुढें ग्रहयुति होय । आणि येकु ग्रहा वक्र- । येकु रुजु- । गति असे तरि येष्ययुद्ध होय । दोन्ही ग्रह वक्र असतां अणि शीघ्रगति चा ग्रह भागा चे ठाईं अधिक असे तरि येष्य-युद्ध जाणिजे । हें सांगितल्या प्रकारा सि विपरीत असे तरि गतयुद्ध जाणिजे ।

## ॥ अवक्रयोरिति ॥

आतां ज्या ज्या ग्रहा सि युद्ध होइल । ते ग्रह दोन्ही वक्र-गति असे अथवा रुजुगति असे त्या दोहिं ग्रहा च्या गति अंतर कीजे । आणि दोहिं ग्रहां सि अंतर करूनु त्या च्या कळा कीजे गत्यंतरें भागु दीजे । लब्ध दिनादिफळ येय । अथवा येकु ग्रहा वक्र-अणि येकु रुजुगति असे तरि । त्या च्या अंतरलिप्ता करूनु । त्या दोहिं ग्रहां च्या गति मेळउनु भागु दीजे । ते लब्ध गतैष्यदिवस होति ॥

## ॥ गत्यंतरेति ॥

आले गत-येष्य-दिवस ठेउनु । दोहिं ग्रहां च्या गत्यंतरलिप्ति नें गुणिजे । आणि त्या दोहिं ग्रहां च्या गति ऐक्य— करूनु भागु दीजे । कळादिफळ घेइजे । तें फळ येष्य दिवस तरि दोहिं ग्रहां सि मेळविजे । गत दिवस तरि उणें कीजे । इतुक्या नें ते दोन्हि ग्रह समकळ होति । अणि येकु ग्रहा वक्र असतां अणि येकु रुजु असतां या चें विपरीत कीजे । गतियोगें गुणिजे । गत्यंतरें भागिजे ॥

## ॥ नवादिनेति ॥

भौमादि ग्रहां चे विक्षेपु कळादि सांगिजेल । भौम ९० बुध १२० गुरु ६० शुक्र १२० शनि १२० आतां भौमादिग्रहां चें पातलव सांघिजेल । भौम ४० बुध २० गुरु ८० शुक्र ६० शनि १०० हे क्रमें चि जाणावे ॥

## ॥ युगेति ॥

भौम २४ बुध २६ गुरु ४२ शुक्र ४८ शनि ३० हे १० गुणिजे । आपुलालया शीघ्रकर्णें भागु दीजे लब्ध कुजादि पंच-ग्रहां चें कळादिबिंब होय ॥

## ॥ भौमेति ॥

भौम । शनि । गुरु । या तिघां सि दुसरें शीघ्रफळ नेदितां स्वस्वपातभाग फेडिजे । अणि बुधशुक्रा च्या शीघ्रोच्चा सि अपुलालें मंदफळ संस्कारून पातभाग त्या त्या चे फेडिजे ॥

## ॥ स्वंस्वंपातमिति ॥

अपुल्या अपुल्या पातभाग फेडिल्यां ग्रहा ची भुजाजीवा कीजे । त्या ची जीवा ठेउनु सांघितल्या स्वस्वविक्षेपं लिप्ति नें गुणिजे । स्वस्वचलकर्णं भागु दीजे । आलें लब्धकळादि स्वस्वविक्षेप होय । पातु फेडिला ग्रह जे दिसे चा होइल ते दिसे चा विक्षेपु जाणिजे । आतां चंद्रसमागमु अणितां सूर्यग्रहणप्रकारें चंद्रविक्षेपां तु अवनतिसंस्कारु कीजे ॥

## ॥ शरयोरिति ॥

ज्या ज्या ग्रहा चि युति होईल त्या दोहिं ची येक दिशा तरि अंतर कीजे । भिन्न दिशा तरि ऐक्य कीजे । त्या नाव मानैक्यार्ध । त्या मानैक्यार्धा हूनु ग्रहांतर अधीक असे तरि समागमुयुद्धयोग बिंबांतरयुद्ध होय ॥

## ॥ असमेति ॥

आतां दोहिं ग्रहां चा विक्षेप भिन्न दिसे चा तरि दक्षिण दिसे च्या विक्षेपा च्या ग्रहा नें हारविलें । उत्तर दिसे च्या विक्षेपा च्या ग्रहा नें जिंतिलें । आणि दोहिं चा विक्षेपु येक दिशा तरि उण्या विक्षेपा च्या ग्रहा नें हारविलें । ये णें प्रकारें ग्रहां चि हारिजिति जाणिजे ॥

## ॥ समकळयोरिति ॥

जे वेळे चे समकळ ग्रह दोन्हि होति उदयात्पूर्वक ते वेळे चें नत साधूनु सूर्यग्रहणप्रकारें लंबन आणिजे । त्या लंबनघटिका जितुक्या येति तितुक्या घटिकां युद्ध होय जाणिजे ॥

॥ इति श्रीब्रह्मदेवाचार्यकृतौ करणप्रकाशे ग्रहयुत्यधिकारो नाम नवमः ॥ शके १५४१ सिद्धार्थी संवत्सरे । नृसिंहभट्टात्मज नारायणेनेदं पुस्तकं लिखितं संपूर्ण ॥

## ॥ अथ कार्मुकसिंजनीग्रहणकर्म विना लघुक्रांतिसाधनं ॥

स्युः क्रांतिखंडानि यमांगराम ३६२
कुब्ध्यग्नयो ३४१ गोनवबाहवश्च २९९॥
षट् त्र्यश्विना २३६ खेषुभुवो १५० द्विबाणा ५२
युक्तायनांशग्रहबाहुभागाः ॥ १ ॥

तिथ्युद्धृताल्लब्धमितानि तानि
योज्यानि भोग्याहतशेषकस्य ।
तिथ्यंशकैः क्रांतिकळा भवंति
युक्तायनांशाद्ग्रहगोळदिकाः ॥ २ ॥

### ॥ अस्यार्थः ॥

३६२ । ३४१ । २९९ । २३६ । १५० । ५२ । अनुक्रमें चि क्रांतिखंडकें हिं जाणावीं । भुज २ । १८ । ३२ । १५ । या चे भाग ७८ । ३२ । १५ । या सि १५ भागूनु फल ईल ५ या वरूनु पांचा खंडका योग कीजे । तो इतुका १३८८ होय । भोग्यखंडक ५२ या णे ३ । ३२ । १५ । हे अंक गुणिजे ते इतुके १८३ । ५७ । या सि १५ भागूनु कळादिफळ ईल १२ । १६ । या सि खंडकयोग मेळविलया नें

( ह्या पुढें कांहीं पानें गहाळ )

# प्रस्तावना



प्रस्तुत चरित्र कऱ्हाड येथे देवांच्या दफ्तराचा गळाठा पाहतांना सांपडलें. निरंजनस्वामींचे नातू भगवान यांनीं हें चरित्र रचिलें. प्रस्तुत प्रत बहुत जुनाट आहे. दुसरी एखादी तरी जुनी प्रत शोधा अती सांपडेल ह्मणून बहुत खटपट केली, पण सफल झाली नाहीं. तेव्हां मिळाल्या त्या एक्या प्रतीवरून च प्रस्तुत प्रत छापिली आहे. मूळ प्रतींत अगदीं ढोबळ कान्हामात्रांच्या ज्या चुक्या दिसत होत्या त्या सुधरून व फार च थोड्या स्थलीं ऱ्हस्वदीर्घांचे फेरफार करून पाठ तयार केला आहे. मूळ ग्रंथांत अथपासून इतिपर्यंत बिनतूट लिखाई आहे. सबब वाचनसुखार्थ दर विषयाला नवें कलम मीं पाडलें आहे.

वि. का. राजवाडे.

# श्रीनिरंजनस्वामी कऱ्हाडकर

## यांचें चारित्र

॥ श्रीगुरु गजानन ॥

॥ श्रीगणेशाय नमः श्री कुलदेवताय नमः निर्गुण निरंजन गजानन त्या चे सगुण चरित्र—वर्णन पुर्वी श्री—**करहाटक**—क्षेत्री **तुक पाठक**, गोत्र सांख्यायन, शाखा वाजसनेइ कुल—दैवत दक्षण—केदार व आउंध चि येमाइ ॥ तेंव्हां त्यास पुत्र संतान नव्हते. यास्तव त्या चि स्त्री **पार्वतिबाई** यानी नृसीव्हास प्रदक्षिणा वर्षभर तीन लक्ष केल्या व **तुक पाठका**नि शणेश—तिर्थी बैसोन वेदा चिं पारायणे बहुत केलि व जपतपादि साधने बहुत केलि तेव्हा स्वप्नी श्री गणपती ने वर दील्हा की तुह्मास पुत्र होइल त्या चे उदरी आह्मी अवतार घेउन गण-पती—च्यरीत्र प्रगट करू॥ ऐसा **पार्वतीबाईस** श्रीनृसीव्ह स्वप्नी वर दिल्हा की तुह्मास पुत्र होईल त्या चे नाव नरसिंव्ह ठेवणे ॥ अनंतर काले करुन पुत्र जाहाला त्या चे नाम **नरसिंव्ह** ठेविले ॥ दो वरसा चे मूल जाहलीया वरी **तुक पाठक** श्री कासीयात्रेस गेले तेथे **पार्वती-बाईस** विस्वनाथ-क्षेत्री दुसरा पुत्र जाहाला ह्मणोन त्या चे नाव **विस्वनाथ** ठेविले ॥ मग घरास आलीया वरी दोघा मुला चे व्रत-बंधविवाहा नंतर वेदशास्त्राधेन जाहाले **विश्वनाथ पाठकास** संतान हि जाहाले परंतु **नरसिंव्ह** पाटकास संतान न जाहाले ह्मणोन चिंताग्रस्त होते ऐसीयासि नरसिंव्ह पाठका चे मैत्र **गणेशबावा** नामे करून परमहंस थोर तपस्वी मौजे सवादे येथे डोंगरा वरी सिद्धेस्वर माहादेव याच्या देवळा मधे तपश्चीर्या करोन राहत होते ते **कृष्णास्नानास** अखंड **कराडी** येउन **नरसिंव्ह पाठका** चे घरी राहत असेत त्यानी आज्ञा केली की

तुमच्या वडिलास श्रीगणपती चा वर आहे तरी उभ्या चतुर्थ्या एकवीस करा त्याचे आज्ञे वरून **नरसिंव्ह पाठक** व त्याची स्त्री **परशराम नाा क्षेत्रे** याची कन्या **कृष्णाबाई** या दोघानी उभ्या चतोर्थ्या येकवीस केल्या फलाधेस जाहाला तरी गर्भसंभव जाहालीया वरी प्रतिमासी रजस्वला होत असेत पुराणकथाश्रवण तीर्थयात्रा उपोशणे करावी हे च ढोहाळे होत होते परान्नाचा वास आला ह्मणजे वांति होये आठवे मासी माघ शुा चतोर्थी दोन प्रहरा रेवती चा प्रथम चरण सिद्धीयोग भोमवासर वणिजकरण शके १५५९ इश्वर नाम संवत्सरीं ॥ **परशराम नाइक क्षेत्रे** कऱ्हाडकर यांस दोघी कन्या येकी चे नाव **कृष्णाबाई** ती **नरसिं पाठकास** दिल्ही होती प्रसूतकाळी यथास्थीत बाळंतपण व्हावे ह्मणून वडील बहीण **कोंडूबाई** मौजे **तुळसणसवादें** येथील कुळकर्णीण तिने आपल्या बापाच्या घरास नेले. **कृष्णाबाई**स पुत्र जाहाला ह्मणजे यलह्मा कुलदेवते चें नाम ठेउं ॥

( २ ) मग जन्म पुत्राचा जाहालां मग **येल्होबा** नाम ठेविलें **कऱ्हाडी** जन्म जाहाला तेव्हां **गणेशबावानी** मुला ची चिन्हें पाहीलीं तो ध्वजपद्मउर्ध्वरेखा पाईं ललाटि पंचरेखा विसा बोटीं चक्रें आकृति गजानना चि करी सरस्वति धन आयुष्य यश पद्मकरमुळी पंचरेखा कोंपराचे ठाइ माहायात्रारेखा नेत्र पाय कर नखे ओष्ट आरक्त पाहुन प्रसन्नवदनास प्रदक्षिणा केल्या नमन केले मग देव जन्मला **नरसिंव्ह पाठकास** सांगीतलें तुह्मास पुत्ररत्न जाहाले त्यानी जन्मकाल वर्तविला जन्मनाव देव ऐसे आले सूर्य ब्रहस्पती शुक्र उंच स्थानी पडीले व सौम्य ग्रह केंद्रस्थानी त्रिकोनी पडिले व खलग्रह अरिभुवनीं सहजस्थानी पडिले या नंतर **गणेशबावा** बोलिले की निर्गुण निरंजन देव तुमच्या उदरी अवतरला आहे ॥

स्थानं न मानं न च नाद बिंदु-
रूपं न रेखां न च वर्ण वर्णौ ॥
दृष्टं न दृष्टया न श्रुतेन श्रुत्या
स्तस्मै नमो देवनिरंजनाय ॥ १ ॥

हा देव अवतरला आहे यास्तव निर्गुण निरंजन च नाव ठेवणे बधुत्वे करून या सतसंगती—सुखाचा हेत मजला हि फार आहे यास्तव मी हि तुमच्या उदरास येतो परंतु माझे नाव गणेश च ठेवणे ऐसे सांगून प्रयागी देहपतनार्थ आनुष्टान करीत होते तो इकडे **कृष्णाबाई** चा अवतार पूर्ण जाहाला तेंव्हां मुलाचे सवरक्षण **कोंडु आका** सवादीयांत होती त्यानी च केले मुलाने कधी दुधपाना साठी रुदन केले नाही अखंड हाशवदन गाइच्या दुग्धाने संरक्षण जाहाले नामकर्ण करावयासी मुलास आणून नामकर्ण केले निर्गुण **निरंजन** नाम ठेविले **नरसिंव्ह पाठक कुर्देवड्यास** गेले होते यास पुत्र जाला ह्मणोन **आनंदमूर्तींचे गुरु रघुनाथस्वामी** यानी कपिला व्याली गाय पाठवून दिली ती तीन वरसे दूध देत असे तीचे दूध देवास पाजीत येके दिवसी रांगत जाऊन गाईच्या स्थनास मुख लाउन दुध प्याले त्या दिवसा पासून देवाची क्षुदेची वेळ आली ह्मणजे गाई पासी सोडीत तीन वरसे अन्न भक्षिले नाहीं ॥

( ३ ) एकदा मुलास **आउंदच्या** देवीच्या नमस्कारास नेले तो तेथे **मौनीबावा** परमहांस आले होते त्यानी मुल मांडी वरी घेउन

गणराज भज + + + + + + + कीर्तनात् ॥
भक्तिज्ञानविरागेन त्रिलोक मुध्धरस्व भो ॥ १ ॥

हा शिलोक भूरजपत्री लिहोन ताइती घालोन सवरक्षणातें मुलाच्या गळी बांधिला ॥

( ४ ) धाकुटपणी खारट तिखट कडू आंबट गुळ चिंच हे पदार्थ आवडत नसत सुद्रस्पर्श जाला ह्मणजे [illegible] हीय शिळे उच्चीस्ट

घातलीया दुसऱ्याचे पात्री जेऊं घातलीया वांति होय घृत आवडत नसे लाब करोन वाहाडा ह्मणत ह्मणजे उष्ण तुपात पाणी घालोन धार सोडली ह्मणजे स्तुस्ट होयेत ॥

( ५ ) धाकुटपणी मुला मध्ये खेळताना कथा करावी ह्मणावे की मला प्रेम आले ह्मणोन नेत्रास अश्रुपात आणावे

( ६ ) गणेशबावास कृष्णाबाइ चे वर्तमान कलता च देशास येउन पदर पसरोन कन्या मागोन बहुत आग्रहे करुन नरसिन्ह पाठका चे लग्न करविले मग प्रयागास पुनरपि जाउन देहपतन केलें॥

नरसिन्ह पाठक प्रथम मुलाचे नाव न घ्यावे यास्तव देव या जन्मनामे करून बोलावीत ॥

दुसऱ्या वरसा पासून गजाननाचा छद मुलास ॥

त्रितीय वरसी लघु पताका ( क )रून मुले मेलवून यात्रे चें चिन्ह दाखवावें

चतुर्थ वरसी मुले मेळऊन लाहान पाषाणाचे देव मांडोन मोरया मोरया ह्मणोन नाना पत्रे पूजा करून नांचावे

पाचवे वरसी मुला सह वर्तमान कृष्णातीरी गारगोट्याचे टाल करून देवा पुढे गणेश-नाम-कथे चे चिन्ह दाखवावे

साहावे वरसी वृतबंध केला विश्वनाथ पाठक चुलते यानी वेद-अभ्यास आरंभिला परतु त्याचे मन तेथे बैसेना ह्मणौन चुकाउन गणेशतीर्थी स्नानसंध्या करीत बैसेत यास्तव क्रोधे करून विश्वनाथ पाठकानी परसात बोरी च्या झाडास येक दोन वेला बांधून ठेविले कोंडिले परतु देवाने येउन हात सोडिले येके दिवसी हात कोण सोडितो ह्मणोन लपोन पाहिले तो आपले आपण च हात सुटले

( ७ ) गणेशतीर्थास मुल जाऊं लागले हा कोठे जातो ह्मणौन फोकाटी घेउन पाठी मागे चालिले तों मुलाने गणेशतीर्थी स्नान करिता च स्वेत हस्ती विश्वनाथ पाठकाच्या आगा वरी धावला भयाभीत घरास पलोन आले चिंताग्रस्त जाहाले की मुलास काही

विद्या येइना तेंव्हां मुल घरी येउन होमसालेंत बैसला होता तो येक दोन वेळा वेदश्रवण जाहाला होता तो पाठ ह्मणो लागला तेंव्हां त्यास कलले की हा देवाचा अंश आहे

(८) **नरसिंव्ह पाठका** चे यजमान **विसावा नाईक गव्हार** त्यांचे घरी **नरसिंव्ह पाठक** वेंकटेशमाहात्माचा जप करीत होते तेंव्हां नाइक वेंकटेशाचे यात्रेस गेले तेंव्हां बोलिले की पाठकजीस पुत्र जाहाला ह्मणजे वेंकटेशा चें नाव ठेऊं त्या वरून **कोनेरी** नाव ठेविलें ते कोन्हेरी या नामे करून बोलावीत होते ॥

(९) मुला मध्ये क्रीडा करते वेळेस योग्याचीं चिन्हे पाहून मुले योगीराज ह्मणून बोलावित असेत परान्न असले ह्मणजे लटके च वांति होती ह्मणोन उठोन येउन आजोली **परशराम नाइका** चे घरी जेवावे दक्षणा उपाध्यास द्यावी ॥ मग तेथे जप करीत वसेत ॥

(१०) वडील कोणा यजमाना कडे गंगातीरी पाठवीत तेथे जे दक्षणा येइल ते ब्राह्मण दक्षणे साठी कलह करीत त्यास देत असेत देकार व सांतीकपुष्टीकास गेले तरी तेथे कोणी अंध पंगु वस्त्र-हीन दुर्बल पाहिले त्यासी आंगावरील वस्त्रे व कडी कुडक्या मुद्या पवित्रे कटीसुत्रादिक द्यावि यामुळें **नरसिंव्ह** पाटक देशावरास ग्रामंतरी गेलें असता **विश्वनाथ** पाठकानी येके दिवशी वस्ता हर-वितोस बाहेर जाउ नको ह्मणोन वरात कोंडोन ठेविले देवाचा नेम की गणेशतीर्थी गणपती स्थापीला होता त्याची पूजा केल्या वाचून अन्न न घ्यावे यास्तव उपोषण केले तों रात्री **विश्वनाथ** पाठका च्या स्वप्नात ब्राह्मण बोलिला कीं आह्मांस उपोषण आजी तुह्मीं करविले मग दुसरे दिवसी पंचा टोपी देउन बाहीर वागाव-यासी निरोप दिल्हा ॥ **जगंनाथ( त्रिंबक )**बावा रामदासीयापासी जाउन देव बोलिले की आह्मास मंत्र जपावासा होतो त्यावरून **श्रीराम-दासस्वामी** अकस्मात **कराडास** आले होते त्याच्या भेटीस

पूजासाहित्य घेउन देवास नेले **जगंनाथ( त्रिंबक )बावानी** प्रार्थना केली की या मुलास येक मंत्र सांगावा तेंव्हा **रामदास** देवास बोलिले कोदंडपाणी–सीता–लक्ष्मण–युक्त रामाचे सावळ्या मूर्तीचे ध्यान करा मग मंत्र सांगतो तेंव्हां देवानी ध्यान केले तों ध्याना मध्ये सूर्पकर्ण सुंडादंड ब्रह्दुदर मुर्ती वांचोन कांहीं दुसरे दिसेना ऐसे **रामदासास** सागीतलीया वरी **रामदासानी** मस्तकी हात ठेविला नमस्कार हि केला बोलिले की साक्षात् गणपती तू आहेस गणपती तुला उपदेश करील ॥

छंद लागला मानसी हे पद त्या वेळेस केले ॥ **जयराम स्वामीचा** अवतार पूर्ण जाहाला ते वेलेस **विठावाबावास** सांगी-तले की आह्मी या संस्थान ची माळ कराडकर **नरसिंव्ह पाटका** च्या मुलास देतो या देहा च्या सार्थकास कराडास जाल तेंव्हां त्या मुल, करवी सार्थक करोन येथे घेउन येणे त्या वरून **विठावाबावा कराडास** आले होते तो **जयरामस्वामींनी** ब्राह्मणरूपे रुद्राक्ष-माळ गणेशतीर्थी देवा च्या गळीं घातली ते देवापासी जपा ची माळ अखंड होती तो ब्राह्मण अदृश्य जाहला **विठावाबावानी** देवा करवीं सार्थक करावया साठी **नरसिंव्ह** पाठकास सविस्तर सांगीतले परंतु ते बोलिले आह्मास एक च पुत्र आहे देता येत नाहीं ॥

(११) येकदा देवास घेऊन निगडीकर **रंगनाथस्वामी** यांच्या घरांस **नरसिंव्ह पाठक** आले त्यास बोलिले की हा आमचा पुत्र देवपिसा आहे जपावयासी मंत्र सांगा ह्मणतो हे ऐकोन **रंगनाथ स्वामीनी** मुलास साष्टांग नमस्कार घातला आलिंगन दिल्हे योगचिन्हें पाहोन अष्टभाव उत्पन्न जाहाले बोलिले की हें साक्षात् निरंजनस्वरूप अवतरलें आहे हा च विस्वास सर्वास उपदेश करोन तारील विनायका वाचून देव नाहीं हे पद **रंगनाथस्वामीनी** केले

(१२) मग श्री **कासीराजपंत** पालखीपदस्त थोर धंदा करोन

प्रतिष्ठानी राहात होते ते येकदा कन्यागतविध करावयास कृष्णातीरास आले त्यां चे तीर्थपुरोहित **नरसिंव्ह पाठक** यां चे घरी राहिले ते परम गणेशभक्त होते देवार्चन जपादी उपासना पाहोन स्वामीची निष्ठा बैसली विनायका काकुलती हे पद त्यांजपुढे ह्मणोन अनुग्रहार्थ प्रार्थना केली ते बोलिले की लेकुरपणी हे गोष्टी घडणार नाहीं यावरी पुनरपी अमर्यादेने कैसें ह्मणावे या दुःखे भयें करोन श्रावन मासीं मास पर्यंत ते राहिले होते तों प्रतीदिवसीं आहार न्युन्य जाहाला शरीर बहुत शुष्क जाहालें भाद्र( पद ) शुध चतुर्थीस शमी मंदार दुर्वा घेउन गणेशतीर्थी पार्थिवगणेशा ची मूर्ती करोन पूजिली गणपती चे ध्यान करोन हा अभंग ते समई ह्मटला

विनायक देवा । कैसी नेणो तव शेवा ॥

ते क्षणी प्रेम अष्टभावयुक्त मुर्छा आली ते वेळेस सप्त वर्षांचा अळंकारयुक्त मुंजा मूल येउन कानी येकाक्षर-बीज सागीतले सावध होतांच तो मूल कोठे दिसेना मग क्षणक्षणा अष्टभाव होत आहेत तसैच घरास येवोन आजि माहाचतुर्थी गुरूपूजा करावी ह्मणोन **कासीराजबावा** पासीं आले तों गणपती च्या मुर्तीस पूजासमारंभ होत आहे कीर्तनपुराणादिक चर्चा होत आहेत तों साष्टांग नमस्कार त्या चे चरणी घातला पायावर उदक घाळून तीर्थप्राशन केलें त्यानी पुसिले की कंठ सद्गदीत कां जाहाला पूर्व वृत्तांत सांगतांच येकांती नेवोन कोणतें अक्षर सांगीतलें तें पुसिलें तों माहागणपतीचें येकाक्षर-बीज कळलें तेंव्हां बोलिले की श्रीगणेशमाहामंत्र तुज सांगीतला तुझे नाम गणेशदास ऐसे असोन त्या मंत्रा चें अनुष्ठाना चे विधान सांग त्यानीं सांगीतलें गणपती चे गुण वर्णावयास आज्ञा दिल्ही स्वकीय कवितेने गुरूमूर्ती पुढे रात्रौ कीर्तन करीते वेळे गणपती ची मूर्ती नृत्य करीता **कासीराजस्वामी** च्या दृष्टीस पडे ॥ **कासीराजस्वामी**नि पुसलें कि या मुळाची मातुश्री काय जाहाली घरीच्यानि सांगीतलें कीं मेली ऐसें ऐकतां मुळाने शोक मांडिला मग रुदन करीत

**आत्रेयाचे** घरीं **कोंडूआका** होती त्यांच्या गळा पडोन वर्तमान सांगी-तले किं तु माझी माता असता तुला मेले ह्मणतात ती बोलली की ते ह्मणतात ते खरे आणि तू ह्मणतोस ते खरे ॥ म्यां पालण केले यास्तव तू ह्मणतोस ते खरे ॥ ऐसी ममता पाहून **कासिराजस्वामी-**नि वेदांतसार देवास पढविला तप करा ह्मणोन आज्ञा करुन प्रतिष्ठानास गेले ॥

(१३) ग्रामस्त ब्राम्हण **वांगीस** देकारास गेले येक ब्राम्हण देवास हि घेउन गेला ॥ येते वेळेस हा काही ब्रीतिस उपद्रव करील म्हणोन या भयें करुन कोरडे विहिरितु ढकलोन दिल्हें गाळात जाउन पडले उदका साठी कोणी ग्रहस्त आले त्यानि काढोन घरास पावते केले परंतु ज्याने ढकलिलें त्याचें नाव सांगीतलें नाहीं ॥

( १४ ) **विश्वनाथ** पाटकानीं हा मुल काही मेळविना म्हणोन **सैदापुर** व **गोवारे** सांगावयाची आज्ञा केली यास्तव पंच्यांग घेउन पाटलाची च्यार घरे सांगोन सैदापुर चे देवि पासी व चवडेश्वरी पासी श्री गणपतीचीं पदें करोन बैसतसेत सहजा मधे मिळेल ते घेऊन साईंकाळीं घरास येत या मुळें हा मुल जोतिष आटोपावयास शाहाणा व्हावा ह्मणोन **टेंबू** चे पाटलाचे स्वाधिन केला की या करवी गाव चालवणे मग देवानी **टेंबू** चे खोलेस्वरा पासी शूद्रा चे परसातील पाला भक्षून तीन महिने अनुष्टान केले ॥

( १५ ) हे वर्तमान तीर्थरूप देशावरास गेले होते **विश्वनाथ** पाटकास कळता च मुलास नेत होते परंतु आई नामक **कोंडूआकाने** बलात्कारे घरास आणिले

( १६ ) या नंतर **नरसिंव्ह** पाटकाची दुसरी स्त्री **वेणूबाई** यांला पुत्र जाहाला त्याचे नाव **गणेश** ठेविले ते हि परम तपश्वी विरक्त शुक्लत्रितिने योगक्षेम करून तीन प्रहर पर्यंत अनुस्टान करित असत ॥

(१७) पुर्वि **कोंडुआका नरसिंव्ह पाठकास** बोलिलि कि येक पुत्र तुह्मास आहे वडील पुत्र तुमच्या हि कार्या चा नाही आह्मी धाकुटपणा पासून या चे बहुतसें संवरक्षण केलें आह्मास हि पुत्र नाहीं हा पुत्र आह्मास देणें कुलकर्णा ची व्रित्ती यास सिकऊन **तुळसण** व **सवादें** दोनी गांव कुळकर्णा चे यास देऊं ह्मणोन बोललि **नरसिंव्ह पाठका** च्या चिति नव्हतें परंतु **विश्वनाथ पाठका** चे आग्रहास्तव मुलाचे लग्न करून **कोंडूआका** बराबरि **सवाद्यास** पाठविला परंतु तेथे सिधेश्वरा जवळ श्रीगणपती चीं प्रतिमा स्थापून येकान्न भक्षुन वर्शभर येकाक्षरी जप केला मग **कोंडूआका तुळसणा** मधे राहावयास आली तेथे हि पर्वता मधी गणपती स्थापून दुध–पान दोन वर्षे अनुस्टान केले ॥

( १८ ) मग **येळगाव** चा पाटील शिष्य जाला **येळगाव** च्या खिडीत पुर्वी गणपती होता तो देवानी स्थापून वर्षभर तेथे अनुस्टान केले

( १९ ) भाद्रपद शुध चतुर्थीस **रुद्राजी चंदो देशपांड्यास** सांगोन **कराड** चा बाजार नेऊन **येळगाव** च्या गणपती पासी पताका कथा संतर्पणादि करू लागले प्रतिवर्षी यात्रा भरवीत होते मग दस्टांत जाला कीं हे यात्रा मोरेश्वरी करीत जा तेव्हा **मोरेश्वर** कोठे आहे ह्मणऊन मोरेश्वरास आले पुराणप्रसिध स्तळ रमणीक पाहून परम संतुस्ट जाले तेथ चिंचवडकर **नारायणदेवास** द्रिस्टांत जाला की देवाचे पालखी पुढे उजवे बाजूस कथा **निरंजनस्वामी** करतील समस्त ब्राह्मण मिळून त्याची प्रार्थना करणे डावे बाजूस तुह्मी कीर्तन करणे व **मोरो पाटीलास** सांगितले की पानपत्रावळ व वैरण सरपणाचे साहित्य करीत जाणे या प्रमाणे येकूणहातर यात्रा **मोरेश्वरा** च्या देवानीं केल्या ॥

(२०) येकदा **मोरेश्वरीं** अळवणी पीठ भक्षोन पुरश्चरण केले च्यैत्र

मासी **करे** च्या येकवीस प्रदक्षणा करावयासी **सासवडा** पावतो चालले **सोपान देवा** च्या समाधी जवळ **नागनाथा** च्या देवळांत येक **दिगंबर** पाहातां च देवानीं नमस्कार केला **अवधूताने** वर्तमान पुसताच सांगितले की **करे** च्या प्रदक्षणेस जातो तेंव्हा परमहंस बोलिले की आमचे नाम **अवधूत** योगी आह्मास ही प्रदक्षणेस येणे आहे तेंव्हा दोघे हि चालले देव बरोबर उपकरणी नारेला ची वजीर्णे घोंगडी दोन पंचे टोपी तारक त्या मार्गी चालतां अनेक व्रक्ष आरण्यातील फले फुले उदका समीप वाळूमधे पत्रावली वरी घालोन आणीक पत्रावळी वरी वाळू पसरोन उकडोन अग्नीने मग भक्षीत ॥

( २१ ) मार्गी **अवधूत** बैसावयासी हरण सुकर कोल्हा रोही व्याघ्र घेत असत जेथे अस्तमान अरण्यात होईल तेथ च राहावे त्या प्रांती वस्ती नव्हती **अवधूताने** गणेशगीता देवास पढविली नाना कवतुके या प्रमाणे एकवीस प्रदक्षणा करून **मोरेश्वरी** पारणे करून **अवधूत** बोलिले तीन वेळ तुह्मास दरशण देईन ऐसे बोलून अदृश्य जाहाले ॥

( २२ ) मग देव **कराडास** आले तो **नरसिंव्ह पाठका चा** काल जाहाला सार्थक केलीया वरी **विश्वनाथ पाटक** चुलते बोलिले की आमचे बाप भाऊ मुले पुर्वी बालेघाटा कडे गेले आहेत उरली जें वींती तुह्मी आटोपणे आह्मी यजमाना ची घरे आटोपितो त्यास देवानी उत्तर दिल्हे की आमची वींती गजानना चे पाय आहेत हे पद केले ॥

॥ पुण्या देसी माझे माहेर साजणी ॥

तेंव्हां ससार आटोपि ना ह्मणोन पुस्तक वस्त्रपात्रा चा वाटा न देतां बाहेर घातले ॥

( २३ ) सापत्न माता बंधु स्त्री आपण कमलेश्वरा च्या देवळात राहिले हे वर्तमान **गंगाजी दादाजी** सुभेदार गणेशभक्त कोटांत होते त्याणी ब्राह्मणवेसी जवळ पोफल्या च्या पूर्वे कडे पंचवीस हात रुंदी साठ हात लांब वाडा होता तेथे गणपती ची पाशाणप्रतिमा

होती ते स्थान देवास दिल्हे व **विसावा** नाईक **पोफले** यानी विपत्ती काली **नरसिंव्ह पाठका** पासून सतावन व्हन घेतले होते त्या बद्दल स्थळ देवा च्या स्वाधेन करून बारा हात रुंदी साठ हात लांब देउन **परंडिया** कडे गेले तेव्हां हें पद केलें ॥

॥ गणेशा तुज विणे क्षण न ठेवी मज ॥

(२४) एके दिवसी योगक्षेमा साठी शुक्ल वृत्ती करू लागले तेव्हा इष्ट मैत्रानी निशेध केला त्यास उत्तर दिले हे पद ॥

॥ गणेशा विसाव्या जीविच्या जिवलगा ॥

**वाई** पासून **पंढरपुरा** परीयंत **कुरुंदवाडा** पासोन **कोल्हापुर** पर्यंत ब्राह्मणा चे घरोघर सांगीतले असे की पहिली गणेशा ची वैरण एक्या केळींत ठेवणे ते धान्य खंड्या च्या खंड्या लोक घरास पाठवीत ते हि ब्राह्मणा करवी लुटवीत प्रतिवरसी सर्वश्वे दान ब्राह्मणास करीत असत प्रतिदिनी आपण अलवणी पवित्र पदार्थ एक्या पात्रात उजव्या च हस्ते काडोन भक्षीत हे व्रत दोन वरशे केले ॥

(२५) एके दिवसीं सासुरवाडीस गेले त्यानी नैवद्या चे अनेक पदार्थ आणून दिल्हे त्याच्या समाधानार्थ मान्य करून एकीकडेस ठेविले दुधातील वलवटे शाखा भक्ष चरु वरण मात्र उजव्या हस्ते पुर्वव्रत करिता सासू स्वशुर पाहोन श्रम करून बोलिले की लोक ज्या प्रमाणे संसार वेव्हार करीत आहेत त्या प्रमाणे वेव्हार करावा ॥ त्यास उत्तर दिल्हें हें पद

॥ मज नावडे हो आणिक ॥

(२६) भिक्षे चे धान्य पुस्कळ येऊं लागले ह्मणोन ब्राह्मणास सर्पण करू लागले काही दिवस चाललें पुढे दुस्काला च्या मुळें बहुत पात्र होऊं लागले घर चीं करावयास कटाळलीं यास्तव सूर्योदया चे पूर्वीं श्नान करोन **अगासीव** पर्वता चे गुंफेत जप करीत असत रात्री घरास येत हे लोकांत प्रगट होता च तेथे ही दर्शनास लोक जाऊं

ला ले या उपद्रवा मुळे **वारुण** प्राति **पाडुंबरे** गाव आहे तेथे जाऊन राहिले पर्वता चे दरीत गणेश स्थापोन दोन प्रहर पावेतो स्नान-संध्या करोन येते वेलेस उंबरें घेऊन घरास येत ती उंबरें **आकाबाइसी** नेऊन पंचमाहायज्ञ करून उभयता भक्षीत तव एके दिनी तपोवनास देव गेले असता एक वाणी बारीक तांदला च्या गोण्या दोन घेऊन **आकाबाई** मांडवात होती तेथे येउन बोलिला की लवकर आपले तांदूल घेणे आह्मास पुढे मिठाचे खेपेस जाणे आहे मग **आकाबाईनी** पुसिले की कोठून आला तुमचे नाव काय तो बोलिला **सुपे** देशांत **निरंजन**बावाचा मैत्र **मोरोपंत** कोण आहे त्याने वेठ आह्मास सांगीतली की हे तांदूल **निरंजन**बावाचे घरीं देउन मिठा चे खेपस जाणे आमचे नाव **गणसेट** तेव्हां **आकाबाई** बोलिली की त्याचे आज्ञे वचून तांदूल आह्मास घेता येत नाहीत ते रागास येतील तेव्हा वाणी रागे भरला की वाघा चे रान आमचे संगती चालले आह्मास एकटे राहता येत नाही ह्मणोन गोण्या उसऊन तांदूल ओतोन गेला तो माध्यानकालीं देव हि आले तांदूल कोणाचे ह्मणोन पुसिले तेव्हा **आकाबाईनी** सविस्तर वर्तमान सांगता च कंठ सद्गदीत जाला नेत्रास अश्रुपात आले देवा तुला फार श्रम जाले देवा तू कां श्रमलास ह्मणोन बहुत श्रमी जाहले त्या गावीं दुर्बल ब्राह्मण होता त्या चे ग्रही ते तांदूल नेउन दिल्हे

|| सर्वांपरी कुलक्षण ||

|| परी मी तु ज ची शरण ||

हे पद ते समई केलें ||

(२७) येथे देवास संकट पडते ह्मणून पुनरपि **कराडास** आले निमजग्या पासीं पुर्वी लक्ष्मी चे देवालय होते तेथे अनुस्टान करीत असत तो ग्रामात एक सावकार होता त्या ची कन्या गतभर्तृका देवा पासी जाऊन प्रतिदिनी बोले की अनुग्रह द्यावा तेव्हा देव उतर तीस देत की स्त्रियास अनुग्रह आह्मी देत

नाही मग तिने क्रोधे करून संभर पुतळया ची माळ घर ची चोरोन सोनारास विकली घरी बोभाट जाहाला तिच्या अंगी चोरी लागली तेंव्हां ती बोलिली की लक्षुमी च्या देवळात गोसावी बसतो त्याने मजला चाळऊन माळ घेतली आहे असे सांगतां च देव घरास आलिया वरी ते ग्रहस्त द्वारीं येउन बसले दोन उपोशणे करविली. मग सोनारा चे सदनी ब्राह्मण जाउन लताप्रहार केला की तूं माळ घेतली ती ज्याची त्यास देणे नाही तर तिसरे दिवसी मरसील मग प्रातःकाळीं सोनार भयभीत होऊन पडला त्याने आपले स्त्रीस स्वप्न-अवस्था सांगितली तेंव्हा ते स्त्रीने येऊन सावकारास सागितले की य ब्राह्मणा च्या गळा तुह्मी कां पडतां तुमचे कन्येने माळ अणोन आमच्या घरधण्यास विकिली आहे ते माळ आपली घेऊन जाणे मग ते ग्रहस्त माळ घेऊन आपल्या घरास येऊन कन्येस सिक्षा केली तेंव्हा हे पद केले

॥ जन हे त्रिविधा परी चे ॥
॥ गुज न कले अंतरी चे ॥

(२८) मग जनांत राहिल्याने अनेक उपद्रव लागतात ह्मणोन अरण्यांत जाऊन **ठेंभू** च्या खोलेस्वरा पासी एक संवत्सर तपस्चर्या केली **कराड** चे ब्राह्मण दहा जण सिस्ट जाऊन **कराडास** घेउन आले त्या वरी एके दिवसी **अवधूत** योगी अर्धरात्री द्वारा पासी येउन **निरंजन** ह्मणोन हाक मारिली देवानी कपाट उघडोन पाहिले नमस्कार केला तेंव्हां ते बोलिले जे दिवटी चा उजेड जिकडे दिसेल तिकडे येणें त्या पाठी मागे चालते वेळेस दिवटी मात्र दिसे त्या चे श्वरूप दिसे ना तैसे च दिवटी चा उजेड पाहत सूर्योदयास **मुद्रेश्वरास** गेले प्राथःकाली **अवधूत**योगीराजानी दरशन देउन सात दिवस तेथे राहोन चौऱ्याऐंसी आसने व चक्रभेद व बंधत्रय व मुद्रा कला व छायापुरुष ही लक्षणे देवास सांगोन आपण अदृश्य जाहाले देव

हो घरास येउन एकदा **चाफळास** गेले तेथे अनेक माहापुरुष अनेक साधने अनेक विद्या त्याच्या पाहोन हे दाहा श्लोक केले

॥ तुझे भक्त देवा असंख्यात कोटी ॥

देवानी रात्री गणपतीपर तेथे कथा केली मग प्रातःकाळीं **कल्याण-बावा** व **देव रामदासस्वामी** ची तप करावया ची गुहा पाहावयासी गेले तों भयंकर एक कपी गुहेतून निघाला एकहस्ती मना च्या श्लोका ची वही होती ते **कल्याण** गोसाव्या च्या आंगावर टाकिली दुसरे हस्तीं चिटोवरी हा श्लोक लिहिला होता ॥

॥ तपें तीर्थयात्रा व्रते यज्ञ दाने ॥
॥ घडे त्यास जो स्वात्मरूपास जाणे ॥
॥ मना इंद्रिया जिंकितो सत्य वाचा ॥
॥ जगी धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥

हे चिटी **देवा** कडे टाकोन तो कपी गुहेत अदृश्य जाहाला तेंव्हा **कल्याण** गोसावी बोलिले की **रामदासा** चा अवतारसमाप्ती-समय जवळ आला ते वेळे मना चे श्लोक केले परंतु त्या श्लोका ची वही कोठे हरपली होती ते आजि **रामदासानी** दिल्ही ऐसे बोलून दोघे हि **चाफळास** आले ॥

(२९) एके दिवसी सिवरात्रीस सिधेश्वरा पासी जाउन देव कीर्तन करीत होते तेथे **नाडोलीकर मल्हार** गोसावी आले होते त्याणी उतम कवित्व ऐकोन बोलिले की गण यथास्थित साधले नाहीत ऐसे कवित्व केलियाने बहुत दोष आहे करू नका ऐसे ऐकोन

॥ साव्रडे माणे ॥

हे पद केले

(३०) **देव** परम चिंताग्रस्त जाहाले **मल्हार** गोसावी तो घरास गेले देवानी निश्चय केला की श्रीगजाननाने आपले गुण वर्णावयासी [illegible] दिल्हे नाही यास्तव हा देह च ठेवणे नाही ऐसा निश्चय करून

**धर्मा** च्या पर्वतावरी उपोशण करीत बैसले एक उपोशण जाहाले दुसरे दिवसी **देवास** संकट पडतां **मल्हार** गोसाव्याच्या रूपे श्रुतिबोध-छंद लक्षणा चे पुस्तक आणून **देवास** पढविले मग आज्ञा केली की **नाडोलीस** आमच्या घरास तुह्मां चला आह्मी हि काही कार्य आहे ते करोन सवे च येतो मग देव **नाडोलीस** गेले तो **मल्हार** गोसावी भोजन करीत होते त्यास बोलिले की आह्मास घरास बोलाऊन तुह्मी अगोधर कसे भोजनास बसला ते बोलिले की आमची भेटी कोठे जाहाली होती मग देवानी सविस्तर वर्तमान सांगता च पात्रा वरून उठोन दोघास हि अस्टभाव उत्पन्न होता च दीर्घ स्वरे रुदन करू लागले **मल्हारी** यासी **धर्मा** चे पर्वता वरी दोन स्लोक केले होते ते त्यास दाखविले

॥ मल्हारीशर्मा कविराज मोठा ॥ २ ॥

व **नाडोलीस** आलियावरी तिसरा स्लोक केला

॥ मल्हारीरूपे गणनाथ आगें ॥
॥ येऊनि छंद श्रुतिबोध सांगे ॥
॥ देऊनिया पुस्तक गुप्त जाला ॥
॥ ध्याई मना तच्चरणांबुजाला ॥ १ ॥

मग **देवानी** एक्या पात्री सर्व पदार्थ पाक केला दोघानी भोजन करून दुसरे दिवसी देव घरास आले **गणेशगीते** ची टीका व **चरित्र-भाग** श्लोक-चालि चे केले ॥

( ३१ ) पूर्वी चुलत्या पासी होते तेव्हा च **आकाबाईस** **बाहाण्य** आल्या वरी गर्भाधानास मूर्त पाहिला त्या दिवसी प्रातःकाळी जोतीश्या चे गाव **कोरेगाव** तेथील **एकविरे** चे देवळात लपून बैसले **विश्वनाथ** पाटकानी तेथील पाटिलास भोजनास बोलाविले होते तो **एकविरे** च्या पायां पडावयासी गेला तेथे देवास पाहोन बोलिला की घरी श्रीचे वोटभरण होते आहे तू का येथे लपलास मग बळात्कारे त्या **कराडास** घेऊन आला तो येथे प्रातःकाळा पासून सर्व देवळे

घरे गंगातीरे परवत आरण्य शोधून ब्राह्मण सांगून स्वईंपाक करून पुढे मुहूर्त नाही ह्मणोन परम श्रमित होती तो अकस्मात् यासी आणिले मग सर्वांनी हरशयुत टाली पिटोन विधी उरकला वडिलानी दोघास एके कोठडीत कोंडिले तेंव्हा **अवधूत** योगीराजाने आसन योगसाधन मुद्रासाधन सांगितले होते त्याचा अभ्यास सूर्योदया परीयंत देव करीत असत **आकाबाईस** निद्रा आली ह्मणजे एकीकडे निद्रा करीत या प्रमाणे कितीएक दिवस गेले मग **आकाबाई** च्या मातुश्रीस वर्तमान कलता च देवा चे मैत्र आच्यार्य होते त्या पासी बोभाट नेला तेंव्हा त्यानी आच्यार्यप्रदीप व विश्वादर्श हे दोन्ही ग्रंथ देवास सांगितले त्या वरून स्त्रीपुरुषवेवहार सीध जाला ॥

( ३२ ) एकदा **गोविंद नाईक** सावकार **कन्हाडी** होता तो गावास गेलिया वर त्याची श्त्री **सकु** होती ती देवास ह्मणे कीं अनुग्रह करा हे ह्मणत आह्मी स्त्रियास अनुग्रह देत नाही मग तिने **त्रिंबक बावा रामदासी** एके दिवसी **गन्हारलक्ष्मी** च्या पुजारणी च्या घरास येऊन सामुग्री व धोत्रजोडा १ आणून दिल्हें की स्वामी ची मजवर कृपा होय ते करणे त्याच्या पूजे चे साहित्य आणून देते तुह्मी भोजनास स्वामीस सांगा मला ऐते वेलेस बोलावा मग त्यांची पूजा मी करीन मग पुजारणीने देवास नैवेद्यास सांगितल्या वरून देवानी स्वहास्ते पाक आरंभिल्या वरी पुजारणीस पुसिले की दुग्ध शर्करा बारीक तांदूळ हे साहित्य तूं दुर्बळ असता करावयास कारण काय ती बोलली की **सकू** चा हेत आहे मग देव बोलिले की श्त्रीयांस आह्मी अनुग्रह देत नाही या साहित्याचे द्रव्य जे खर्चिले असेल ते देऊं धोत्रे मज नको हें ऐकोन **त्रिंबक गोसावी** गुरू केला घरी ३०० व्हन्न होते ते त्रि॥ नेऊन दिल्हे त्यावर भर्तार ग्रामास आला त्याने घरी द्रव्य नाहीसे पाहोन श्त्रीस पुसिले ती बोलिली की **निरंजनबावा** गुरू केले त्याचे पूजेस खर्चिले उरले ते त्यास दिल्हे हे ऐकोन **गोविंद नाईकाने** दिवानात सांगतां च देवा च्या घरास चौकी

पाठऊन घर लुटोन नेलें देव गावास गेले होते मग गावाहून **कोपड्यास** आले तेथें वर्तमान ब्राह्मणानी सांगितले की आपले घर लुटोन नेले मग बोलिले की ईश्वरा चे चित्तास आलें तें उत्तम ॥

॥ विश्व सुखी होय जेणे ॥

हे पद केले ॥

( ३३ ) मग रात्री घरास आले **विस्वनाथ पाठक** रागास आले **देव** बोलिले की आह्मी अनुग्रह केला नाहीं ह्मणोन **टेंभू** च्या **खोलेस्वरा** पासी उपोशने अनुष्ठान करीत बैसले एके दिवसी **गोविंद नाा** सोनारा च्या घरी व्हन वळखले त्याने सांगितले की **त्रिंबक गोसावियाने** मोडायास दिल्हे मग **त्रिंबक गोसावियास** दिवाणात नेता च बोलिला की तुमच्या स्त्रियने दिल्हे आहेत तेव्हा स्त्रीस आणून शासन केले ती बोलिली की सत्य पुजारणीने हि साक्ष दिल्ही **गोविंद नाइकानी** व्हन **त्रिंबक बावा** पासून घेतले मग ग्रामस्तानी सन्मान करून स्वामीस आणिलें ते घरी आलिया वर वस्तभाव लुटोन नेली होती ते आणून दिल्ही मग देवानी ब्राह्मणास वाटिली ॥

( ३४ ) **सिदो बावा** माहा पुरुष त्यांची माळ जपाची गमावली त्यानी देवा पासी येउन निश्चय केला की गोवारियाच्या डोहात जीव देतो तेव्हा देवानी निश्चय केला कीं आजि दशमी एकादसी द्वादसीस भोजन करून रात्री उभयता देहत्याग करू ऐसा उभयतांचा निश्चय जाहाला मग एकादसीस रात्रौ कीर्तन होत आहे तों आभंग दोन ह्मटले

॥ रुद्राक्षाची माळा तुझ्या स्मरें ॥ ० ॥

॥ अदृष्टी जे होते ते चि जाले मज ॥ ० ॥

तो घटिका एक जाहाली कथे मधे ब्राह्मण कृष्णवर्ण वृद्ध एक आला तो बोलिला जे अहो देव तुमची माळ हे आह्मास सापडली घेणे ह्मणून बोलिला आणि अदृश्य जाहाला ॥ मग देवें बहुत खेद करू लागले की पुरते दरशण जाहाले नाही मग प्रातःकाळीं पारणे केले ॥ माळा प्रप्त जाहाली ॥

( ३५ ) एकदा **काशीराज स्वामी** च्या दर्शनास **प्रतिष्ठानास** गेले होते ते रात्री कथे मधे

॥ अलंकार—वदन ॥

हे पद ह्मटलें तेथे कोणी पंडीत होते ते ह्मणू लागले की यास प्रमाण-वाक्य काय हे ऐकोन देवानी निश्चय केला की प्रमाण सापडलीया वाचोन आपणास देह ठेवणे नाही उपोषणे करीत **गोपाला** नामे ब्राह्मण घेऊन उभय गोदातीरस्त ब्राह्मणापासी गणपतीचरित्रा चा शोध घेत चालले तो **आष्टी** च्या अलीकडें **पोखतपुरी गोलेगावास** गेले तेथे गणपती-भक्त तेथील जोसी होता त्याने भोजनास बोलाविलें बोलिले की उपोशण का करिता तेव्हा देव बोलिले की गणपती चा स्तव मीळाल्याविणे भोजन होणार नाही मग त्या ब्राह्मणे गणपती ची दोन उपनिषधें व स्तवराज गणेशसहस्त्रनाम देवोन पारण्यास प्रार्थना करू लागला त्यांच्या संकटा स्तव स्वहस्ते पारणे केले ज्या गावास जात तेथे कोन्ही आले त्याने सांगितले ह्मणजे ह्मणत की आमचे गुरू बाहीर आहेत ते येतील मग **गोपाळास** धाडीत आपण भिक्षे च्या पिठा चे पानगे करून भक्षीत **प्रतिठानास** आले मग **कासीराज**स्वामीस व पंडितास उपनिषध दाखवितां च त्याची समस्या पूर्ण जाहाली॥

( ३६ ) एकदा प्रथम च **पंढरी** चे यात्रेस गेले तेथे रामकृष्णपर कथा गुणानुवाद ऐकिले मग स्वामीस खेद जाहाला की गजाननपरी काही क्रीडा-चरित्रभाग नाही ह्मणून श्रमी होऊन **कऱ्हा( डा)** स आलिया वर

॥ रोमें गणीक-मुख-आंबुज आसतांना ॥

ऐसा श्लोक केला ॥

( ३७ ) तो कृष्णातीरी **वुरुणबाहे** तेथील ब्राह्मणास दृष्टांत जाहाला की तुझा घरी गणेश-पुराणा ची पोथी कऱ्हाडी **निरंजनस्वामीस** देणे त्या ब्राह्मणे पुस्तक देवास देता च देव बोलले की आधी

आह्मास गती नाही आह्मी वैदिक त्याहावयास हि ओकाश नाही मग तो ब्राह्मण देवघरी राहिला रात्रौ देवास स्वप्न जाहालें जे कोन्ही एक ब्राह्मण आला तो ह्मणू लागला की वेदाचा अर्थ लावतो तैसाच याचा हि अर्थ लावाल पुस्तक ठेउन घेणे मग पुस्तक पाहून चरित्र-भाग वर्णिला मनोरथ पूर्ण जाले

(३८) श्रीगुरू **निरंजन-स्वामी श्रीमोरेश्वर** ची यात्रा करून क्षेत्र **कराड** घरास आले ते समई चित्तात हेत जाहाला जे कासीयात्रेस जाऊन त्रियस्थली करून **मोरेश्वरी** चे यात्रेस भाद्रपद सुध चतुर्थी यावे घरी मी यात्रेस जातो हे कलो देऊं नये मी कासीयात्रे जातो मज खर्चास काही धन देणे हे मागो नये ऐसा मनात च धरून आश्वीन जाहालीया वरी जावे ऐसे ह्मणून घरी होते तो **कोपर्डे नरसिया** चे उतरेस आहे तेथील कुलकर्णीया ची पत्नी **कृष्णाबाई** ची बहीण **जीऊबाई** स्वामी चा उपदेश तीस होता तीस रात्रीं निद्रिस्त असता द्रिस्टांत जाहाला **श्रीनिरंजन** देव कासीयात्रेस जातात त्या बराबरी यात्रेस जाणे इतका उपदेश जाहाला मग **जिऊबाई** प्रातःकाली क्षेत्रास **देवास** पुसावयास आली तो देव **स्नानास** **गणेशतीर्थास** गेले वरी विचारिले जे **देव** कोठे आहेत **देवा** ची मातुश्रीने सागितले जे नदीस आंघोलीस गेले मग ते नदीस गणेशतीर्थास गेली **देव** संध्या करीत नदीतीरी बैसले त्यास नमस्कार केला का **जिऊबाई** आला तेव्हा **जिऊबाई** बोलिली जे रात्रीं मज निद्रिस्त दृष्टांत जाहाला जे स्वामी कासीयात्रेस जातात त्या बराबरी तू जा तुह्मास विचारून तुह्मी निघाल तेव्हा तुह्मा बराबरी जावे हे विचारावयास आले तेव्हा **देव** बोलिले जे आह्मी जात नाही तेव्हा **जिऊबाई** बोलिली जे माझी आण तुह्मी जात नाही हे खरे च मज सांगणे मग **देव जिऊबाईस** बोलिले जे तू कोन्हास सांगेनास तरी मी खरे सांगेन तेव्हा **जिऊबाईने देवा** ची पाया ची आण वाहिली मग **देवानी** सांगितले कासीयात्रेस जावे

हे सत्य परंतु घरी मातुश्रीस कळाले ह्मणजे ते व बंधु व बायको हे त्रिवर्ग येतो ह्मणतील ऐसे आहे लोकास हि कळो देऊ नये मी यात्रेस जातो मज खर्चास द्या ह्मणो नये तुजला येणे असले तर आह्मी घरोन निघोन उंबरजेस येतो तेथे तू येणे मग उभयता त्रियस्थली करोन मोरेस्वरी चे यात्रेस भाद्रपद–चतुर्थी येऊ ऐसे सांगतां च जिऊबाई आपल्या घरास कोपर्डेस जाऊन आपले खर्चास घेऊन उंबरजेस नेमिल्या दिवसास गेली तो देव हि घरी कोन्हास कळू दिले नाही खर्चास काही घरोन घेऊन जावे तो घरी काही नाही मग एक तांब्या घेऊन माधु लाड दुकानदार यास दाखविला याचा पैका काय तो देणे त्याने तांब्या च्या १॥ भारास सगण्या त्या घेऊन उंबरजेस गेले तेथे जिऊबाई गेली मग उभयता ची भेटी जाहाली मग निघोन यात्रेस गेले वाटे जातां मजलीस जिऊबाईने स्वैंपाक करावा समयास कोन्ही ब्राह्मण आला तरी त्यास हि जेऊ घालावे ऐसा नेम जिऊबाई चा पुढे गंगातीरास यात्रा गेली तेथे तीर्थविध करावा ऐसे आहे मग देव जिऊबाईस बोलिले की तीर्थविध करावा तेव्हा जिऊबाई बोलिली जे मी काही तीर्थविधी करावयास आले नाही मी स्वामी ची सेवा करावयास आले हे सत्य ह्मणता च देव बोलिले जे सत्य च आहे परंतु यात्रेस जावे तीर्थविध करावा हे खरे ते करणे मग तीर्थविध करून पुढे गेली अंजनठाण्या चा पर्वत उतरले तेव्हा क्षीधेतृषेने फार पीडा केली तेव्हा जिऊबाईस पाणी मागितले तो पाणी कोठे नाही तो अकस्मांत विहीर एक मळा पाहिला तेथे स्नाने केली माळयास काहीं द्रव्य देऊन मळयातील काही भक्षावया चे पदार्थ घेऊन देवास नैवेद्य दाखविला मग पुढे गेली तो अंगवस्त्र राहिले होते ते जिऊबाई आणावयास माघारी आली परंतु विहीर व मळा कोठे दिसे ना अंगवस्त्र मात्र सापडले बऱ्हाणपुराहून धुळकोटास गेले तेथे यात्रा बहुत मिळाला दाहा पाच घरे होती

ती भरोन निघाली कोठे राहावयास स्थळ मिळे ना गावा बाहीर मठ होता तेथील बैरागी व्याघ्रानें भक्षिला होता तेथे जाऊन राहिले ग्रामस्ताने सांगितले जे या झाडीत व्याघ्र आहेत गावाबाहीर राहू नका परंतु देवा वरी भार घालोन राहिले तेथे रात्रीस एक तस्कर आला तो व्याघ्र सोकला होता तो तस्करा वरी धावोन तस्कर व्याघ्राने मारिला ॥

(३९) पुढे नर्मदा उतरले वरी **वोंकार-ममलेश्वरा**स गेले तेथील बाण व नर्मदे-गणेश विकत मिळत होते ते न घेता नर्मदे च्या तीर्थात कुंडात जाऊन स्वहस्ते बाण व नर्मदे गणेश काढले त्यातील एक गणेश **आनंदमूर्ती**स दिला गुरुपादुका मात्र त्या चे घरी होत्या मग नर्मदा-गणेश दिल्या वरी पुस्कळ देव जाहाले ॥

(४०) पुढे **उजनी-महांकाला** चे दरशन घेऊन **सारंगपुरा**-स गेले तेथे यात्रेतील एके बाई चे व्हन तीस हारवले तेव्हा ती बहुत खेद करू लागली तिचे दुःख पाहोन देवास हि अश्रुपात आले परंतु जवळ काही नाही मग **जिऊबाई**स पुसिले की तुह्मा पासी काहीं द्रव्य आहे काय **देवा**सी प्रतरणा करू नये ह्मणून **जिऊबाई** बोलिली की तेतीस व्हन वरने घेतले होते त्यात तीन व्हन खर्च जाहाला आता तीस व्हन आहेत ते देवानी आह्मास देणे ह्मणून **जिऊबाई** पासी मागोन घेतले आणि तिसा व्हना ची गाठोडी बांधोन जे बाई चे व्हन गेले होते ते बाई पासी जाऊन तीस **देव** बोलिले की तुझे व्हन आह्मास सापडले होते ते तू घेणे ह्मणून दिल्हे आणि लुगडे एक दिल्हे ॥

मग दुसरे दिवसी खर्चावयास काही नाही मार्गी कोणास उपद्रव न द्यावा ह्मणून सुल्क-वृत्ती हि करीत नव्हते अय चित-वृत्तीने एका वृक्षा खाली बैसले होते यात्रेकरू पुसत की स्वयंपाक का करीत नाही त्यास उत्तर देत की श्रमोन आलो स्वस्थ जालो ह्मणजे करू तों अस्तमान जाहाला मग एक ब्राह्मण तिद्या ची सामुग्री

**व पत्रावली व** विंधन सर्व साहित्य घेऊन आला चिंताग्रस्त एकेकडे **बैसला** तो **देवानी** त्यासी पुसिले तुह्मी चिंताग्रस्त का जाहाला तो **बोलिला** जे सामुग्री आहे परंतु स्वयंपाक करता येत नाही यात्रेकरू हि कोणी करून देत नाहीत त्या मुळे दोन उपोशणे पडली तेऱ्हा **देवानी जिऊबाईस** आज्ञा केली की या ब्राह्मणास जेऊ घालणे ब्राह्मण बोलिला जे पंगतीस ब्राह्मण घेतल्या वाचून भोजन करीत नाही मग संकटास्तव **जिऊबाइनी** स्वयंपाक करून तिघानी भोजने केली हे **पछोरात** ऐसे वर्तले मग **देवरास** गेले तेथें हि तोच ब्राह्मण साहित्य घेऊन येऊन तैसे च भोजने जाली या वरी **देवानी** त्या ब्राह्मणास पुसिले जे तुह्मी यात्रेत कोठे दिसत नाही तुमचे ठिकाण कोणते नाम काय तुह्मी उगे च आह्मास अन्न काय निमित्य घालिता तो ब्राह्मण बोलिला की तुमच्या मागे पुढे आह्मी येतो तुह्मास पाहातो परंतु तुह्मी आह्मास पाहात नाही अन्न तो ईश्वराने केले असे आमचे नाही नाम **विनायक** भट ऐसे सांगोन ब्राह्मण गेला मग **देव जिऊबाईस** बोलिले की प्राथःकाली आह्मी यात्रेच्या आघाडीस जातो तुह्मी पिछाडीस राहणे तो ब्राह्मण आढळतो की नाही हा शोध काढू त्या प्रो च दुसरे दिवसी केले परंतु शोध लागला नाही **जिऊबाई** बोलिली की तो ब्राह्मण एडसरसा होता मागे कोठे राहिला असेल त्या दिवसी **जिऊबाई** च्या श्वपनांत तो च ब्राह्मण बोलिला की बारीक तांदूळ तूप लोणकडे आमचे च भक्षोन आह्मास च वेडसर ह्मणतीस बरी भोळी आहेस ॥

(४१) पुढे **सुरूजेस** गेले तेथे **किसनसांव** सावकार होता त्यास पुत्र नऱ्हता त्याने कासीविश्वेश्वरास नवस केला होता की पुत्र जाला तरी विसा सहस्राचे देवालय बांधो

त्या दिवसी त्या सावकारा च्या श्वपनात इश्वेश्वरे येऊन सांगितले की यात्रेत **कराडकर निरंजन स्वामी** आले आहेत आकृती लहान आहे त्यास न कळता त्या चे बरोबरी **जिऊबाई** आहेत त्यां

पासी विसा सहस्त्रा ची हुंडी करून देणे ह्मणजे आह्मास नवस पावला ऐसे श्वप्न पाहोन त्याने विचार केला की देवास हि ज्या भक्ता चे अगत्य ऐस्या सत्पुरुषा चे कार्या वरी द्रव्य पडले तरी देवळा च्या खटपटी पेक्षा श्रीयस्कर च आहे आमचे संपत्ती चे सार्थक होईल ऐसे ह्मणोन **कासी** च्या **लाला-साव** सावकारा वरी हुंडी चिठी लेहून घेऊन **कासी** च्या यात्रेत शोध करून एका वृक्षातळी आक्रती सागितल्या प्रा। वळखोन नमस्कार केला पुसिले की **निरंजन स्वामी** आपण होयेत की काय **देव** बोलिले तुह्मी कोण किमर्थ आला तो बोलिला की श्वामीस नैवेद्या चे साहित्य देतो स्वामीनी देवास नैवेद्य करावा ऐसा सेवका चा हेत आहे **देव** बोलिले की अयाचित अन्ना चा भोक्ता गजानन आहे मग सावकाराने निरोप घेऊन वेगळ्या रीतीने **जिऊबाई**स बोलाऊन हुंडीचिठी देऊन सांगितले की आह्मी आपला मनुष्य एक **कासी** परीयंत तुमचे सांगाते देतो बाजारात साहित्य घेऊन देईल तुह्मी बाजार परीयंत एत जाणे देवास कळो न देणे वाटेस चौक्या हि चुकऊन देईल ऐसे सांगोन नैवेद्या चे साहित्य पाठऊन दिले

( ४२ ) दुसरे दिवसी निघोन दर मजल **प्रयागा**स आले सावकाराने बोलिल्या प्रमाणे मनुष्य देऊन मार्गी साहित्य करून चौक्या चुकऊन **प्रयागी** माघस्नाना चा कर चुकऊन **देवा**स व **जिऊ-बाई**स स्नाने सुरक्षित करविली यात्रकर्‍यास स्नानं-समई धकाबुकी होय परंतु यास ढका न लागता माघस्नान झाले तेथे कोणी एकाने सांगितले की येथे देहपतन केलियाने इछिला पदार्थ प्राप्त होतो हे मनी धरोन **देवा**नी माघस्नाना चे समाप्तीस—

॥ जन्मोजन्मी देई तुझी उपासना ॥

हे पद ह्मणोन देहपतनासाठी अवघी त्रिवेणी मधे फिरले परंतु गुढघ्या इतके च उदक लागले इकडे **जिऊबाई देव** कोठे गेले ह्मणून घाबरी जाली होती तो **देव** हि आले सविस्तर वर्तमान सांगितले दुसरे दिवसी सर-

स्वतीकुंडा चे पूजेस एकटे च **देव** गेले तों तेथें कोणी नव्हतें कुंडा वरी तिघी मुली बसल्या होत्या परस्परें हारिद्र-कुंकुम वाटीत होत्या एक क्रिष्ण-वर्ण क्रस्ण-वस्त्र दुसरी गौरवर्ण श्वेत-वस्त्र तिसरी रक्तवर्ण रक्तवस्त्र त्या **देवास** पाहोन बोलिल्या की हात चे टाकून पळण्या चे पाठीस लागावे काय तेव्हा **देव** बोलिले शाहाणा आहे तो हाती चे टाकून पळण्या चे पाठी लागत नाही मग तिघी जणी बोलिल्या आह्मा वरी दुरनिमित्य का देत होता या वरी **देवानी** चित्ती आणिले की पूजा केलिया वरी यासी उतर द्यावे मग सरस्वति-कुंडा-मधे उतरोन पूज्या केली वरते आले तो तिघीजणी अदृश्य जाहाल्या संगमा पासी श्वेत-क्रृष्ण उदका चे मधे आरक्ता-सरस्वतिबोघ पाहून पूज्या करोन

॥ भक्ती भागीरथी ॥

हे पद केले ॥

(४३) बिराडी आल्या वरी सर्व अभिप्राय समजोन **जिऊबाईस** सांगितला तेथून **कासीस** गेले व क्रृष्ण-कुंडाचे देवली **गंगाधर-बावा** तपस्वी होते तेथे बिराड घेतले मनकर्णीके स्नान करून नित्य-यात्रेस विस्वेस्वर-अन्नपूर्णे च्या देवला पासी गेले तो बहुत दाटी पाहून द्वारा पासी च पूज्या करून तीन दिवस ऐसे च बिराडास आले चवथे दिवसी **गंगाधर-बावा** चे स्वप्नी जटिल गोसावी येऊन बोलिला की **निरंजन-बावा** ची फार दिवस आह्मी वाट पाहात असता आमच्या घरास का येत नाहीत बाहिरोन च जात आहेत हे स्वप्न **गंगाधर-बावानी देवास** सांगितलीया वरी देवला मधे जाऊन यथास्तित पूज्या करू लागले ॥

**जिऊबाईनी** हुंडी लाविली माणसास निरोप दिल्हा पावलीया चे उतर देऊन ॥

( ४४ ) एके दिवसी **देवानी जिऊबाईस** पुसिले की आजि परीयंत पोट-खर्च व चौक्या-खर्च व प्रयाग चा कर कशान जाहाला

आह्मा पासी काही नाही तुमचे हि तीन व्हन वेचिले काय असेल ते सत्य सांगणे मग **जिऊबाईने** स्वामींसी प्रतरणा करू नये ह्मणोन सविस्तर वर्तमान सांगितले मग **देवास** परम दुःख वाटले बोलिले की यात्रे मधे प्रतिग्रह शिवस्वा चा का केला आमच्या पोटास खंडीभर धान्य नित्य लागत नाही पानग्याचे पीठ भलते ठायी देव देतो ऐसी **देवा**नी आज्ञा केलिया वरी हुंडीवाल्या चे घरी चे धन काही **जिऊबाईने** आणिले नाही अयाचित वृत्ती वरी कालक्षेप करू लागली कणीकेचे पानगे डांगरासी भक्षीत **कराडा** पासून त्रिस्थल यात्रा करून **कराडा** परीयंत तुपा चे वेले **जिऊबाईने** घेतले होते त्यातील दर्भांकुराने अन्न सुध करीत असत ॥

(४९) एके दिवसी पंचक्रोसीस चालिले आसीपासी एक ब्रह्मचारी भेटिला तो **देवास** बोलिला की प्रतिग्रह आणि सिवस्व या दोघां चा अंगिकार न करावा ऐसा नेम शरीर आहे तो वरी होणार नाही **देवा**नी पुसिले कैसा होणार नाही तेव्हा तो ब्रह्मचारी बोलिला की आपणाहून मातापितर घरी असोन वेगळे आहेत त्यांच्या वीर्या च्या सप्त धातूंचा प्रतिग्रह याणे केला आहे आणिक सिवा चे चैतन्यशक्ती च्या इच्छाशक्ती ज्ञानशक्ती हे सिवस्व देही ह्मणोन त्या कडे आले तेव्हा **देव** बोलिले की हे वचन कर्मकांडास विरुध येईल ह्मणता च ब्रह्मच्यारी–बावाने चवतीस उपनिसिधे **देवास** पाचा दिवसा ची पंचक्रोसी वरी येत सांगितली **वारुणे** पासी विनायका जवळ येता च **देवा**नी पुसिले उपनिशधा चे पुस्तक आह्मास देणे ते बोलिले की आह्मी **अद्वैतानंद-स्वामी** सर्व सन्याशां चे गुरू त्या पासी असतो आमच्या मठास येणे तेथे पुस्तक आहे ते तुह्मास देऊ त्या वरून **देव अद्वैतानंदा**पासी जाऊन वर्तमान सांगितले **अद्वैतानंद-स्वामी** बोलिले उपनिसिधे आहेत परंतु ब्रह्मच्यारी नाही मग **देव** श्रमित होऊन उपनिसिधे मात्र घेतली ॥

( ४६ ) एक दिवसी **अद्वैतानंदास** भिक्षेस सांगता च ते बोलिले भिक्षा एक ठायी आली आहे ऐसे ऐकोन चिंताग्रस्त बिराडास येऊन **जिऊबाईस** बोलिले की एका दो दिवसा गयेस यात्रा जाणार आहे चित्ती हेत होता की **अद्वैतानंद-स्वामी** चौदासे सन्याशां चे गुरू भिक्षेस आले ह्मणजे कासी-सहवर्तमान विस्वेस्वर च जेविला परंतु त्यास भिक्ष महिन्या च्या पुढे आल्या आहेत दुर्बला चे घरी ते कोठे येतात आमचे प्रालब्धी नाहीं ऐसे बोलून नित्यविध करून पाक जाहल्यावरी वैस्वदेवा चे वेळेस **अद्वैतानंद** येऊन बोलिले की **निरंजना** त्वरेने असेल अन्न ते पात्री वाहाढ क्षुधा बहुत लागली आहे हे ऐकोन **देवानी** पूजा करून हर्शयुक्त भिक्षा दिल्ही **देवास** हि पंक्तीस बसविले आचवते वेळे **देव** सुंठ लवगा मुर्खी मुर्खा आणावयासी घरात गेले तो सन्यासी मठास गेले ऐसे जाणून मठास **देव** जाऊन पुसू लागले तो मठी चे सिश्य बोलिले की नागर ब्राह्मणा चे घरी भिक्षेस गेले आहेत मग नागरा चे घरास **देव** आले तो **अद्वैतानंद** भोजन करीत आहेत भिक्षा जाहालीया वरी **देवानी** पुसिले मुख-सुधी न घेता च त्वरेने का आला ते बोलि(ले) की तुमच्या घरास भिस्क्षेस आह्मी आलो नव्हतो तुह्मा देखत च प्रातःकळी या ब्राम्हणा ची भिक्षा मान्य केली होती आमच्या रूपे तुमच्या घरा कोण आले होते ते विस्वेस्वर जाणतो ॥

( ४७ ) **मोरेस्वर-बावा** माहागणपतिभक्त **कासी** मध्ये होते ते मणीकर्णिकेस स्नानास गेले ते वेळे **देव** हि मणीकर्णिकेत स्नाना चे वेळेस ब्रह्मकमंडलू चे त्रिवार स्मरण करूं लागले बाहेर येता च **मोरेस्वर-बावानी देवास** पुसिले की दक्षण- देशांत गणपतीचा अवतार **निरंजन- स्वामी** आहेत ते तुह्मी च की काय मग **देवानी** पुसिले **मोरेस्वर-बावास** गणपती प्रत्यक्ष आहे ते च आपण की काय ऐसी दोघाची लूग मिळता च अस्टभावयुक्त नमन आलिंगन-युक्त परस्पर वर्तमान सांगितले **मोरेस्वर-बावा** बोलिले की तुह्मी गयेहून आल्या

वरी सर्व पुराणे श्रुतिस्मृती च्या संमतें गणपतीपर च सर्व पुराणें श्रवण श्रीगजानन करवील ॥

( ४८ ) सावकारानी कासी मध्ये हुंडी चे द्रव्य देवविले होते ते **जिऊबाई** चे तीस होन फेडिले मग **लाला** सावकारा करवी प्रयाग व गयेत दो सहस्रा रुपेया चे अन्न--संतर्पण करविले बाकी चे रुपये आठरा सहस्र **सयाजी गोसावी** दशास्वमेधी राहत होते त्या करवी थोर थोर जे घाट आहेत तेथे प्रामाणीक ग्रहस्त जे होते त्यास सांगितले की दुर्बला चे लग्न व अंधपंगूस अन्न व रीण फेडावयास ज्या सामर्थ्य नाही त्यास व कंगाला चे चवकीस इतक्या कार्या वरी या द्रव्या चा विणयोग करणे ऐसे सांगोन गयेस चालिले **कर्मनासी** नदी पासी येता च सर्व यात्रा उतरोन गेली परतु **देव** यांचा नेम की आस्वारुड मणुशारुढ पादरक्षारूढ न होता यात्रा व्हावी त्यास दोन प्रहर दिवसा येत तों अलिकडील तीरी बैसले तो ग्रामातील सूद्र रुदन करीत नदीस आला त्यास **देवानी** पुसिले का बापा श्रमी होतोस तो बोलिला दोघी स्त्रिया परम रागीट आहेत माझे शरीर ल्हाण अशक्त क्रोधहीण पाहोन ताडण करितात यास्तव दुखी आहे **देव** बोलिले की तुजला आह्मी उपाय सांगतो परंतु आह्मास पलीकडे जावया चा उपाय करणे मग तो सूद्र गावांत जाऊन एक ल्हानसी डोंणी घेऊन आला त्यांत **देवास** बैसऊन डोन खरडीत खरडीत पैलेकडे नेली मग त्या सूद्रास बोलिले की काय इच्छित असेल ते मागणे तो बोलिला धन धान्य संतति संपत्ति सर्व आहे परंतु स्त्रियां ची पीडा होती मग **देव** बोलिले की स्त्रिया बाहेर जातील तेव्हा देव्हारा खानोन गुडग्या प्रमाणे गारी करणे आलीया वरी त्या पुसतील गारी का केली त्या सांगणे की वडिला चे धण होते ते मईत्रा चे घरी ठेविले आहे जे स्त्री मारनार नाही तीस ते देईन नाही तर ते धण देऊन तिसरी स्त्री करीन दोहीस हि टाकीन हा उपाय करणे या प्रमाणे त्या सूद्रान करिता दोघी हि कृपा करून लागल्या ॥

(४९) तथून मुरारचौकी पासी गेलीया वरी द्रव्यवंत जे होते त्यानी द्रव्य देऊन चिठिया घेतल्या त्या बरोबरी द्रव्य न देतां भ्रांतीने **देवास** हि चिटी दिली चिठी हातास येता च सर्व हि गेले परंतु **देव** **चौकीदारास** पुसू लागले की चिठी दिली असता द्रव्य का मागितले नाही तेव्हा चौकीदार द्रव्य मागू लागला हे बोलिले आपणा पासी द्रव्य नाही त्याने सेवकास आज्ञा ( केली ) की द्रव्य घेतल्या वाचून जाऊ न देणे तीनसें कंगाल यात्रा होती त्या मधे नेऊन बैसाविले ॥

तेथे उभे टाकून **देवानी** भगवत्कीर्तन टाली नामस्मरण युक्त करिता च चौकी बावा कसा आहे म्हणून पाहायास आला तो कीर्तन-प्रेमा व कंठ-माधुर्य पाहून त्याच्या शरिरास रोमांच आले प्रेमा दाटला मग साष्टांग नमस्कार घालून बोलिला की द्रव्य न देता माहाविष्णूने तुह्मास चिठी दिली आहे स्वामीनी सुखरूप जाणे तेव्हा **देव** बोलिले की हे तीनसे आमचे संगती टाकून आह्मी कैसे जावे तो बोलिला की त्या पासी द्रव्य असेल मग **देवानी** सफत केली की आह्मी घरून यात्रेस निघालो ते समई बारा सगाण्या घेऊन आलो ऐसे च हे हि आहेत येथे संशय नाही मग चिठ्या देऊन सर्वास हि मुक्त केले दुसरे दिवसी फल्गु--श्राद्ध करून तिसरे दिवसी **प्रेष** पर्वतास गेले सर्व यात्रा पुढे निघून गेली उनाचे पीडेन करून हळू हळू येत होते तो अस्त-मान झाला एकें तस्करें वस्त्रपात्रा साठी उपद्रव मांडिला ब्राह्मण मागून येत होते त्यानी चोरास धरून यास साभाळून आणिले **देवास** श्रमा चे योगे करून घृत न भक्षिता शरीर शुष्क जाले यास्त( व ) **जिऊबाईन देवास** न कळत कणकांत व भातात तूप घालून वाढू लागली तेणे करून शरीर पुष्ट होऊ लागले **देवानी** जाणून **जिऊ-बाईस** बोलिले की तुमची त्रिस्थळी यात्रा जाली तुह्मी फिरून गांवास जाणे आह्मी **गंगाप्रतर्दनक्षेत्रा** पासून **श्रीजगंनाथ व बदरीकेदार** व **श्रीद्वारका–अयोध्यादि** सर्व उत्तर तीर्थे करून येऊ हे ऐकून

नेत्रास अश्रुपात आले की आजि **देव** असे उदास का बोलिले मग **देव** बोलिले की आमचे शरीर गळाले होते तेंव्हा तुझे सेवे ची अपेक्षा होती आता शरीर पुष्ट जाले कोणा ची गणना नाही रात्री च उठोन एखादे कडे जाऊ हे समजून **जिऊबाई** अन्ना मधे तूप घाली-नाशी जाहली **विष्णुपदी** दोन प्रहर पर्यंत बहुत दाटी होय ह्मणून त्रितीय प्रहरी सातू तील क्षीरी चे पिंड द्यावयास जात असेत तेंव्हा सर्व ब्राह्मण घरास येत भोजनास जायेत सोडसी सांगावयास कोणी मिळेना तेंव्हा **हेरंबभट** कोणी एक येऊन षोडसी सर्व गयेची श्राधे चालवी गयावर्जनास गयावळाने अडथला केला की हे थोर नामांकित आहेत याज पासी सहस्र रुपये घ्यावे हे जाणून **हेरंबभटाने** विष्णुपदा-जवळ पूर्वेस निरुपद्रव एक वड होता तेथे गयावर्जना चे सर्व साहित्य मांडिले हे गयावळास कळताच काय करितो ह्मणून पुसू लागले हे बोलिले की गयावर्जन करितो गयावळ बोलिले येथे कोणी करीत नाही तेंव्हा यानी **गयामाहात्म्य** काढून **विष्णुपदा** च्या पूर्वेस **अक्षयवट** आहे ऐसे प्रमाण दाखविले पश्चमवटा चा ठायीं प्रमाण नाही हे गयावळास समजावितां च नमस्कार करून बोलिले की जे तुह्मी द्याल तितकीया वरीच करितो येथे करू नका स्वामीनी येथें केल्यान ऐसाच पंथ पडेल मग तीन शत कंगालासहित यथाशक्त्या दक्षणा घेऊन अक्षय-वटी गयावर्जन केले परतु पूर्ववटीं हि त्या दिवसा पासून काही गयावर्जने अद्याप होतात तर्पण-समई फल्गूंत प्रतीहीं दूध निघे गयेहून जाते वेळेस षोडसी च्या ब्राह्मणा ची दक्षणा राहिली ह्मणून श्रमी होते तो यात्रे चा संगवई नासीककर गृहस्थ होता त्याचे स्वप्नी ब्राह्मणाने सांगितले की **निरंजनस्वामीस** सांगणे की दक्षणे च्या वारी चे गंगाजल **श्री मोरेश्वरी** जाऊन घालणे ह्मणजे दक्षणा आह्मास पावली पूर्वी स्वामी च्या हि स्वप्नी दिव्य गयावळ येऊन तुमचे गयावर्जन रुपये पांचा वरी करितो ॥

(५०) तेथून **दाउदपुरास शोणभद्रा** चे काठी आले

**आम्रवृक्षातली** पाक सिध **करून** बैसले तो पूर्वेकडील पर्जन्य-वाह-टुळीने वृक्ष कडकडला तेंव्हा गजानन नामे हाक देता **च** पश्चिमे कडे पडावा तो पूर्वे कडे च वृक्ष पडिला **सहस्राव्यांत्** तळ्यात् स्नानास गेले तो एक पिशवी तीन मोहरा सात रुपये सापडले परंतु प्रातःकाळी मार्गी बसोन सर्वास पुसिले की कोणाचे काहीं हरवले की काय तेंव्हा ज्याचे हरवले होते त्यास दिले मग **कासीत** आलीया वरी पंचगंगेस स्नानास गेले तो गणाधीश ऐसें स्मरण केले तेथे एक सन्यासी होता तो बोलिला

॥ गणाधीश तो पुत्र गौरीहरा चा ॥

त्यास उत्तर दिले की

॥ भवानीश तो पुत्र लंबोदरा चा ॥

मग तो बोलिला

॥ करी ढेरपोट्यास गौरी मळीचा ॥

त्यास **देव** बोलिले

॥ उमेशास आधार त्या वीण केंचा ॥ १ ॥

मग संन्यासी दंड घेऊन धावला **देवानी** नमस्कार करून शांत केला त्रितीय प्रहरी **मानस सरोवरास** गेले तेथे **वरदराजा** ची कथा होणार होती तो हे गोसावी कळता च एक पद ह्मणावयास **देवास** उभे केले यानी 'निर्गुणो निरहंकारो' हे उपनिषद व गणेशा चे ध्यान । हे च माझे ज्ञान ॥ हे प्रणवा ची पूर्व—पीठिका कथेंत लाविता च चौदासे संन्यासी संतुष्ट जाहले दोन प्रहर यांची च कथा जाहली **वरदराज** गायक होते त्यास हि आश्चिर्य जाहले मग प्रातकाळि चा संन्यासी सद्गदित-कंठ **देवा** चे चरणी साष्टांग घालोन मुखावरि मारून घेऊ लागला की अपराध क्षमा करा ह्मणोन मग संन्याशाने विरक्त होऊन दंडकुमंडलु टाकून हंसदीक्षा घेतली **देव काशीत** षण्मास होते तो वक्रतुंडा पाशी पुरश्चरण करीत होते येकदा पंचक्रोशी च्या उधोगा मुळे प्रातःकाळी मणीकर्णिकेस स्नानास गेले तेथे षोडश वर्षा ची मल सर्वा—अळंकार-

युक्त तेजःपुंज चन्द्रपुष्करिणी पाशी नंदादीप जळत होते तेथ पाहिली पुसले की यवढ्या रात्री का आलीस ती बोलली तुह्मी का आला देव बोलिले स्नानास आलो ती बोलली कोण्ही देवा चे भक्त स्नानास येतील त्याचे दर्शन घडेल ह्मणून आले हे ऐकोन देव समजले की हे कोणी देवता आहे ह्मणून नमस्कार घातला तो ते अदृश्य जाहली तेंव्हा देवास दुःख जाहले बोलिले की मनुष्यास देवा चे दर्शन-पुण्यें इच्छा-तृप्ती पापक्षय होतो परंतु देवास मनुष्य-दर्शनी काय लाभ हे पुसायाचे होते हे चित्ती धरून वक्रतुंडा पासी जपास बसले होते तो सूर्योदय समई काहीशी निद्रा आली तेंव्हा पाहिले की मुक्ती--मंडपी थोर वाड्यात रत्नखचीत देवळात सर्व--अळंकार--युक्त दिव्य दोघे स्त्री--पुरुष त्या पुढे सर्व उपचार--युक्त प्रातःकाळी जे स्त्री पाहिली होती ती पाहिली तिणे विडा सुपारी नारळ एक दिला तो जागृतीत राहिला तिणे एक श्लोक सांगितला

॥ सर्व पापं हरे तीर्थे नभ गुरु--पितृ--भ्रक् ॥
॥ तत् पापं तिष्टते तीर्थे यावत्सद्दर्शनं भवेत् ॥

त्रिवार हा श्लोक ह्मणंता च जागृत जाहले मग तांबूल भक्षिला नारळ सुपाऱ्या जतन ठेविल्या येते वेलेस दोघानी दशाश्वमेधी गंगा भरोन कावडी घेतल्या चार मजली येताच देवा चे स्कंध दुखो लागले तेंव्हा नासीककर गृहस्त सांगाती होता त्याचा शिवापा नामे ब्राह्मण येऊन देवास बोलिला की तुमच्या दोनि हि कावडी गोदातीर पर्यंत पाववितो धन्यास मात्र सांगू नका पाव कोस मजल उरताच ठेवीन शेवटी जे द्याल ते घेईन याप्रमाणें गाधीपुरा वरोन ज्या दिवसी गोदातीरास आले त्या दिवसी यात्रेतील सिवापा एका गावास कार्यास गेला होता देवा च्या कावडी पुढे गेल्या देव हि मागे जात होते तो मागून सिवापा आला त्या पासी कावडी नाहींत ऐशा पाहून जिऊबाइ कावडी काय केल्या ह्मणून त्यास रागास आली तो हि म्या कावडी घेतल्या नाहीत ह्मणून भांडत भांडत पाव कोस मजल उरली तेथे आलीं तो वृक्षा

खाली यांच्या कावडी पाहून वळखून घेऊन यात्रेत येऊन तो ब्राह्मण शोधिला परंतु कोठ नाही मग **मोरेश्वरास** येऊन माघी चतुर्थी करून गावा आली तो गंगा बोळगयाचे काही साहित्य नाही ऐशा समई गयावळा चे साठ रुपये देया चे होते तो हि आला ऐशा संकटीं **परुशराम प्रतिनिधी** तीर्थस्नानास आले होते त्यानीं ग्रामात प्रतिग्रह वाटून हे थोर सत्पुरुष जाणून मोहरा पांच व शत ब्राह्मणा ची सामग्री पुढे ठेऊन नमस्कार करून गेले

(५१) या प्रमाणे यात्रेहून आलिया वरी **आकाबाईस** पितृगृहाहून स्वगृहास आणोन काही काल प्रयाण केलिया वर मुले बहूत जाहली तेव्हा सापत्न माता वेगळी जाहाली शुक्लवृत्तीन धान्य मिळेल ते अर्धे मातुश्रीस द्यावे उरेले ते मध्यान्ह पंचमाहायज्ञास अतिथीस गोग्रासास द्यावे काही उरले तर आपण स्वीकारावे नाही तर आरण्य-फुले सिजऊन भक्षावी एकदा अक्षय-तृतीये चे दिवसी धान्य नव्हते ह्मणून उंबरा ची फुले उकडोन नित्य-विध केला परंतु **नर्मदा** नामे कन्या तीन वर्षा ची होती ती अन्न मागो लागली तेव्हा **आकाबाई** मुलीस घेऊन **देवा** चे मावशी च्या घरास जाऊन या मुलीस भाकर द्या म्हणो लागली तेव्हा मावशी बोलिली की घरी पुरणा चे अन्न केले ते मूल भक्षीना यास्तव मग ते मूल बोलिले की घरी पुरण घातले नाही झाडा चीं उबरें उकडलीं आहेत हे ऐकोन मावसीने **आकाबाईस** आण घालोन घरी सणा चे कसे केले हे पुसता च **आकाबाईनी** नेत्रास उदक आणोन सविस्तर सांगितले त्या दिवसा पासोन सणावारी मावशी शोध करू लागली ॥

(५२) **देवा** चा निश्चय ऐसा असे की नर्मदा-गणेशा वाचून दुसरे देवा चे तीर्थ न घ्यावे एकदा वीरवैस्णव विद्वान **कराडास** येऊन छलकबुधीने **देवास** बोलिले की आस्ट पदार्थ एकत्र होता आहेत तेव्हा तीर्थ होते नर्मदा-गणेशा चे तीर्थग्रहण कोठे बोलिले नसता अशास्त्र वर्तणूक तुह्मी करून लोकास उपदेश करिता हे काय ऐसे ऐकोन **देवानी**

॥ देहपात घडो तुज उपासिता ॥
॥ न सोडी सर्वथा भक्ती तुझी ॥

ऐसी अनेक पदें स्लोक ह्मणोन त्या वैष्णवास विनंति केली की ॐकारा पासून सर्व देवा ची उत्पत्ती वेदीं शास्त्रीं वर्णिली आहे यास्तव ॐकार-रूपी गणेशा चे भजनी शरीर पडले तर सुखी पडो परंतु अन्य देवा चे ठायीं मन बैसत नाही ते वैष्णवानी ऐकोन निंबा एवडी वर्तुल सप्तांकित व नवांकित चक्रयुक्त शालग्राम सिला देवा च्या हास्ती देऊन बोलिले की हा माहाविष्णू सर्व देवास पूज्य आहे याची पूजा आज-पासोन तुह्मी करावी ह्मणजे सर्व देवा ची पूजा तुह्मास घडली हे + + + + देऊन आमचे मनोरथ पूर्ण करावे ॥

॥ एको विष्णुर्महद्भूतं ॥
॥ सर्वं विष्णुमयं जगत् ॥
॥ व्यापकत्वाद्विष्णुः ॥

ऐसी अनेक श्रुती–स्मृती ची वाक्ये वैष्णवानी म्हणता च देवास परम संकट जाले की ब्राम्हणा ची अवज्ञा न घडावी व आपल्या व्रता चा भंग न व्हावा ऐसे परम सकटी

॥ नीरंजना सज्जन रंजवीसी ॥
॥ निस्तूर दुष्टा वरि पूर्ण होसी ॥
॥ निर्वाण काळी तव नाम घेती ॥
॥ हेरंब लंबोदर हे सखेति ॥ १ ॥

ऐसे दाहा श्लोक देवा चा धावा करोन त्या वैष्णवा चे आतिथ्य सर्व साहित्य करून शालिग्रामासिळा पाटावर ठेऊन परम चिताग्रस्त ते दिवसी उपोषित रात्रीची निद्रा केली प्रातःकाली स्वप्नांत एक ब्राम्हण येऊन बोलिला की वैष्णवानी जो शालिग्राम दिला तो गणपती चा आहे पुरता शोध न करिता उगी च चितायुक्त उपोषणे करिता तुम्हास काय म्हणावे सावध होऊन पाहणे जे तो शालिग्राम आहे की गणेश आहे ऐसा पुरता शोध करून हा च प्रत्यक्ष चिंतानिधी तुम्हास

प्राप्त जाहाला आहे याची प्रत्यही पूज्या करून तीर्थ घेणे ऐसा चमत्कार पाहोन व्यागरत जाले तो गोपालजीने स्नान करावे ह्मणोन आरोणादय हाका मारिली मग स्नाना नंतर ते शालिग्रामसिला पाहिली तो दोन गंडस्थले मध्ये मुमुखा + + + + + + + + परम विस्मय-युक्त त्या वैष्णवास बोलाऊन हे सिला तुमचीच काय ह्मणोन पुसताच त्यानी हास्ती घेऊन वळखोन बोलिले की सप्तांकित नवांकित चक्र-युक्त हे आमचीच होय परंतु तुमच्या भक्ती-विशेषें-करून शुंडा कैसी फुटली हे न कळे ऐसे बोलताच परस्पर आलिंगन देऊन सद्गदित-कंठ रोमांच-युक्त बहुत आस्टभाव पाहोन परस्परे साष्टांग नमस्कार करोन वैष्णव देवास प्रार्थू लागले की आह्मी परम चांडाल पातकी जे छलक-बुधीने उधटपणे स्वामी ची हेलणा केली स्वामी प्रत्यक्ष गजानन आहेत आमचे सर्व अपराध क्षमा करावे मग स्वामी परम नम्रतेने वैष्णवास बोलिले की माझे आराध्य गजानन दैवत तुह्मीच आहा यदर्थी सौशय नाही मी परम चांडाल पातकी ऐसा जे काल उपोषण करून देवास संकट घालोन जो अभंग अद्वय देव त्यास भावना-बळे गंडकी सीलेत आपण प्रगटावे ऐसे सकट केले ऐसे अनेक अपराध क्षमा करावे ऐसी अनेक समाधाना ची वचने बोलोन चार दिवस कीर्तन संतर्पण मंडपशोभा आदि करून पचमीस पारणे केले त्या सीले चे नाम विष्णु--विनायक वैष्णवानी ठेविले माघ शुद्ध प्रतिपदेस तो देव प्राप्त जाला ह्मणोन प्रतिपदे पासोन पंचमी पर्यंत उपोषणे करू लागले वरसा मध्ये पुरश्चरणा चा जो जप होतो त्याचे अंगभूत पाच दिवस माध्व ब्राह्मणास तर्पण करीत असत मग वैष्णवा ची यथाशक्ति धन-वस्त्रे पूजा करोन निरोप दिल्हा ॥

( ५२ ) एकदा **नाडोलीस देव** गेले **मल्हार-गोसावी** बावा च्या घरी काही उत्सा ासनव देवा च्या मूर्तीस पंचामृताभिषेके परातेंत नाभी-मात्र मूर्ती बुडाल्या होत्या तेथे **देवानी** ताह्मणात विष्णु-

विनायक मूर्तीस अभिषेकाने मूर्ती वर दोन बोटे जल आले होते तेव्हा **मल्हार**बावा विनोदें बोलिले की तुमचा देव जलात बुडाला **आमचे** देव तरले मग **देव** बोलिले भक्ता ची इच्छा असेल तर आमचा हि देव तरेल ऐसे ह्मणता च मूर्ती तरो लागली मग **मल्हार**-बावा बोलिले की तुह्मी च साक्षांत गणेश आहात दुसरे दिवसी **गणेश-गीते** ची टीका **विघ्नेश्वरी** दाखविली **देवा**नी पाहता च आरंभी लिहिले होते की

गुरू आरुणोदय
ईश्वर सूर्योदय
गुरूस गौणत्व
ईश्वरास मुख्यत्व

ग्रंथी पाहोन **देव** रुसोन चालले तेव्हा त्या ग्रंथातील काढतो ह्मणून कबूल केले मग त्यास समजाऊन आणिले तधी पासून नवा पदार्थ जो आपले गावी पिकल तो **देवास** पाठीवल्या वाचून भक्षीत नसेत एकदा त्याचे घरी बारीक तांदळा चा भात वरी केला होता वाहाडते समई शोध केला तो **कऱ्हाडास** तांदूळ न पाठविले मग **रुद्रापास** सांगोन तांदळा ची गोणी वाटे लाविली मग दुसऱ्या तांदला चा भात करून जेवले ॥

येकदा दाहा मण भात नाचणे '॥' दाहा मण **देवास** पाठ-विले वरकड **देवा**नी ब्राह्मणास वाटले हे **मल्हारबावास** कळता च मग थोडे थोडे पाठवीत ॥

(५४) एकदा **देवा** च्या भेटीस **मल्हारबावा** आले दर्शनास **गंगाजी दादा सुभेदार** आले त्यास **मल्हारबावा**नी सांगितले की यांच्या उछाहा चे साहित्य करणे हे **निरंजनस्वामी** थोर सत्पात्र आहेत त्या वरून राजापुर च्या सुभेदार होता च **गंगाजी दाने देवास** पत्र पाठविले की उछाहास काय साहित्य पाहिजे ते सांगोन पाठविणे त्यास **देवा**नी

॥ उपासनेला ॥

हा श्लोक प्रथम च करोन पाठविला ॥

( ५५ ) एकदा **पंढरीस** गेले तेथे **कुंडलतीर्था** जवळ **सीदाबावा आपशिंग्या** चे कुलकर्णी तेथील देवा चे ज्योतिषी हे जाणून **सिदाबावानी** नृसिंव्हा पाठी मागील स्थळ **देवास** दिल्हे तेथे मठ बांधोन सात वर्षे **देव** राहिले **गणेशगीते** ची टीका तेथे च केली प्रथम पंढरीस गेले तेंव्हा **सिदाबावा** बराबरी राउळात जाताना

॥ जेथे नाही पूर्ण सुखाची हे सोंड ॥

हे पद करिता च विठला चे मूर्तीस शुंडादंड सर्वांनी पाहिला त्या दिवसा पासून पंढरी च्या लोकानी व **पांडुरंगबावानी** नृसिहा मागे स्थान करार करून दिल्हे प्रतिवर्षी यात्रेस संता च्या दर्शनास जात असेत मठामधे कोणी तरी शिष्य ठेवीत असेत ॥

( ५६ ) एकदा **प्रतिठानास** सिंव्हस्थास गेले तेथे अयाचित **स्वशाखोक्त ब्राह्मण** होते त्या पासून आरणी-गृहण केले मग परळीस गेले दोन वर्षे तेथे क्षेत्रवास केला शुक्लवृत्ती करोन पुराण—प्रसिध्ध गणेश-क्षेत्रे पाहात पाहात **नामल**-गावास आले हे वर्तमान **बीड** च्या देशमुख-देश-पांडियास कळले मग ते दर्शनास आले यांची स्थिति पाहून बहुत संतोष जाहाला मग त्यानी स्वामीस मागता मागितले की आह्मी एक मागतो ते दिल्हे पाहिजे **देव** दयाळू होऊन बोलिले की तुह्मास जे मागाल ते दिल्हे मग बोलिले की या प्रांती राहोन आमचा उधार करावा मग त्रिवेणी-संगम **कर्पुरा नारदा बिंदुसुरा** ऐस्या एकत्र गणेशतीर्थी जाहाल्या **भ्रशंडी** रुषी चा आश्रम व गजानन--सानिध्य पाहून पुराण-प्रसिध्ध अनुष्ठानास योग्य निर्मळ स्थळ पाहून तेथे राहाता च देशमुख देशपां-डियानी ग्रामा च्या उत्तरेस क्रिषी तीस बिघे गावाच्या शेजारी नेमून दिल्ही की यात जें उत्पन्न होइल ते पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने भक्षून हेयें राहाणे ऐसा निश्चय करून दिल्हा

( ५७ ) **रामाजी देशमुख नामल** गाव चा **देवा** चा शिष्य

\+ \+ \+ \+ \+ \+ \+ \+

गुरू–गृहीं आणून बांधी उडालिया वरी खिलारांत घालाव्या दुसरिया आणून बोध्यी या प्रमाणे त्याचा पुत्र **दादोराम** हि करीत असे

(५८) एकदा **देव** गीता पाठ करीत होते तों तुलसी वर शुष्क मार्जार अन्ना विणे शब्द करवेना खालते हि उतरवेना त्याची अवस्था पाहून **देवास** अश्रुपात आले तो **विंग** चे देशमुख-देशपांडे दर्शनास आले होते ते कल्पना करू लागले की आरण्यात कुटुंबा च्या संवरक्षणा चे दुर्घट ह्मणून **देव** श्रमी होतात हे ऐकून विज्ञ **देव** बोलिले की ऐसे ह्मणून नये क्षणाभरा काय ते कळेल मग **देव** सावध झाल्यावरी ते गृहस्त वर्तमान पुसू लागले त्यासि न बोलता च **आकाबाईस** सांगितले की सत्वर काही अन्न या मार्जारास आणून देणे याच्या दुखें बहुत दुखी जालो आहे मग ते गृहस्त बोलिले की मालवद बाधून देतो **देव** बोलिले की **मार्कंडियाने** पेंडी घेतली असता आह्मी मालवद का बांधावे ॥

मार्गी कोठे जात असले शेतात शूद्र बैलास मारिता च नेत्रास अश्रुपात यावे मग शूद्रास काकुलती यावे की मारू नको युक्तीने च कार्य घेणे कोणा बैला चे नाव मोरया असले तर नमस्कार घालावा ॥

(५९) एकदा **मोरेश्वरी** बसले होते तो भिती पैलीकडे एक मूल रडू लागली तों **सखो निरंजन रेटरेकर** कुलकर्णी जोतिपाचो खंडी करावयास ठेविला होता तो **देवा** बरोबरी होता त्या देखत **देव** हि कष्टी होऊ लागले मग त्यास शोध करावयास पाठविला तो बोलिला की कपाळि ची कळी हरपली आई मारील ह्मणून रडती हे सांगता च **देवा**नी दोन पैसे देऊन भांगाटिला घेऊन देणे ह्मणून आज्ञा केली ॥

( ६० ) एकदा **नामल** गावी तस्करानी दोन ह्मशी नेल्या हे कळता च **देवा**नी दोनी वछ घेऊन हे नेल्या वाचून ह्मसी दूध देणार

नाहींत तरी हे वासरें घेऊन जाणे ह्मणून पाठी लागले तो तस्कर अंध जाले त्यानी ह्मसी गोठीयापर्यंत बांधून नमस्कार केला की नेत्र द्या ह्मणू लागले मग **देवानी** तीर्थ नेत्रात घालिता च नमस्कार करून गेले ॥

( ६१ ) एका उछाहात पांचा शतांचे अन्न केले होते परंतु सहस्र ब्राह्मण जाला तेंव्हा विष्णु-विनायका चे तीर्थ अन्नावरी सिंपडून एका चे अन्न मंदारा पासी पुरिले मग बोलिले की या स्थली चे अन्न कधी हि उडणार नाही मग सहस्र ब्राह्मण व दोन ग्यारसे सूद्र जेऊन अन्न उरले ॥

( ६२ ) एका उछाहात पंचमीस देवळात कथा मांडली **देव** घरी होते तो पन्नास तस्कर भांडी नेऊ लागले त्यास **देव** बोलिले की अन्न उरले हे जेऊन पात्रे हि घेऊन जाणे ऐसी प्रार्थना करून पात्रे वाढून तृप्त करून पात्रे जवळी नेऊन ठेविली तों तस्कर नेईनासे जाले परस्पर आग्रह करितात तो देवळात वर्तमान कळले तेथून लोक धावता च मग चोर पळाले दुसरे दिवसी दिली भांडी कैशी ठेवावी ह्मणून आपली जी होती ती ब्राह्मणास दिली ॥

( ६३ ) मग **देव** त्या प्रांतास गेले हे वर्तमान **परशराम प्रतिनिधी** व **रामचंद्रपंत मुजुमदार** यानी रा॥ **राजाराम छत्रपती** यांस विनंति केली की **देव नामल** गावी आहेत तो गाव उध्वस आहे तस्करा चा उपद्रव होतो यास्तव महाराजानी चौथाई व सरदेसमुखी बाबती आपणा कडे आहेत त्याची पत्रे दिलीयाने **देवा** पासी वस्ती होईल ऐसे च **ताराबाई आऊसाहेब** यांच्या हि विचारास आले मग पत्रे करून पाठविली त्या वरून गांवा वर वस्ती केली तेथून **कराडास** गेलिया वर **नर्मदाबाई** जन्मली साहावे वरसीं नृसिंव्ह जयंतीस प्रातःकाली उपाध्या बरोबर **आकाबाई** व मुलीस **नरसिपुरास** लाऊन दिली पूर्व दिवसी संध्याकाली **देव कोपर्डे**

यास जाऊन **कुलकर्णी कृष्णाबाई** तीस बोलिले की तुझा पुत्र **गोविंद** चौदा वर्षा चा आहे तो गवाळे घ्यावयास देणे आह्मास **नरसिंपुरास** जाणे त्यानी हि मुल बरोबर दिला मग **देवानी** अधेलिया ची पाने व अधेलिया ची हळद पैसीया चा गुल दीड पैसीया चे लोणी हे साहित्य घेऊन **नरसिंपुरास** दोन प्रहरा गेले हळदी चे बोहले करून अष्टवर्ग व लग्न ते दिवसी उरकोन दुसरे दिवसी साडे व देवकोथापन व देवास नैवेद्य करून संध्याकाली **कराडास** आले ते दिवसी च **गोविंदास कोपर्डियास** पाठविले मागा पुसो लागली पिवले आंग का जाले मग **गोविंद** बोलिला **देवानी** माझे लग्न केले सविस्तर वर्तमान निवेदिले ॥

( ६४ ) एकदा माघमासी चा उछाह **पंढरीस** पडला तेथे मस्तकी सिंदुरा चा टिळा गुणवान **गणेश** नामा चा चौ वर्षा चा **देवां** चा पुत्र शांत जाला तो **देव** रावळीं असता वर्तमान ऐकिले मग बोलिले की चौथ्या द्वारा चे स्थली मुलास घेऊन चला आह्मी हि तेथे येतो मग मोक्षद्वारीं दोनी हि विधी उरकोन नाम–गर्जना—युक्त घरास येऊन रात्रौ दिव्या रहित कीर्तन केले दाहा पुत्र पांच कन्या या प्रमाणे गेल्या ह्मणून **जोतिलिंगास** येऊन **आकाबाईन** देवा ची प्रार्थना मांडिली तेव्हा दृष्टांत जाला की **कासी** मध्ये दोन सुपाऱ्या व एक नारेळ विश्वेश्वर-मणकर्णिकेने दिलिया आहेत त्या भक्षिलीयाने पुत्र होईल त्याचे नाव **रत्नागिरी** ठेवणे मग **पंढरीस** पुत्र जाहाला त्याचे नाम **रत्नागिरी** ठेविले उपनयन **नामल**-गावी केलिया वरी वेदशास्त्रादि अभ्यास केला चौदावे वरसी **कृष्णदयार्णव नरसिबावाचे कोपर्डे** येथील कुलकर्णी व जोसी यानी आपली कन्या **उमाबाई** दिली मग **कृष्णदयार्णवास** स्मार्त देऊन **सिदवडी** स्थापिले तेथे **देव** हि काही दिवस होते तो पहाटें जाऊन त्याचे घरा झुभा वळून सडा-संमार्जन करीत कोणी पाहिले तरी बोलत की आपणास

घरां आंतोन आज शुभा बलावयास लाविले आहे या प्रमाणे निराभि-मानें ब्राह्मणा ची सेवा व भूतदया ऐणे करून करीत ॥

( ६५ ) **नामल**-गावी **दुर्वाबाईचा** जन्म जाहाला साहवे वर्षी **परळी वैद्यनाथास** गेले होते तेथील उपाद्ध्ये **हर जोसी** यानी परळी-माहात्म्य श्रवण करविले व तीर्थविध हि सांगितला त्याची स्त्री निवर्तली होती वय चाळिसा वर्षा चे होते परळी चे जोतिषवृत्ति होती त्यास दक्षणा देवयास अनकूळ नव्हते मग शुक्ल वृत्तीने काही धान्य मिळवोन **दुर्वाबाई** उपाद्यास दिली तेथून **वसमतेस** आले तेथील देशमुख **देवां** चा उपासक होता त्यास दिवाण चे संकटामुळे **गण-पतीने** फरप दिला तो अद्यापि त्यांच्या घरी आहे त्याचे नाव **देवजी देशमुख** ॥

तेथून **संदापुरा** वरोन **सावार**-गावास आले तेथे **लंबोदर नाईक थेटे** शिष्य होते त्यास विश्वादि बीज हे स्तोत्र करोन दिले होते त्याचें त्रिकाल पठण करीत असे एकदा दोघी स्त्रिया परस्पर भांडोन एकीने अडात उडी घातली मग **लंबोदर नाइकानी** दिवाण च्या नागवण याचे नावें करोन विश्वादि बीज या स्तोत्रा ची आवृत्ति आरंभोन अडात माणसे घातली तो एकविसाव्या आवर्तनास स्त्री निघाली तेणे सांगितले की कूर्मपृष्ठी सान्हिकें पाया तळी आहेसें वाटिले मग अडात उदक पाहिले तो दोन भाले लागले ॥

( ६६ ) एकदा अधिकमास जाणोन **पंढरपुरा** वरोन **कार्तिकस्वामीस** गेले बरोबर **आकाबाई** व **शिवदास**बावा होते **व्यंकटेशा** जवळ जाऊन

॥ येयी रे सखया रूप घेउन साजिरे ॥

हे पद करोन ह्मणो लागले तो **श्रीनिवासाचार्य** पार्पत्यगार देवळात जात होता तो व्यंकटेशास शुंडा सिंदूर-चर्चन पाहाता च बाहेर पूजारि होते त्यास शेंदूर कां लावला ह्मणोन मारावयास काढिले तों ते बोलिले जवळ जाऊन पाहणे मग तो जवळोन पाहाता च शेंदूर

नाही मग **देवा** च्या भक्तिभावा चे सामर्थ्य जाणोन **देवा** स पंध्रा दिवस ठेऊन घेतले ॥

मग (चि) **कामाक्षीस** गेले तेथून **अरुणाचली** येता च प्रद-क्षिणे चे वाटेस **आका** च्या व **देवा** च्या मधून व्याघ्र गेला परंतु उपद्रव केला नाही ॥

( ६७ ) एकदा **शुकदेव** संगाते घेऊन **मिरजेस** गेले तो शरिरास बहुत पूज्यासन्मान लोक करू लागले या कंटाळ्या मुळे **शुकदेवास** न कळता शरिरा ची अप्रतिष्ठा हावी ह्मणोन कोटांत जाऊन फौजदार गृहांत गेला होता त्याच्या आसना वरी जाऊन बैसले द्वारपाल व दूत काही बोलले नाहीत मग फौजदार घराहून आला **देवा** च दैवतेज पाहून नमस्कार करून प्रार्थना करू लागला की किमर्थ कोठोन स्वामी चे येणे जाहाले मग गालिप्रदान-युक्त क्रोध दाखऊन **देव** बोलिले की जेथोन तू आलास तेथोन च आह्मी आलो परंतु त्या प्रस्तास क्रोध आला नाही मग फलपुष्पादिक बहुत उप-चार पुढे आणून ठेविले तेव्हा हासोन **देव** बोलिले की ह्या शरिरा ची अप्रतिष्ठा व्हावी हे मनात होते पर प्रारब्धी नाही मग आठ दिवस तेथील लोकानी राहाविले परंतु आंगारकी चवथीचे दिवसी **आस्ट्यास** येताना दो प्रहरा क्षुधे-तृषेने पीडले तो मार्गी एका ओड्यास पूर आला त्या संकस्टी

॥ तुजविण मयुरेशा कोण भक्तास तारी ॥

हे अष्टक करिताचि एक वाणी खजूर फणस केळी घेऊन **मिरजेस** जात होता त्याने दोघास ओढा उतरोन फराळा चे साहित्ते दिले मग उतरोन खादले व फणसपोळी चा व खजुरा चा पैका दिला तो घेईना बोलिला की माझे नाव **वहिरवशेट** घर **आस्ट्यांत** आहे तेथे पैका नेऊन देणे मग **देव आस्ट्यास** येऊन शोध केला पर तो वाणी व त्याचे घर हि तेथे नाही ॥

(६८) दुसरे दिवसी **कळंब्यास** आले तेथे एक सती पडत होती तिणे हे माहापुरुष पाहोन जाताना नमस्कारास आली तो **देवानी** सौभाग्यवती भव पुत्रवती भव ह्मणता च तिचा पती सर्पे डंखिला होता त्याचे विष स्वामी चे तीर्थ घालिता च उतरोन प्राण आले ॥

(६९) मग **आनंदमूर्ती** च्या **ब्रह्मनाळास** गेले तेथे पूर्वी दोघा ची बहुत मैत्री होती **देव** तेथे जेव्हा जात तेव्हां **आनंदमूर्ति** नमस्कार घालित येत असत **देव** हि नमस्कार घालित जात असत मग त्यास बहुत श्रम होतील ह्मणून **देव** पुरे करीत तेव्हा **आनंदमूर्ती** हि पुरे करून वाद्यघोषे नेवोन पूजा कीर्तनादिक **देवा** पुढे करीत मग **आनंदमूर्ती** चा अवतार झाला ते वरसी नमस्कारा च्या ठिकाणा पासोन नमस्कार घालीत वृंदावना पर्यंत गेले तेथे हि शत नमस्कार घालोन बोलिले की तुह्मी फार नमस्कार घालीत होता आता कैसे घालाल ऐसें ह्मणता च वृंदावन त्या दिवसा पासोन नमस्कारा सारिखे डोलूं लागले अद्यापि डोलते पूर्वी डोलत नव्हते ॥

( ७० ) मग एकदा **देव माहुलीस** गेले होते तेथे **स्नान** करोन बैसले आहेत तो + + + + दोघे ब्राह्मण आले त्यानी स्थूल शरीर पाहोन **देवास** बोलिले की आह्मास यजमाना च्या भेटीस **वाईस** जाणे आहे वोझे घेण्यास कोणी मिळेल तरी बरे आहे मग ब्राह्मणी अडलेसे जाणोन **देव** बोलिले की मिष्टान्न जेऊ घालोन यजमाना पुढे ठेवावयास दाहा केळे घेतली ती निमे देयाल तरी मी येतो मग दोघां चा ताल बसता च वोझे घेऊन **वाईस** जाऊन कोणी वळखील धोतर वोलें पांघरून गोठ्यांत **देव** बैसले त ब्राह्मणानें गाठोडें **देवा** पासी ठेऊन यजमाना पुडे केळे ठेऊन आसिर्वाद ह्मणोन बैसले तो घर-धन्या च्या पाणक्याने **देवास** वळखोन यजमाना पासी सांगितले की **निरंजनस्वामी** सारिखे गोठ्यात कोणी बैसले आहे हे यजमान ऐकोन

सत्वर येवोन **देवास** वळखोन साष्टांग नमस्कार करिता च **देवानी** हि नमस्कार करून काकुलती येऊ लागले की त्या ब्राह्मणानी बहुत सौरक्षण करून या शरिरास येथे आणिले आहे त्यास काही बोलू नका अमर्यादा केली तरी माझी च वडेल मग यजमान काही बोलिला नाही परंतु सर्व लोकानी ब्राह्मणास फार निशेध केला की साक्षात **देवा**च्या मस्तकी वोझे कैस दिले मग त्या ब्राह्मणानी आपले मुखा वरी मारून घेऊन नमस्कार घालूं लागले ॥

( ७१ ) एकदा **महाबलेस्वराहून वाईस** येत होते तो मार्गी उत्तरे कडून दक्षिणे कडे गाव लुटो लागले ह्मणोन भये करोन ब्राह्मण व स्त्री परस्परें धरून खांद्या वरी वोझ्या च्या मुळे पडत पडत पळत जात होती त्यांचें दुख पाहोन **देवानी** पुसता च त्यानी वर्तमान सांगितले की गावा वरी राजिक जालेया मुळे पळतो परंतु सामर्थ्य नाही हे ऐकोन **देवानी** कंठाळ्या सकट आपल्या घोड्या वरी त्यास बसऊन त्यांचे वोझे त्या पासी देवोन सांगितले की कोणास न सांगता आपलें च घोडें ह्मणून सत्वर जाणें मग **सिवदास-बावास** सांगितले की मी निद्रेचें सोंग घेतो तू ही शौशा चे मिसे वोढ्यात बैस मागोन रिद्धीसिद्धी दाहा-बारा जण शिष्ये येत आहेत त्यास हे गोस्ट न सांगणे मग **आकाबाई** व **रघुनाथ देव बल्लाळदेव** येऊन पाहता च घोडें नाहीं **सिवदास-बावा** सांगो लागला येथे बांधोन शौचास गेलो होतो मग **देवास** जागे करून पुसता च मी निजालो ह्मणाले मग अवघे चुकूर होऊन **वाईस** आले **वाई** मधे आठ दिवस होते तो घोडें वस्त्रपात्रादिक पदार्थ पहिल्या परीस सुंदर मिळता च सर्व संतुष्ट होऊन येताना **आंगापुरा** अलीकडे लघुशंकेस उदक **देवानी** **सिवदास--बावास** मागितले ते बोलिले की चंबू पंचपात्र निथळोन कंठाळेंत घातले या रानात उदक दिसत नाही मग **देव** बोलिले जे आमच्या स्वधर्मा ची चिंता ईस्वरास असली तरी चंबूंत उदक असेल

मग **सिवदास-बावानीं** चबू काडोन पंचपात्रात वोतिता च अर्धे पंच-पात्र उदक निघाले ॥

( ७२ ) तेथोन **टकले-बोरगांव** चे रानात कृष्णातीरी आले तो **किरोली** च्या रानात शमीच्या गर्भी पिंपळ पाहोन स्वहस्ते गणेश व शिधबुधी स्थापोन कुळकर्णी **नरसोपंत** आपला शिष्य होता त्यास भाद्रपद शु॥ द्वादशीस तेथे उछाव करावया ची व तेथे च घर बांधाव-या ची आज्ञा करून **कराडास** आले ॥

( ७३ ) एकदा **लोणंद पाडळी** खेडास गेले तेथे **माणको-पंत** व **रामाजीपंत** बारा गांवचे जोशी कुळकर्णी होते त्यानी **देवा** चा अनुग्रह घेता च गजांत लक्ष्मी आली मग ते पुसो लागले की आमचा हेत आहे की गणपती चा घरी उछाव करावा **देव** बोलिले की प्रतिवरसी **मोरेस्वरी** सह कुटुंब सर्व साहित्य घेऊन जो घडेल समारंभ सेवा यात्रे ची करील त्याचे उत्तरो उत्तर कल्याण होईल या आज्ञे वरोन ते दोघे व त्यांचे पुत्र **चिमणाजीपंत** व **त्रिंबकराव विठ्ठलराव** व **मोरोपंत** यानी हि अनुग्रह घेऊन यात्रा आज पर्यंत केली व **शंक-राजीपंत घोडकेयास** बालपणी **देवानी परली वैदनाथा** कडे व **खेडकिशोदा** कडे नेले होते तेव्हा त्यास अनुग्रह केला मग त्या वरि हि **देवें** दया चि केली **मल्हारराव भगवंत** भगत-पुत्र जाला ॥

( ७४ ) एकदा **चिमणाजीपंता** चे घरी **देवानी** भोजन करिते वेळेस त्याचा एका बाईने पापडाचे मीठ साखरे च्या पात्रा वरी तैस्या च पात्रात होते ते भ्रांतीने वोंझळ भर **देवास** वाडिले **देवानी** भक्षिले बोलिले नाही मग घरी च्या बाईकास कळता च मीठ **देवास** वाडिलेसे कळलें मग श्रमी जाहाली त्यास **देवानी** समजाविले की बारा वरसे मीठ भक्षीत नव्हतो ते आज देवानी पदरी घातले ॥

( ७५ ) तेथ च **त्रिंबकपंत** माहाराज याने दुर्वा युग्मे मळ्या-तील हस्तप्रमाणाची पूजा सहस्रनामे करून आरभली त्या दूर्वा

एक प्रहर पर्यंत पडूं न देता शरीर अचल **देवानी** धरली पूजा-आर्ती त्यास आसीर्वाद दिला की गुणवान पाच पुत्र तुज होतील ॥

( ७६ ) **मोरेश्वरी कासीपंत** माहाराज **देवाचा** शिष्य **याने गणपती**-पर अपूर्व कीर्तन करिता च **देव** संतुस्ट होऊन वर दिला की **गुणवान चार पुत्र** होतील **मोरेश्वरी** पीठ व उसळ चार दिवस जे ब्राह्मण येतील त्यास घालावया चा पथ घातला आहे तो अद्याप चालतो पाचवे दिवसी येतील त्यासगट पारणे करावे **वरकड याचें देवा** कडे पारणें होतें ॥

( ७७ ) **देवा** च्या मातुश्रीचा पक्ष **मोरेश्वरी** पडिला गावीं उदक—प्रजन बहुत लागला या करिता एका ब्राह्मणा चा स्वैपाक वर धोतरे धरून केला तेथे एक संन्यासी येऊन हट्ट घेऊन ह्मणे मी येथे जेवितो सिदा वाढ ऱ्या त्यास मुष्पाने सिव्या देऊन नमस्कार घालीत जो पुसे त्यास सागत की याच्या वेपास नमस्कार करितो गुणास सिव्या देतो वोरी मधे आमचा पाक जाला आहे तेथे भाजी—भाकरीस बोलावितो येईना मग बळें वोढून जेऊ घातला ॥

( ७८ ) एकदां **सुप्या** चा एक माहापुरुष उछाव कवित्व पाठांतर असे परतु कथा येईना यास्तव **देवास** प्रार्थिले की माज्या वार ची गोरयास प्रार्थना करा मग **देवानी** वोल्या पडदणीने कल्पतरू खाली निद्रा केली तो घटिका भरा एक ब्राह्मण सपनात येऊन बोलिला की आडका देवोन राज्याचे शेजारी भोजनास बसणे त्यास कैसे प्राप्त होईल कीर्तन भगत दुर्लभ आहे तुह्मी का थडीत निजला हे पाहोन **देवानी** त्यास सागितले ॥

( ७९ ) एक ब्राह्मण पुत्रा साठी नग्न द्वाराचा नवस फेडावयास **देवास** पुसो लागला **देवानी** आज्ञा केली माहाद्वारे करा ते न मानोन पूर्वेचे द्वार करोन दक्षिणेस गेला तेथे पिशाचानी वेढता च भ्रांत जाहला दुसरे दिवसीं चळोन आणोन **देवानी** मासभर स्वये अनुष्टान करोन बरा केला ॥

(८०) एकदा **आळंदीस** गेले तेथे एक संन्यासी एकादशी चे दिवसी तूप खिचडी मागत यात्रेत फिरत होता तो अंतर्यामी **देवास** कळता च **राम जोसी** सिष्य होते त्यास पाठवोन त्यास आणोन **सखूबाई** कर्वी तूप खिचडी करवोन वाडिता च त्यासि बोलिला की माझिया अंतरी चें तुह्मास कैसे कळले **देव** बोलिले पदस्त तुह्मी च आहा मग परसात जाऊन आचवायास गेला तो संन्यासी गुप्त जाहाला ॥

(८१) **पंढरी** चे यात्रेस जाते वेळे अशक्ता च्या घोंगड्या खांद्यावर घेऊन व त्यास अश्वावर बैसऊन ज्यास खर्च नाही त्यास खर्च देऊन सांभाळून पंढरीस नेत असत पंढरीस गेलिया वरी तेथे **ज्ञानेश्वरबावा** आला ब्राह्मण होता तो **देव** तेथे आलिया वरी सर्व वारकऱ्यासह येत आसते वेळे मार्गे श्रम जाले ह्मणून विलंबे सायंकाळी **देव** आले ते त्यास कळलें नाही परंतु त्याचे रूपे पांडुरंग **देवा** चे मठी जाऊन भार घातला वर्तमान पुसले मग दुसरे दिवसी स्नानास **देव** चालिले तेव्हां **ज्ञानेश्वरबावा** भेटला नमस्कार करून पुसो लागला का केव्हां आला **देव** बोलिलें की काल तुह्मी भार घालून वर्तमान पुसोन गेला असता आज का पुसता ते बोलिले की आह्मी काल गावास गेलो होतो ते आजि स्नानास आलो रात्री येथे नव्हतो याचा पूर्ण शोध करिता च सर्वास कौतुक जाले ॥

(८२) एक **खानदेशाहून** बाई पंढरीस आली होती तिला दशमी एकादशी द्वादशी तीन उपोशने जाहाली शरीर अशक्त जाले ह्मणून विठोबा चे दर्शन होईना परंतु त्याचे भक्तीने तिसी स्वप्नात विठोबाने एक खारीक देऊन सांगितले की **निरंजनस्वामीस** हे खारीक देऊन नमस्कार कर ह्मणजे विठोबा चे दर्शन तुला जाले मग ती ह्मातारी बुका तुळसी ची माल हाती घेऊन **देवा** जवळ येऊन वर्तमान सांगोन विठोबा ची खारीक देऊन पूजा करून नमस्कार करू लागली तेव्हां **देवास** हि अष्टभाव होऊन साष्टांग नमस्कार घालू

लागले मग त्या बाई ची आपण हि पूजा करून तीळ तीळ प्रमाणे सर्वास वाटली ॥

( ८३ ) दुसरे दिवसी वालवंटी गेले तों वाळू चें घर मुलानी करोन सर्व संसार-खेल आत कल्पिला होता स्वयंपाक जाहाला काय ह्मणून मुले आपले आपल्यात पुसता आहेत तो तेथे **देव** जाऊन ह्मणू लागले की माध्यानकाली मी अगांतुक आलो आहे मग मुल ह्मणू लागली की खुळा ब्राह्मण आह्मास नलगे तेव्हा **देव** बोलिले की जैसी तुह्मी मुले तैसा च मी आहे मग यासी बोलावून वाढिला जेऊ घातले आंचवायास बाहेर येता च काखेनें सब्द केला तेव्हा मुल पुसो लागली काय वाजले **देव** बोलिले कवाड वाजले मुले बोलली दार कोठे आहे **देव** बोलिले तुमचे दार कोठ आहे मग परस्पर विनोद करून गावात आले मग भिक्षेस गेले तो एक्या घरी एक बाई रागिस्ट होती ती बोलली की पुस्ट दिसतो आहेस भिक्षा का मागितो आहेस कोठे चाकरी करू नव्हती माझे घरी आज पावणे येता आहेत तारंबळ आहे उदक पुरविलेस तरी जेऊ घालीन मग **देवा**नी अवश्य ह्मणोन दाहा घागरी पाणी आणले तो **एकनाथा** चे वंशज **पैठणकर** तेथे भोजनास आले त्यानी वळखिता च नमस्कार घाळून घागरी हिरोन घेऊन त्या बाईस रागास आले ॥

( ८४ ) एकदा भिक्षेस एका वाडियात गेले तेथे एक बाई आंग धूत होती ती बोलिली की नेत्र झाकून क्षणमात्र उभे रहा माझे स्नान झालियावरी सोवलियात तांदूळ आहेत ते आणून घालीन मग तिने स्वयंपाक करून भोजन करून खरकटी घासावयास आली तो **देवा**नी नेत्र लाऊन देवा च्या मानसिक पूजे ची समाध लागली आहे हे पाहून शरमी होऊन हाक मारोन भिक्षा घातली ॥

( ८५ ) एके दिवसी देवा चा सिश्य **भवानीदास दाऊद-खाना** चा दिवाण बहुत भाग्यवान होता त्यास पाछायाची हरकारी दक्षिणे ची होती त्याने **देवा** पुढे तीनसे व्हन ठेवले विनंति करोन

पुसो लागला की माझा हेत आहे पंचवीस सहस्राचा सरंजाम देवा च्या संस्थानास असावा आज्ञा होईल तरी दिल्लीपती चीं तांबरपत्रें करून आणितो कोणकोणते गांव आज्ञा करावी हे ऐकोन तीन सते ठ्हन ब्राह्मणास वाटून बोलिले आह्मास गजानने समुद्रवलयांकित पृथिवी दिली असता दाहा वीस गावात कोंडून का राहावे गुरुपुत्र असलास तरी गणेशा च्या **लिंब्या** चें व **नामल** गाव चें देऊळ बांधोन गणपती ची देवळे आयुश आहे तो जीरणउधार जितका घडेल तितका करणे तेणे करून हे लोकी परलोकी कल्याण हे चित्ती धरून **लिंबया** चें देऊळ तीस सहस्त्र रुपये लाऊन बांधिले दाहा सहस्रा चीं अन्नशांती आर्च्या ब्राह्मणास दक्षणा वस्त्रे हा खर्च केला व ठ्हन रुपये मिसळून दहा सहस्रा चा अभिशेक **देवा**न केला ते द्रव्य कितेक ब्राह्मणा च्या लग्नास रिणास गृहास यज्ञास यात्रेस आंधपंगूस देवविली आपण स्पर्श केला नाही या प्रमाणे **नामल**गाव चें देऊळ बांधोन आर्च्या करोन **देवा**नी कळस केला तेंव्हा **भवानी-दासा** ची स्त्री कासीस होती तिचें पत्र आले होतें उतर **देवा**नी लिहिले हा श्लोक

॥ आधीं च अंत्याक्षर तें लिहावें ॥

( ८६ ) मग लमाणानीं **नामल**-गाव लुटिले तेंव्हा **देव गणेशतीर्थी** जाऊन

॥ बहुत दिवस आरत होतें ॥

हे पद ह्मणोन नाचो लागले सर्वस्व लुटिले होते परंतु आठा दिवसी पहिल्या परीस अधीक जाले भांडारी ह्मणोन वही होती तेथे बालपणा पासोन सर्व कविता लिहिली होती ते लमाणानी नेली मग आणिक वईया करून कविता लेहून काडली ॥

( ८७ ) एकदा सिहस्तास **शहागडास** गेले काही दिवस तेथे वास केला **लंबोदर थेव्यानी** दाहा रुपया चा सेला अर्पिला होता मार्गी जात होते तो भिकारीण एक बाईको शीताने पीडली होती वस्त्र नव्हते ह्मणोन तिला दिला रात्री कथे चे वेलेस देव

॥ द्या मज पासी । मी होईन तुमची दासी ॥

हे पद ज्या कथेत ह्मणत तेथे ब्राह्मणा च्या चरणी नमन करीत परंतु **शहागडी** अवघी शिश्य मंडली होती तो या पदाचे वेलेस च दिगंबर एक पुरुष येऊन **देवा** पुढे वाकता च पाई मस्तक ठेविता च अदृश्य जाला ॥

( ८८ ) तेथोन **पैठणास** गेलिया वरी **वेणूगोपाल-बावा वरुणभट** यासी **देवासी** फार मैत्री असे त्यानी **देवास** हा श्लोक लेहून दिला .

॥ देहिंद्रिय मन साक्षी ॥

( ८९ ) नदी तटाकी एका मुला ची लंगोटी पोहताना व्हावोन गेली मूल रडू लागले शत मनुष्य होते पर कोणास सुचले नाही मग **देवानी** नवा पैठणी वीस रुपया चे धोतरा चा पदर फाडून दोन लंगोट्या दिल्या ॥

( ९० ) **सुलतानजी निंबालकराने** पूजा करून जरतारी चादर **देवास** तीनसे रुपया ची अर्पिली होती ते **कासीराज-स्वामी** चे पुत्र **जयरामपंत** होते त्यास दिली ॥

( ९१ ) मग **मध्वमुनेश्वरा** चे पत्र आले त्यात

॥ मंगलमूर्ती चे चरण जो चिंतील ॥

हे श्लोक बारा पाठविले मजकूर लिहिला की येथे गणपती आहे तो लोकानी ह्मसोबा केला आहे आमचे ऐकत नाहीत हे ऐकोन **देव** तेथे गेले मग तेथील लोक मिळवोन सांगितले की हा गणपती असेल तरी या ती दिवसात दृष्टांत अथवा काही चमत्कार जाला तरी कृत्रिम करू नका त्यानी मान्य केले तिसरे दिवसी ह्मसोबा ची खोळ पडता च गणपती चे अवयव सर्वानी पाहिले परंतु तेथील ह्मसोबा बहुता शूद्रा चा कुलस्वामी होता ते आइकेनात तेव्हा शूद्रास एक्या च मूर्ती च्या पृष्टभागी म्हसोबा स्थापोन दिला पुढे ब्राह्मणास गणपती

स्थापोन दिला तेथ अद्याप तैसा च चालत आहे **शंबरीशेंदूर** दईत गणपतीने तेथे मारिला ह्मणोन शेंदूर वाडा होता ॥

( ९२ ) तेथून **राजुरास** गेले चतुर्थीस चंद्र-उदई पूजा केली नैवेद-समई व्याघ्र येऊन निवेद भक्षिता च **देव** एकीकडे जाले व्याघ्र गेलिया वरि **नरहर-देव** मूर्छित पडले होते त्यास सावध करून भोजनें जालीं ॥

( ९३ ) मग **गंगा-ह्मसल्यास** आले तेथील जोशां ची मुले सज्जन पाहोन त्यास अनुग्रह केला मग त्या **राम बाळाने** अनुस्टान करिताच गणपती प्रत्यक्ष जाला ॥

( ९४ ) एकदा **भीमा**तिरी च्या **देऊळ-गावास** आले तेथे दो प्रहरा ब्राह्मणा ची स्त्री मृत्तिके ची घागर भरोन चालली तो छिद्रा वाटे उदक येऊ लागले आरद कोस गाव लांब चोळी-लुगडे नवे नेसली होती चिंदी कोठे पाहाता दिसेना ह्मणोन चितावली तो **देवानी** नव्या धोतरा ची चिंदी फाडून दिली तेव्हा ती पाणी घेऊन गेली ॥

( ९५ ) **फलटण** च्या रानात येक माहारणी मोळी बांधोन जात होती परंतु उसणे करून जावयास सामर्थ्य नाही मग **देवानी** पाणी आणून पाजून मोळी डोईवरी घेऊन माहारीस हाती धरून कोसभर **फलटणास** पावती केली ॥

( ९६ )**निरा नरसिंपुरी** मस्तकी मोळी वरोन पायपोस धोरत पडिला तेव्हा **देवानी** धावोन पायपोस आणून देऊन अनामिकास पार करून दिला ॥

( ९७ ) **कराडी** एक माहारीण गर्भवती घागर भरोन चालली तो दोन प्रहरा मुला चे पाय पोळू लागले मग ते मूल **देवानी** खांद्या वरी घेऊन डगरे वरी पावते केले ॥

( ९८ ) एकदा स्नान वेले पंचा मधे ढेकूण पाहिला तो

**गोविद पूर्णा**काबरोबर घरास पाठविला कथे मधे विंचू निघाला तो धरावयास गेले परंतु तो डसला असता हि दुसरेया हस्ते धरोन बाहीर सोडिला

( ९९ ) कथे च्या वेलेस गोठ्यास अग्नीने स्पर्श केला तो विजवोन दिला नाही आपल्या आपण च विजाला ॥

( १०० ) **रगाजी चंदोस** दिवाण–कार्या मुळे आविदाने कोटांत उपोषित बैसविले तेथे **देवा**नी जाऊन त्याच्या वारी चा मी बैसतो हा भोजन करून येईल ऐसें ह्मणताच अविंदास संकट पडिले त्याची मुक्तता केली ॥

( १०१ ) **विशालगड** च्या वाटेस व्याघ्ररूपें **अवधूत योगीराजा**ने दर्शन देता च **देवा**नी नमस्कार केला पुढे आलियावरी **सिवदासबावा**स सांगता च मूर्छागत पडले त्यास सावध करोन घरासि आलिया वरी **देवास अवधूत** पुसो लागले की व्याघ्र पाहिला असे तेंव्हा भ्याला नाहीस की ॥

( १०२ ) एकदा **वडगावास** गेले तेथे ब्राह्मणा च्या पंगती बैसल्या होत्या त्यांच्या पंगतीस **देवा**नी बसावे हा **गोपाळ-बावा** चा मानस जाणोन थाली वरी तांदूल दाल शाक सोवळ्या करवी टाकवून तीर्थी स्नान वेळेस देव रुसी इतरास एक एक उदकांजली देऊन तीन अर्घ्य तीन गाइत्री जपोन देवार्चन होताच पंगतीस भोजनास बैसले **मुनीश्वर-बावा**स दोन रुपये दिले होते तेथे जेंव्हा जात असत तेंव्हा वाद्यें घेऊन सामोरी येतील ह्मणोन चोरून रात्री जाऊन पाणीं व्हावे खरकटीं घासावीं सडा-संमार्जन करावें ॥

( १०३ ) एकदा **कुरोली–सिधेश्वरास** गेले सांगाते **मुनेश्वर** लहान होते त्यास डावे हाते वारियाकडे धरून चालता ह्मणत ॥

॥ त्याचे संगतीचा मज लागो वारा हो ॥

**सिधेश्वरी माहा–काका** नामाचे इजरवेदी वैदिक **देवा** चे शिष्य होते त्यास आज्ञा केली की **कराडी** राहून विद्यार्थीयास आध्यान

स.गणे त्यानी **रत्नाकर देवा**स सांगते वेळेस बहुतास वेद सांगितला ॥

( १०४ ) **कातर-खटावा**स गेले तेथील कमाविसदार नमस्कारास आला त्यास पिवळी पांढरी तांबडी दक्षणा मागू लागले तो चिंताग्रस्त बोलिला या वेळेस मज पासी काही नाही मग हासोन **देव** बोलिले तुमच्या परसात सुभ्र कन्हेर आरगत ज्यासविनी पीत चाफा आहे ह्मणून ऐकिला त्याची पुष्पें देणे **कृष्णराव खटावकर** गाडिया वरी अग्निहोतर घेऊन **कराडा**स आले तेंव्हा सांगितले की **विद्याधर पाटका** पासून दोन तीन संथा घेऊन वेद विद्यार्थियास सांगणे आज्ञा वरून त्यानी हि सांगितला ॥

( १०५ ) **बारामती**हून **माहादेवा**स जाते वेळेस तस्करानी लुटले **सिवदासबावा** जवळ तुपाचा गेळा मागे होता ते आडिया वरी गेळा घेऊन तस्करा चे माघे **देव** धावोन हाका मारू लागले की **माहादेवा** च्या समाराधना चे साहित्य **माहादेवा** तुह्मास दिले परंतु कोरडी भक्षु नका तुप घेऊन जाणे हे आईकून त्यानी गेळा नेलिया वरी त्यास अनुताप जाला की आश्या माहा-पुरुषास लुटावे ऐसे नाही मग सर्व पदार्थ आणून देता हे घेईनात परस्परें बहुत आगरे केला मग तस्कर बळे च टाकून गेले गणानी सर्व पदार्थ **माहादेवी** आणिता च **देवा**नी ब्राह्मणास वाटिले ॥

( १०६ ) **इंदोली**त **देवा** ची भगत गणपती उपासक **लक्षुमीबाई** होती तेथे गेले ह्मणजे त्यांच्या हेतूस्तव झगा सेला मुंडासे बांधोन तेथे जात असत नाहीतर सर्वदा टोपी धोतर वोळ आठ हात धोतरे घेत असत तेथे भाद्रपद चतुर्थी च्या उछावास कथेस **रत्नाकर देवा**स आज्ञा केली असे

( १०७ ) **वसंतगडा**स एकदा गेले तेथे एक बाई होती तिने निरशा दुधातील फरालास केलें न कळता कडू भोपळ्या ची शाक घातली ती देवानी भक्षिली मग तिने भक्षिते वेळेस कळले मग चूरकर जाली ॥

( १०८ ) एकदा **पंढरीस** गेले तेथे **जानोजी निंबालकर** नमस्कारास आला त्यास देशावरी मागू लागले तो चिंताग्रस्त काही बोलेना मग बोलिला की एक्या घोड्या निसी आलो आहे त्याचे कारकून बोलिले की **देवास** ऐसे बोलू नये मग मागा ह्मणू लागला तेंव्हा **देवानी** मागितले की मातापितरास तू छळतोस तू ऐसे करू नको त्याची आज्ञा पाळित जाणे त्याने हि मान्य केले त्या दिवसा पासून पितरा ची सेवा करू लागला ॥

या प्रमाणे सर्वास देशावरी मागत स्त्रीस भ्रतारसेवा पुत्रास पितृसेवा व दाशीसेवकास स्वामीसेवा व सर्वास श्री गजानन जय गजानन जय जय गजानन या समस्तास देशावरी मागत असत ॥

( १०९ ) प्रातकाला पासून निद्रे प्रयंत देवा च्या गोस्टी व प्रणवा ची पूर्वपीठिका जो येईल त्यास सांगत तो **शाहू छत्रपती** नमस्कारास आले त्यानी विनंति केली की **सप्तरुसीस** कृपा करून आह्मा बरोबर चलावे ह्मणोन एक मजल बरोबर आले मग प्रातकाली उठोन **कराडास** आले तो त्यानी **नीलप्रभू खंडप्रभू चिटणीस** व पालखी पाठऊन बहुत आगरहे **माहुली** पर्यंत नेले तेथे भेटीस येऊन स्वताची कामना सांगितली मग **देव** बोलिले की चुर्तीवर्ती दूर्वार्पण करणे संतत होइल परंतु ‘ परयोन उत्पतेत बिंदू ’ हा श्लोक व ‘ पूर्वी जे जे संचित केले ’ हे वोवी छत्रपतीस उतर दिले मग छत्रपतीच्या चित्ती आले की एक दोन खेडी **देवा** चे सेवेसि द्यावी परंतु **देवानी** घेतली नाहीत व राज्यप्रतिग्रह नलगे ह्मणाले द्रव्यवस्त्रा-दिक काही न घेता च **कराडास** आले छत्रपतीस **चिमणाजीपंत घोडके** यानी सांगितले की पूर्वी **परशराम प्रतिनिधीनी देवास** घरास आणोन अनुग्रह घेऊन एक दोन गाव द्यावे ह्मणोन **मोरे-श्वरा** च्या यात्रे चे वेळेस **कराडा** पासोन निघाया ची बातमीस चौक्या साताऱ्या पर्यंत ठेविल्या होत्या परंतु **देव** आले नाहीत मग सहजा मधे **माहुलीस** आले होते तेथे जाऊन अनुग्रह मागितला मग

मोहूर्त पाहाता च नव्हता या मुळे **देव** बोलिले जे आउश असले तरी पुढे होईल मग **नामल**-गावास गेले **परशराम प्रतिनिधी** चा साहा महिन्या काल जाला त्याचा हेत होता तो जाणून **देव** **कराडास** आल्या वरी पालखी व कारकून पाठऊन **देवास** **विशाल-गडास** नेऊन **आपा प्रतिनिधी** यानी वडील स्त्री **सकूबाईस** व वडील पुत्र **गंगाधरपंत** यास **देवा** ची प्रार्तना करून अनुग्रह देविला प्रति वरसी **विशालगडास** **देवास** आणीत असत व तीन खंडी भात उछावा साठी **कराडास** पाठवीत ॥

( ११० ) येकदा **सुपने तांबव्यात आणाजीपंता** च्या मातुश्रीनी **देवास** एकास च भोजनास बोलाविले उसणकाली दुर्बल पणे शाक नाही ह्मणोन शरमी होती हे जाणोन परसात घेवडिया चा मांडव फळ तो न **देव** ह्मणो लागले की घेवडी च्या पाल्या चे भाजी ची प्रीत पार आहे कोठे मिळेल पैका देता घेऊन येणे ती बोलली की परसात आहे मग तिच्या समाधाना स्तव हरस दाखऊन भाजी केली या च रीतेने सर्व भूता चे समाधान ज्या रीतीने होय ते करीत ॥

( १११ ) **पाटणास** एका चे घरी पाक शिध केला तो दोन वरसा च्या मुला चा विटाल जाला तेव्हा स.न-उदक-स्नान करून भोजनास बैसले तो येक गोसावी ह्मणूं लागला की तुह्मी यानी असता नग्न मुला चा विटाल मानिता मा अज्ञान लोकानी काय करावे त्यास **देव** बोलिले आह्मी मुला चा विटाळ न मानिला तरी पुढे होतील ते ह्मणतील की मोठ्या माणसाचा विटाल **देव** मानीत नव्हते

'यद्यदाचरति श्रेष्ठ'

हे भगवत-वचन आहे मग तो उगा च राहिला ॥

( ११२ ) एकदा **कोलापुरास** गेले तेथे कोणी शाक्त होते त्यानी कथाश्रवणास नेले तेथे पाहिले तो बहुत स्त्री पुरुष मद्यमांसा-

दिक वाम-मार्गा चें साहित्य व त्याचे मनोगत निरंजनास भ्रस्टवावे हे जाणोन संकटी

॥ हेरंब दयाला माजी विनती परिस ॥

हे पद ह्मटले तो द्वारा पासी **निरंजन निरंजन** ह्मणोन कोणी तीन हाका मारिल्या त्याचा शोध घेयावयास येऊ देईनात पर आता येतो ह्मणोन बाहेर येऊन पळोन आले ॥

( ११३ ) मग **कराड** चे संगमीं तर्पण **देव** करीत होते तो एक जंगम उदकात मुख धुते वेळेस थुको लागला त्यास बोलले का आपोनारायणा मधे थुको नये तो बोलिला की पृथिमी नारायण नव्हे हे खोटे आहे मग त्यास **देवा**नी शाबासकी देऊन चडविला त्याने स्नान केलिया वरी जवळ बोलाऊन पुसिले की रात्री आई भईण भावजय सून लेक बायको ह्या निजेल्या असतात परंतु नाडा तू कोणाच्या आंथूर्णा वरी सोडीत असतोस मग तो बोलिला की देवाने जो मार्ग लाविला तो करितो मग **देव** बोलिले की जैसा तेथे विचार आहे तैसा येथे हि आहे त्याचे मनी बिंबता च नमस्कार करू लागला या प्रमाणे सर्व लोकास बोध कराया ची युग्त **देवा** पासी अपूर्व असे ॥

( ११४ ) एकदा कन्ये च्या व पुत्रा च्या मुलानी कृष्णातीरी धोंडे-मार आरंभिला हे **देवास** कलता च क्रोध करून दोर घेऊन बैसले या दोघा शिष्यास मुले आणावयास पाठविले **मुगताबाईस** सांगितले की स्नानास पाणी ठेवणे हा प्रसंग पाहोन एक माहा-पुरुष बोलू लागला की सडवैरी तुह्मी जिकले असता वोवळे होऊन दोर घेऊन मुला मधे आत्मा आहे त्यास क्रोध करून मारू ह्मणता मग **देवा**नी उतर दिले की आपल्या गुरूस तरळ जाहाली तरी डागावे की न डागावे तैसें मुलानी परस्परे धोंडा हाणिता घात जाला तरी काय करावे ॥

॥ लालनात् बहवो दोषा ॥

ऐसे धर्मशास्त्र आहे हे सागता च तो संतुस्ट जाहाला धर्मशास्त्री व

कर्ममार्गी फार आस्था असे सोवल्या चें व मध्यम त्र मुला चें व बाहीर लागावया चें उदक चौ प्रकार चे पात्र वस्त्र एका चें एकानें घेतलें ह्मणजे शिक्षा करावी ॥

( ११५ ) **जालनापुरी** कथा आरंभिली होती तो कथेतून जाऊन एका शिष्याने गावात कोठे भिभीच्यार केला हे कळता च **देवा**नी साहा महिन्या ची कुटुंबा ची खर्चीं देऊन संगतीस नकोस ह्मणोन त्यास लाऊन दिले

( ११६ ) घरी आगनोतरा चे गोले मोजते वेळे ढुंढी एक ढुंढी दोन ऐसे मोजावे नामावाचून वाणी व्यर्थ न श्रमवावी ॥

( ११७ ) **कराडीं** तीन पाया ची गाय होती सौरक्षण करावयास कोणी नाही ह्मणोन घरा प्रहरा दिसा पासोन कृष्णेस हळू हळू तिस्रे प्रहरा पावे हे दुःख पाहोन बहुत श्रमी झाले मग घरी आणून बांधले त्रिकाळ पूजा करोन मुला सारिकें संरक्षण केलें ॥

( ११८ ) **नामल**-गावी एक तेलंगी वृद्ध बाई अन्न वस्त्र द्यावयास कोणी नाही भिक्षेस हि हिडवेना ऐशी पाहोन नमस्कार करोन **देवा**नी तिची प्रार्थना केली की बाळपणी आमची मातुश्री गेली शेवा कराया चा हेत होता तो पूर्ण करावयास देवाने तुह्मास पाठविले तरी लेकरावर कृपा करोन सेवा घ्यावी ऐसे ह्मणोन घरास आणोन **आक्का**स सांगितले की **रिद्धे** तुज सासू नव्हती ह्मणोन हे आणिली आहे याच्या आज्ञेंत राहोन शेवा करणे मग उत्तम वस्त्रे उत्तम अन्ने देवोन बहुत दिन माते परीस शेवा केली

॥ **नामल**-गावी माय **कराडी** गाय निरंजन त्राहे ॥

हा अहणा पडला ॥

( ११९ ) **बिडांत गिरमाजी गोसावी** होते त्यास साहा रुपये **देवा**नी पाठविले त्येव्हा हा श्लोक पाठविला

॥ कामारि सूत पत्नि तात ॥

**बिडांत कादर** माहापुरुष होता तो **देवा** च्या दर्शनास येत होता

हे अंतरिं भोजन-वेळेस कळता च सत्वर अर्ध्या वाटे पर्यंत दोघा च्या भेटी होता परस्पर वर्तमान सांगोन अनुभव बोलता च देहभान विसरले ॥

( १२० ) **बिडीं सज्जन-सायी** माहा-पुरुप होता तो लोकास धोंडे मारी **देव** गेले ह्मणजे हाती धरोन येकांती दोघे बसोन काय बोलेत् त्ये देव जाणे ॥

( १२१ ) एकदा **वान्नेर-खेडे वालेघाटा**वर आहे तेथे **चिमणाजीपंत घोडके** यानी **देवा**स नेले तेथे **कृष्णदयार्णव** आले होते त्ये **देवा**शी भांडू लागले ते ह्मणेत तुमचा देव माणसा चा अवतार हे ह्मणेत तुमचा देव माणसा चा कुत्री चा गाढवा चा बटकी चा एक ह्मणे तू खापर एक ह्मणे तू बाष्कळ ऐसा वाद मासभर होत होता दिवसा संतर्पण रात्री कीर्तन मग वस्त्रे बहुत सांचली होती ते ब्राह्मणास वाटिली एक गोसावी कथा करावयास येत असे दुर्बल होता त्यास दुशाल दिली दुसरे दिवशी तो रडो लागला त्यास **वोडकर चिंतामणी**ने पुसिले की रडतोस तो बोलिला की **निरंजना** चे अउदार्य पाहोन नवल वाटते मग **तुलजापुरी** स्नान वेळेस वृद्ध ब्राह्मण **कल्लोळतीर्थी** संकल्प सांगावयास आला थंडी च्या मुळें मुखांतून शब्द येईना वस्त्र हि नव्हते ऐसे पाहोन चार शाला जोडून सर्वाभरण केले होते त्ये कोणास न कळता त्यास देवोन पळविला मग **रघुनाथदेव बल्लाळ-देव** दिशेस गेले होते त्ये आलियावर पुसू लागले गवाळ्यात सर्वाभरण दिसत नाही **देव** बोले की विश्वरूपात सर्वाभरण कोठे असेल ॥

( १२२ ) **नामल**गावी **आकाबाई** दधि-मंथन करताहे तो एक सन्नेश येऊन तक्र-पीठ मागू लागले तो **आका** बोलिली की मंथनास आरंभ केला आहे तक्र जालियावर भक्षावे हे ऐकोन क्रोधे करून खडावा घेऊन पाठीवर मारू लागला तो **देवा**स कळले मग येऊन त्याच्या पायावर साष्टांग नमस्कार घालोन प्रार्थू लागले की

स्वामी चा हात दुखावेल मग चाळीस पन्नास खडावा मारोन **बैसला** **बैसोन** बोढू लागला की तक्र-पीठ का घातले नाही मग तैश्या **च** तक्रा मधे पीठ दिले ॥

( १२३ ) **अंबडां**त अंत्यजाने गाय कसाबास पाचा रुपयास विकली होती हे ऐकता च्च **देव** तेथे गेले तो शस्त्र घालाया चा समयीं गाय कंपायमान झाली आहे त्येव्हा रुपये देऊन सोडविली ॥

( १२४ ) एकदा **गोसावीनंदन देवा** चे भेटीस आले त्यानी

॥ नेत्री दोन हिरे प्रकाश पसरे ॥

हे दाहा श्लोक करोन ह्मणून दाखविले मग **देवा**नी हे दाहा शिलोक ॥

॥ जो शोभे गुरुपाई निर्गुण गुणी ॥

हे करोन ह्मणता च संतुष्ट झाले मग **गोसावीनंदना** चा अवतार जाहालिया वरी त्याचे पुत्र **देवा**स अनुग्रह मागू लागले मग मोहूर्त पाहून बोलाविले ते वेळेस तांबूल चावीत आले मग **देव** बोलिले जे साक्षात गणपती तुह्मी आहा तुह्मास अनुग्रह नलगे ॥

**उधव-चितगन देवा** चे भेटीस आले त्यानी

॥ श्रीमत् शंकर शंकर प्रभुवर्यार्या ॥

हे आरती केली ॥

**कोकील-प्रभू** दर्शनास आले त्यानी

॥ निरंजन चतुरक्षरमंत्र पावन सर्वासी ॥

हा कटिबंद केला ॥

**सिवदिन-बावा** दर्शनास आले त्यानी देखील

॥ हा भजतो निरंजन रे ॥

हे पद केले ॥

**उद्बोदनाथा**नी मेखला एक दिली होती ते सणा चे दिवसी आंगी घालीत **केशव-गोसावी** उंबरजेत होते त्यांच्या भेटीस **देव** गेले तो ते कृष्णेस गेले होते मग त्याच्या आसना वरी आपल्या

मस्तकी चा किरट ठेवला पुढे गेले तो ते आलिया वरी किरीट **मस्तकी** घालून बोलिले की **निरंजना** आज कलशारोपण केले देह आवसान झालिया वरी तिसरे दिवसी कागद सापडेल तो त्यास देणे इतुके ह्मणोन देह सोडिला त्या स्थली कागद सापडला त्याची अक्षरे मोहरी प्रमाणे कोणास वाचेनात ते पत्र आलियावरी **देवा**नी वाचून नेत्री अश्रुपात आणून लिग-शरीरे अनुभवा च्या गोस्टी लिहिल्या आहेत ह्मणो लागले ॥

**वामनस्वामी कराडी** भेटीस आले होते त्यास **देवा**नी पाच शुलोक गणपतीपर करा ह्मणोन आज्ञा केली होती ते बोलिले की वाणी कृस्णार्पण केली आहे ऐसे ह्मणोन **देवा** वरी हा शुलोक केला ॥

॥ ज्या मंगले मंगल या जनाचें ॥

**कृष्णदयार्णवा**नीं

॥ देवा वरी हेमी सीमा न करवे ॥

हा शुलोक करून बोलिले की

॥ संत सनकादिक भगत ॥

हे आरती तुह्मी प्रतीहीं ह्मणावी ऐसा हेत आहे ॥

( १२५ ) एकदा संन्यास घ्यावा ऐसे **देवा** चे मनी आले तो सपनात पंच्यागनी पांच ब्राह्मण व वेदी दिव्य स्त्रीरूपे येऊन बोलिली की वियोग न व्हावा हे आह्मास पार वाटते संन्यासरूप तुह्मी आहात मग ज्याग्रत जालिया वरी हे पद केले—

॥ आह्मी जालो संन्यासी ॥

॥ राहू गुरुपदा पासी ॥

**देवा**नी घरी च्या वस्त्र-पात्र-पशु-मनुशादिकांस वाणी वेर्थ न जावे ह्मणोन देवा ची च नामे ठेविली होती ॥ चंवू च नाम भालचंद्र उपपात्रा च नाव गुरूभजन हांड्या च नांव आरणाचल घावरी च नाव लंबोदर घ परात च नाव विश्वरूप तांबणा च नाव तारक घंघाला च नाव गंगाधर कासंडी च नाव मथुरा पितल च नाव कासी पली च नाव पावनी भोग-

णया च नाव सीताराम तव्या च नाव तापसी तेल तळाया च नाव तपोनिधी मोठ्या तांब्या च नाव मोरेश्वर लहान तांब्याच नांव गोविंद लहान तपेलया च नाव पतीतपावन वाटी च नाव मंगलमूर्त कासी च्या कासंड्या च नाव कैलास गडू च नाव गरूड सकलादे च नाव स्तंबुद पासोडी च नाव पार्वती सेला च नाव संतपुरूष दुपट्या च नाव दूर्वाकुर गंजा चे नाव गजानन धोतरा च नाव धोपेश्वर सुताड्या च नाव सुदामा कांबळ्या च नाव कानोबा घोंगडी च नाव गोदावरी गवाळ्या च नाव गोरक्ष पाला च नाव परात्पर शाले च नाव सावित्री पामरी च नाव पूपरमी सोवळ्या च नाव पीतांबर तव्या च नाव ततूरुपुष सतरंजी च नाव संतरजी जमखान्या च नाव जनार्दन टोपी च नाव किरट झगा च नाव कवच्य जोटा च नाव जोतीरूप दगडी तळी च नाव शरावती येकारती च नाव निरंजन धुपारती च नाव धूम्रकेतू पाटा च नाव पावन पाट्या च नाव पाराशेरी पाट्या च नाव पांडुरंग वरंठ्या च नाव विठल

( १२६ ) देवा चे स्नानस्थल ची मृत्यिका लाविता **सईबाई** चा काला कोड गेला ॥

**देवा** चे तीर्थ लाविता **बच्यामामास** पाय आले ॥

**देवा** चे पूजा आरती ऐकोन **बहेकर राधाबाई** चा समंध गेला ॥

( १२७ ) **गंग्या गुरव नामल**–गाव चा पांगुल होता त्यास स्नानस्थल ची मृत्यिका लाविता च पाय आले ॥

( १२८ ) पंढरी च्या वाटेस वेथे च्या मुले **द्वारकाबाई** चे उदक कोठे मिळेना ह्मणोन प्राण गेले कास्ट अग्नी हि सिध केला होता माग **देव** होते ते आले त्यानी भंता च्या पायधूली ची गोली व आपले तीर्थ मुखी घालता प्राण आले मग **पंढरपुरी** नावेत ठेवली

( १२९ ) **सदासीव-गर्डी देवा** च्या कथेंत **चिमणाजी दाणवे** सुभेदार याची स्त्री **राधाबाई** च्या आंगी समध येऊन बोलिला

की या स्त्रीस एक कन्या होईल दुसरी स्त्री करणे तिला दोघे पुत्र होतील त्यात एक वाचेल मी स्वामी च्या कथेने तृप्त जालो आता राहात नाही ऐसे बोलोन गेला ॥

( १३० ) देवा चा भाचा **विनायक खडकमांत** होता व **ईदोबा** येक शिष्य होता व **कृष्णापा नामल**-गावी होता हे तिघेजण मनुशातून चेवले होते पाशाण मारीत असत परंतु **देवानी कृस्णा** यास कीर्तनभगत सांगोन व **यादोबा**स सेवा-भगत सांगोन व **विनायका**स अनुस्टान सांगोन तिघा च हि समंध दूर केले तिघां ची लग्ने करून कुटुंब-सौरक्षण करून संतान जाले ॥

( १३१ ) एकदा **सांवता चे वाडी**स जात होते मार्गी माळा वरी उदक नाही ह्मणोन एक गर्दभ विहिरी पासी उभा होता **देवानी** पाहिले तो घोडी पुढे गेली जवळ कोणी नाही मग कडबंधन्यास पंच्या बांधोन विहिरीत बुडवोन कोठिबीत पशु तृपत करोन गावात आले तो एका ब्राह्मणास कोड होता ह्मणोन अनुस्टान करिता च सपन जाले की उदईक दो प्रहरा **निरंजन-स्वामी** येतील त्यांचे तीर्थ लाऊन गर्धभास पाणी पाजिले ते पुण्य मागून घेणे ह्मणजे कोड जाईल यास्तव तो ब्राह्मण वेशीत दो प्रहरा होता **देव** भेटता च घरास नेयोन तीर्थ लाऊन पुण्य मागून घेता च कोड गेला ॥

( १३२ ) कोकणात **राजापुरा**स गेले तेथे याचा समुदाव बहुत पाहोन कोणी लोटाश्रम होते त्यानी अश्वत्था वरी ब्रह्मराक्षस होता तो वाडा बिराड दाखविले **देव** तेथे राहिले भोजन जालिया वरी ग्रामातील सभ्य आले त्यानी सांगितले की येथे ब्रह्मराक्षस बहुत प्राणी भक्षिले तुह्मी राहू नका मग **देव** बोलिले की त्याच्या अंतरीं गजानन असला तरी भक्ष-णार नाही मग रात्री कथे मधे दिग् शब्दे करोन उभा ठाकिला कितेक लोक मूर्छीत पडले मग **देवा**नी कोण तू ह्मणोन पुसिले तो बोलिला जे या घरा चा धनी साताशा वरसा चा मी आहे बहुत प्राणी भक्षिले परंतु स्वामी चे कीर्तन श्रवण करिता या स्थलास व या योनीस विरक्त

जालो यास्तव आपले तीर्थ व एका कथे चे पुण्य दिलियाने गतीस जातो हे ऐकोन आपले तीर्थ व कथे चे पुण्य हास्ती घालता च दिग् शब्दें झाड उमलोन पडिले मग तेथे कोणास बाधा होईनासी जाली ॥

( १३३ ) **बल्लाळा चे पालीस** गेले तो तेथे गणपती-भगत ब्राह्मण त्या गाव चा खोत देवलात पूजेस आला होता त्याने तुह्मी गोसावी आहाच की काय ह्मणोन पुसिले **देव** होय ह्मणाले तो बोलिला गणपती चे पद येत असल तरी ह्मणा मग **देवा**नी

॥ ब्रीदावळी आपुली संभाळी ॥

ऐसी पाच पदे ह्मटली तो पुसो लागला वरकड गोसावी गणपती चा आकार-वर्णन गातात तुह्मी चैत्रभागा ची पदे ह्मटली ऐसी आणीक येत आहेत की काय मग **देव** बोलिले तुह्मी आह्मी स्तैत जालो ह्मणजे रात्री कथा करू मग संध्या फराल जालियावरी **देवानी नरकेस्वरी** च्या अनुसुंधाने कथा केली सूर्य-उदये प्रयेंत मग तो ग्रहस्त व **देव** आस्टभाव–देव–युग्त प्रसपर आलिग्न सत्गतीत जाले बोलू लागले की ऐसा सखा कोणी भेटिला नाही मग दिवसा संत्रपण रात्री देवलांत कथा या प्रमाणे सतरा दिवस जाले आठरावे दिवसी स्त्रीया चे मुला चे हेत की ग्रामात कथा हावी यास्तव कीर्तनी आरद रात्र जाली तो घरधन्या चा पुत्र लघुशंकेस परसात गेला तो भाता च बळत तस्करानी विरले काढून भाता च्या मोटा बाधोन चालिले हे पित्या च्या कानी सांगता च तो बोलिला की भोबाट करून कीर्तनास विक्षेप केला तरी जीवाह आसडोन प्राण देईन मग आरती जालि[या] वरी पुत्राने पित्यास नेऊन पाहात आहेत तो मोटा पुढे ठेऊन तस्कर उगे च बैसले ग्रस्ताने पुसले की का बैसला ते बोलिले भात नेण्यास आलो होतो पर अंध जालो आता भात घेऊन आह्मासनी शिक्षा करणे ती करोन मार्गी दिसते करणे मग देवा चे तीर्थ नेत्री घालिता दिसो लागता गेले ॥

**पुळ्या** च्या गणेशा पाशी तीन दिवस होते ॥

( १३४ ) एकदा **कऱ्हाड** ची उत्साहमूर्ती पाशाणाची भंगली ते हणमता पाशी मांडिली हे ऐकता च **भवानीदासानी कुंभकोना** हून **चौदाशे** रुपये देऊन दोन गणपती-प्रतिमा तांब्या च्या प्रभावळमूर्ती पके बेताळीस शेरा ची करोन **नामल**-गावास आणिल्या एक मूर्ती **कराडास** पाठविली दुसरी उछाहात मात्र **नामल**-गावास नेत असेत गाव उद्वस तस्करा चे भये व **देवास** तीर्थाटणास जावे लागे ह्मणोन **विठलभट खाडिलकर** गणेशभक्त **बिडांत** होते त्याचे घरी ठेवीत असेत ॥

( १३५ ) एकदा **परंड्यास** आले तेथील भक्तराज नैवेद्यास सांगावयास आले त्यास बोलिले की राळयास चिंचेस घरी कंटाळलो यास्तव दोन महिने येथून जात नाही मग प्रातःकाली न पुसता च गेले ॥

( १३६ ) तेथून **वेळापुर** चा रानातू **मलवडी** चा रावतानी सर्वस्वे लुटोन सर्वास एका वस्त्रा निशी **वेळापुरास** जाऊ दिले संसारास व विषयास विरक्त **गोदूबाई देवा** ची भक्तराज होती ती पुत्रानी बाहेर घातली होती तिच्या घरी **देव** गेले वर्षा च्या अन्ना ची व पातळा ची बेजमी **देवास** करावी वर्षात एकदा भेट द्यावी लागे नाहीं तर उपास आरंभी ॥

राउत **मलवडी** चा दिवाणा पाशी वस्तभाव देवोन आपल्या घरास गेले तो तेथील दिवाण **देवा** चा भक्त होता त्याणे **देवा** चे हाति ची गीता व वह्या वळखिल्या मग राउतास रागास येऊन सर्व पदार्थ घेवोन **वेळापुरास** आणून देऊन **देवास मलवडीस** नेले तो कोणी दुष्टाने **कराडा** कडे वार्ता उठविली की तस्करानी **देव** मारिले हे वार्ता **बल्लाळ विनायका** चे **पालीत** **देवा** चा भक्त होता त्यास कळता च त्याने अन्न सोडले **देवा** च्या दर्शना वाचून अन्न घेण नाही हा निश्चय करोन **मलवडीस** अंतरा **देवास** कळता च बारा दिसाची वाट साहवे दिशी **कराड** हि सांडोन भक्ता चें पारणें केलें ॥

**कर्जते** मधे **रखमाई** होती तिची निष्ठा ऐशी च होती ॥

( १३७ ) एकदा **रत्नाकर देवास लोकंभटा** चे सहस्र रुपये कर्ज झाले होते परतु **देवा** चे पालखीपदा चे बहूत शिष्य होते परंतु सांगाते जे गण असेत त्यास आपल्या वधा ची आण घालोन ह्मणत की यास कर्ज आहे ऐसे कोणास ह्मणू नका मग **देवाने** कर्ज वारिले ॥

( १३८ ) पूर्वी **गोपाळ देव विष्णु देव शुक देव राम-जोशी** शिष्य होते मग **नामल**-गावी दोघी स्त्रिया निवर्तल्या ह्मणोन या संसार-विरक्तीने **बाळाजीपंत देवा** पाशी येवोन साष्टांग घालोन सद्गदित-कंठ प्रार्थू लागला की शरण आलो संसार नलगे हे ऐकोन **देवा**नी पोटाशी धरोन संसारा चा बोध केला परंतु पुरता विरक्त जाणोन अळंकार उंच वस्त्रे अश्वादिक ब्राह्मणास दे ह्मणता च त्याने दिली मग टोपी पंचा कल्पवल्ली देवोन आज्ञा केली की शिवशूर–ग्रहीं सोयऱ्या धायऱ्या चे घरी जावोन शुक्ल वृत्ति करोन येणे ह्मणजे आमचे संगतीस योग्य होशील मग त्याने **बिडा**स जावोन शुक्लवृत्तीने आरंभिता च पिसा झाला ह्मणोन पोरे पाठी लागली ते सोसून **देवा** पुढे धान्य वोतिले मग **देव** हि सद्गदित होऊन पाठ थापटोन आशि-र्वाद दिला की तुज न पढता च सस्कृतिं ज्ञान होईल मग **गणेश-पुराणा** चे टीकेस व **शिवश्लोक-पद** काव्यास आज्ञा केली नाम **बल्लाळ-देव** ठेविले लग्न करून दिले पुत्र झाला अपूर्व कीर्तन करू लागले **गुरुगीता-गणेशपुराणा** वर टीका केली ॥

( १३९ ) थोरले **रघुनाथदेव** दशग्रंथी **गोदातीरी शाहागडी** बहुत शिष्य पढवीत होते **देवा** चा अनुग्रह होता च पुतण्यास अध्येन सांगावयास लावोन आपण **देवग्रही** अखंड पारायण करोन **देवा** चे चरण-संवाहन सर्व मडळीस तांबूल यज्ञोपवीत-दान व समिधा दर्भ गोळे शिश्या करवीं करोन दर्श-पौर्णमासादि इष्टि **देवा** चे अग्नि ची शेवा करीत ॥

( १४० ) धाकटे **रघुनाथदेव** कोकणस्त **शिवापुरा** कडोन

आले वित्पन्न मंत्रशास्त्री होते **देवां** चा अनुग्रह होताच जो नवा भक्त होईल त्यास मंत्रा चा विधि समजावीत व **देवा** पाशीं अखंड पुराण सांगत ॥

( १४१ ) **देवा**स एक मूल वाहीन ऐसा नवस होता त्या **ताम्रपर्णी**-तीरी च्या ब्राह्मणाने दुसरा **गोपाळजी देवास** वाहिला त्याणे **कऱ्हाडी** सा घटिका रात्री उठोन **देवा** चे शौचा चे स्थळी रांगोळी घालोन उदक मृत्तिका ठेवोन स्नाना चे साहित्य व सडा-संमार्जन व होमशालेत रंगवल्ली होमद्रव्य देवपूजे चे साहित्य करोन धार काढोन स्कंदावर उदक पुरवोन व दाळी-साळी वाळवणे द्रोण पात्रे उश्चिष्टे काढोन उभयतास भार घालीत असे ॥

( १४२ ) **भगवंत-भाऊ पोद्खल देवा** चे अनुग्रहीत होते यानी पुस्तके त्याहावी प्रवासी कंठाळा रक्षाव्या ॥

**कृष्ण भाऊ पोद्खल** यानी द्रव्य जतन करावे व बाजारातील जे लागेल ते आणावे ॥

**कोन्हेरी** असे त्याणे प्रवासी वोडी रक्षावी व कथे चा टाळ वाजवावा व **यादव** असे त्याणे पाने व दूर्वा पुष्पे आणावी **बाळो**बा असे त्याण **नामल**-गाव ची कोठी रक्षावी ॥

**नरहर्देव** असे त्याण **बिड** चे भिक्षेस जावे ॥

( १४३ ) **सयाजी नायकानी देवा**स मूल वाहिले त्याचे नाव **शिवदास** ठेविले धाकुटपणी त्यास खेळावेसे वाटे हे जाणोन स्नानसंध्ये च्या मिसें **देव** अरण्यात जावोन त्या मुलाशी सुरपारंबी गोट्या चेंडू हुतुतुतु जळक्रीडा खेळेत मग कीर्तन शिकवोन **शिवदास-बावा** ची शेवा बहुत घेतली ॥

( १४४ ) **देवा**नी आज्ञा केली होती की **पंढरी** चे प्रदक्षणे चे वाटे वर **भीमातीरी** घाट वर्तुळ वृंदावन बांधणे ॥

( १४५ ) **वायी** मध्ये बहुत शिष्य-वर्ग होते त्र **खेड-पाडळीत**

बहुत प्रेमळ भक्त होते व **मोरेश्वरसुप्यां**त होते व **पैठणराक्षस-भुवन-शाहागड-पाथरी**स बहुत शिष्य होते व **बिडां**त शतावधि शिष्य होते **सुलतानजी निंबाळकर** याचा दिवाण **केशव बल्लाळ देवा** चे शिष्य होते त्यास आज्ञा केली होती की **नामल**गाव च्या देवळास आवार व घाट व **भृशंडी** चे देऊळ व **त्रिंबकेश्वरा** चे देऊळ व **मोरेश्वरी** वोवऱ्या करणे व **विज्ञानेश्वरा** चे देऊळ बांधणे व **त्रिंबक जिवाजी** चे घरी स्वात्मसुख ग्रंथ **देवा** पाशी एक माहा-पुरुष वाचीत होता तेव्हा एक भिकारी आले त्यास कोणी भिक्षा न घाली हे जाणोन आपण च त्यास भिक्षा घालोन सर्वांस बोलिले भूतदये सारखे साधन नाही उष्णकाळी वृक्षास उदक-पात्रे बांधित जेथे पक्षी मुंग्या असतील तेथे धान्य तांदूळ टाकीत जो रोगी असेल त्यास औषधें बरे करीत **कऱ्हाडी** दोन व **नामल**-गावी दोन चातुर्मास्यें सूक्तें केली ॥

( १४६ ) **शंभो** नाम चा ब्राह्मण बोलिला स्त्री माता पिता कोणी आपणास नाही मग त्यास अनुग्रह करोन घरी ठेविला तो कळहा मुळे रुसोन आला होता स्त्रीस नाहण आलिया वर संगे भावास घेऊन **काशी** हून शोधित **कऱ्हाडा**स आली **देवा**नी **शंभू-भट** दाविता च पोटरीस लांडग्या च्या डासा वरोन आपला पती **लक्ष्मी**ने वळखीला त्यास **गीता**-पारायणा ची **देवा**नी आज्ञा करोन घरी संरक्षण केलें ॥

**मंगळमूर्ती**स पुत्रा परीस पाळोन **राक्षसभुवनीं गोदा**तीरी स्थापिले ॥

( १४७ ) **कऱ्हाड--प्रांती** **देवा**नी राहवे ह्मणून **शाहू-छत्रपती** याणी **टेंभू** व **गोवारें** या दो गावीं दोन चावर जमिनी चीं **चिमणाजी दाणवे मचंद्र-सदाशिवगड** चे सुभेदार या बरोबर पाठविता च राजप्रतिग्रह नलगे ह्मणोन **देवा**नी टाकिता च **चिमणाजी-पंता**नी च खटपट करोन तेथील धान्य **देव**-घरी प्रविष्ट करविलें ॥

( १४८ ) **वारणे** चे कांठीं कुलकर्ण्याने मूळ **देवा**स अर्पिले

तो **जिवाजीपंत** प्रेमळ **देवा** चा शिष्य माहा-तपस्वी त्याचे पुस्तक **वारणेत** तीन दिवस बुडाले होते उपोपण करिता च पुस्तके व देव सापडले भिजली नाहीत ॥

( १४९ ) **कराड-प्रांतीं** शतावधि शिष्य होते व **सातारीयात नारोबा अनगळ** शिष्य होते त्यास **बल्लाळ-देव** व **रघुनाथ-देवा** बरोबर **कऱ्हाडी गणेश-तीर्थी** मध्यान्ह-स्नानास गेले होते तो काय लिबा येऱ्हड अंब्य. येवड्या गारा पडल्या तेंव्हा उदकात लपाले शिवास टाकिते वेळे धोत्रे घेऊन मुखे वरती काढात काहीसा पर्जन्य राहिल्या वर पुरा चे भयें घरास आले तेंव्हा मात्र काहीशी शरिरास व्यथा झाली दहा वर्षा पासोन त्रिकाळ सीत-स्नान करीत विद्यार्थी हि बहुत पढविले परंतु शरिरास काही वेथा झाली नव्हती ॥

( १५० ) एकदा **आका** सहवर्तमान **काशी**स पुन्हा जावे ऐसे योजिले तो प्रातकाली प्रातस्मरामि ह्मणताहेत तो काही जागृति-शुशुप्ती-मधे **देव** अमता एक श्वेतवस्त्र सर्वाळंकारयुक्त स्त्री बोलिली माझे नाव **भागीरथी** तुह्मी श्रमावे ऐसे नाही आह्मी तुमच्या भेटीस आलो अहो तुमचे गीतापाठा चे स्थळ **देवा** च्या उतर द्वारिं कौठि च्या झाडा खाली राहिलों आहों हे ऐकोन ते स्त्री अदृश्य होता च होमशाले च्या द्वारा बाहेर **रघुनाथ-देव** वेद ह्मणत होते त्यास **देवा**नी ज्याग्रत होऊन स्वप्नभास सागितला मग **देवा**नी स्नान करोन होम करोन ते बायको वाळवंटी च्या तळी आह्मी बिऱ्हाड घेतले आहे ह्मणोन बोलिली त्याचा शोध करू ह्मणोन **रघुनाथ-देवा**स बरोबर घेऊन तेथे आले तो तेथे कोणी नाही परतु कार्तिक-मासी माळभूमी वर गाई च्या खुरा प्रमाणे वर्तुळ वीतभर खोल ऐसे शुभ्र उदक **रघुनाथ देवा**नी पाहून बोलिले की आपण माहायात्रे चा उद्योग केला होता यास्तव **श्री-भागीरथी** श्रीस्वामी चे भेटीस येथे आली आहे मग पंचपात्रे करोन गंगाजल काहाडोन **देवा**स व **आकाबाई**स स्नान घातले मग **रत्नाकर-स्वामी**नी उभयेता **रघुनाथ-देव सकुबाई** व

**द्वारकाबाई बल्लाल-देव** व **कृष्णापा** व **मंगलमूर्ती** ऐसीं अनेक भक्तानी स्नानें करिता च देवळातील धरणेकरू व ग्रामातील सर्व लोक व अवांतर ग्रामी चे लोक व **बीड** शाहार चे लोक ग्रहण होते ह्मणोन आले होते त्यानी स्नाने केलिया वरी अस्तमान पर्यंत बहुत यात्रा आली त्यास हि वंदन मार्जन घडले मग **देव** बोलिले की या कलिकाला-मध्ये बहुत लौकिक कार्या चा नव्हे ह्मणोन परम समारंभे **श्री-गंगेस** पूज्या नैवेद्य समर्पोन उदका चा बारीक झरा होता त्या वरी स्वहास्ते स्थूल पाषाण स्थापोन न काहाडावा ह्मणोन शफत घातली चहूकडे चार पाषाण स्थापोन **श्री-गंगे** चे कुंड बांधिले तेथे अद्यापि पूजा होत आहे ॥

( १५१ ) एकदा **देव** आषाढी-एकादशीस साइंकाळीं **पंढरीस** पावले तो नाव गेली मग स्मरण करीत बैसले तो **पांडुरंगे बडव्या** चे रूपे आमचा येजमान उतरोन आणा नाही तर दिवाणात सांगोन पारपत्य करो ऐसे नावाडियास सांगता च त्यानी **देवास** उतरोन आणिले दुसरे दिनी **केशव बडव्यास** पुसिले तो ठावे नाही ह्मणाला ॥

( १५२ ) एगदा **मोरेश्वरास** जाते वेळेस **नीरे** मध्ये सांगडीस **देवा** बरोबर **नरोबा यादोबा** लागले होते नदी मध्ये सांगडी तुटली तो एके सांगड्या चे गळा मिठी घातली एके **देवा** चे गळा मिठी घातली तेव्हा चौघेही बुडो लागले **देवानी**

॥ माता पिता तू धन-धान्य-ठेवा ॥

हे एकवीस स्लोक आहेत त्याचे स्मरण करिता च सेरण्या चे बेट लागले तेव्हा गत्रा च्या वोझ्या सगट संरक्षण जाले

आलो तुझ्या गावा ॥

येरे सामोरा भेटाव्या ॥

हे पद तेव्हा केले ॥

( १५३ ) **गंगा**-प्रदक्षणेस जाते वेळेस **सप्त-गोदावर-क्षेत्री** काही दिवस होते वाणिया च्या दुकानी रात्री निद्रे चे वेळेस एक माहा-पुरुष त्या च पडवीस निद्रेस येत असता **गणेश-पुराणीं** व

**गणेश-माहात्म्यीं** ज्या कथा नाहीत त्या अश्रुत **गणेशा** च्या **कथा** सांगे मग दिवसा **देव** त्यावर कवित्वें बांधीत ॥

(१५४) **नांदेडास** आले तो मार्गी क्षुधे-तृषेने मूर्छित वस्त्रा वेगळा एक मद्यपी पडला होता त्याची दया येता च **देव** त्याचे वस्त्र सावरा-यास जाता च तो अंगास वरबडोन शिव्या देऊ लागला ते सोसून त्याचा अंगा-तळि चे खडे झाडोन छायेस बैसवोन अन्न-पाणी चारिले॥

( १५५ ) **नाशिका** चे अलीकडे श्राद्धदिनी माध्यानी **वोस-गावास** आले साहित्य सर्व होते परंतु ब्राह्मण व अग्नी चे साहित्य नव्हते यास्तव चिंताग्रस्त होते तो एक ब्राह्मण येऊन बोलिला की उपनेत्र करोन अग्नी पाडितो भोजन घाला ह्मणता च श्राद्ध केलें ॥

( १५६ ) **कृष्णा** प्रदक्षिणा **मल्कार्जून** पर्यंत केली ॥

( १५७ ) **कऱ्हाड** क्षेत्री ग्रामांतील विद्यार्थी मध्यं अन्हि **स्नान** करोन येते वेळे क्षुधातुर जाणोन तक्रपीठ सर्वास देत असेत ॥

( १५८ ) **अवरंगशहा** दक्षणेस आला तेंव्हा **प्रभावळीस** रानात लोक पळोन राहिले होते तेथे रात्री शेणा च्या गणेशा चे हाती काठी देऊन लोका भोवती फिरोन लोका करवी नामगजर करविता च पर्वत गर्जे व व्याघ्र तस्कर पळेत् ॥

( १५९ ) **नामल**-गावी **वडवणीकर माहादभट** संतर्पण करा-यास आले होते तो पर्जन्न-वृष्टी होऊं लागली मग **देवास** विनंति केली तो **देवानी** येऊन ब्राह्मणा च्या पंगती बैसल्या होत्या त्यास सागितले **की** **शूर्पकर्ण** नामा चा गजर केलीयाने चौफेर प्राकारात प्रजन्न पडणार नाही मग गर्जना करिता च तैसे च जाहाले प्राकारा बाहेर गुडग्या इतके पाणी वाहात होते परंतु आत प्रजन्न पडला नाही ॥

( १६० ) प्रदक्षणे ची वाट आगे झाडिता वेळेस कोणी रुपया अथवा अर्द पुढे ठेविला तरी मातीत पुरोन वर पाशाणा चे चिन्ह करून **वजाई गुर्विणीस** सांगावे की अमके स्थली **प्रसाद**

ठेविला आहे तो घेणे या प्रकारे वस्त्र धान्ये करून तीचे संरक्षण बहुत केले ॥ वतनदारी चे सेत करायास बैल नाहीत ह्मणोन दीवाण च्या उपद्रवामुळें श्रमी होती तो **चिटगोप्या** चा दिवाण **सदाशीव-पंत** व **रघुनाथ-देवा** चा शिष्य होता त्याने **देवास** गाडी पाठविली होती ते बैल **बजाईस** दिल्हे ॥

( १६१ ) आठरा भुजां चा गणपती **वराडांत आबास** आहे ह्मणून ऐकिले तेंव्हा जाते वेळेस ज्या मजलीस जात असत तेथील ग्रामाधिप सामोरा येऊन सर्व साहित्य करून पुढील मजली पर्यंत आपले माणूस व कागद देत असे की हे थोर आहेत यांचे सर्व साहित्य करून पुढे हि माणूस व या रीतीने कागद देऊन वाटे लावणे या प्रमाणे **धरणगाव चोपडें** व **प्रवाळ** व **आबास** क्षेत्रास गेले बरोबर ब्राह्मण पंचवीस व घाडी आठ होती **वराड खानदे**सात शिष्य-सांप्रदाय बहुत जाहला तिकडील पुराणप्रसिद्ध गणपती-क्षेत्रे सर्व पाहोन **आंवढ्या नागनाथा** वरोन **नामल**—गावास आले बरोबर वीस मोहरा घेतल्या होत्या त्याचा खर्च कोठ जाहाला नाही त्या प्रांती च सहस्त्र रुपये मिळाले त्याचा खर्च जाहाला मग यात्रा-संकल्पा च्या वीस मोहरा **मजरथकर** ब्राह्मणास घर बांधावेयासी दिल्हे ॥

कोठे प्रवासास गेले तरी सर्व सामोग्री व दीपाचे तेल देखील घोडयावरी वागवावे रानात भोजन करोन अस्तमान जाहलीयावर ग्रामात जावे कोणास काडीमात्र उपद्रव देणे नाही ज्या प्रांतात जात असत त्या प्रांती **देव** आले आहेत ह्मणोन वार्ता उठे लोक बातमी राखोन पाव कोस जवळ येता च वाद्य-घोश-पुर:सर गावात आणीत या उपद्रवा मुळे अंधकारीं गावात प्रवेश करीत व पाहाटे न पुसता च जात असेत ॥

वस्त्रे पात्रे अळंकार द्रव्य जे जवळ असेल ते जो मागावयासी येईल ते त्यासी द्यावे पदोपदी जे जे पदार्थ दिल्हे आहेत ते ल्याहावयासी सामर्थ्य नाही कोठे हि तिळमात्र ममता व अहंता हे नसे ॥

आर्जव गुरु-सिसरूषा ही ज्ञानादि बारा लक्षणे देवा चा ठायी पूर्ण होती हे लटके मी बोलेन तरी मज माझ्या कुलस्वामी ची व माता-पित्रा ची आण असे सत्य आहे ॥

गणपती-नामा चा पुरूष कोणी भेटला तरी देहेभाव विसरोन सदगदित-कंठ त्याचे पाया वरी मस्तक ठेवीत असेत भूतदया बहुत असे व जना ची मने दुखवणे नाही व अज्ञानी जनास बोध करायाचें सामर्थ्य अपूर्व असे ॥

कोणी दुष्ट अभक्त टवाळ असला तरी कथा श्रवणे करिता अष्टभाव होऊन देहेभावीं विरक्त होय ॥

( १६२ ) एकदा देव चिंचोलीस गेले होते मार्गीं सदाशिवपंत चिटगोपेकर संप्रदाई होते त्यानी कुडक्या चा तुकडा अर्पिला तो तेथे अरण्यांत अंब्याचे मूली पुरून ठेविला नामल-गावास येता च धोंडो मईराल याच्या लग्न-साहित्यास देवविला ॥

( १६३ ) एकदा गुंज च्या रानात विसाजीपंत सहस्त्रबुध्ये यानी पवित्रें साहा तोले' ची देवास समर्पिली होती ती बालकृष्ण नागापूरकर याचे लग्न-सिद्धीस अरण्यात स्थापिली होती ती देवविली ॥

( १६४ ) एकदा नारोबा नायीक अनगळ यानी गणेशखिंडी जवळ देवा ची भेट होता च हिर्कणी ची अंगठी समर्पिली पर्वतात ठेविली होती ते धोंड जोशी कऱ्हाडकर याच्या लग्नास दिली ॥

( १६५ ) एका शूद्रे पेडगावी मोळी विकोन दोन पैसे करीं घेऊन रुदन करितां देवे पुसतां च बोलिला की सारे दिवसा चे श्रमा चे दोन पैसे आले यात कुटुंबा चे अवांतर साहित्य कैसे घडेल. तेव्हा त्याच्या स्त्री पाशी देवानी पाच रुपये देऊन सागितले की कार्यास घेऊन अवांतर साहित्य तू कर व धान्या चे साहित्य भ्रतार करील ॥

( १६६ ) **नामल**-गावी दुग्धपाने तपस्वी होता अग्नी वर दूध ठेऊन सौरक्षणार्थ तेथे **देव** होते तो स्नानास गेला तो छलकबुधीने वीस जटिल दुग्ध द्वारीं आण ह्मणोन मागो लागले त्यास **देवानी** एका एकास एक एक पंचपात्र भरोन दिल्हे सर्वास पुरोन ब्राह्मणास हि दुग्ध उरले ग्रामात तो वस्ती नव्हती हे पाहोन गोसावीया चा महंत परम विस्मयें संतुस्ट होऊन गेला ॥

( १६७ ) **कादरबावा** ची भेटी जाली तेव्हा शत मनुष्य होतें **कादरानीं** पुसिले की सुई चा छिद्रा येवढ्या आडा मधे स्नान कैसे करावे मग लोकानी नाना पर्याय सांगितले परंतु त्याचे समाधान न जाले **देव** बोलिले की सुई च्या छिद्रा परीस लहान व्हावे ह्मणजे स्नान घडेल हे ऐकोन समाधान होतां च हसोन **कादर** व **देव** एकांती जाऊन अनुभव-सुख आठऊ लागले ॥

( १६८ ) **राणंज-क्षेत्री केशव बावा ज्ञानेश्वरी** चे उपासक होते त्यानी सर्व संता चे प्रसादवस्त्र लघु तुकडे ची मेखला पांघरोन अखंड ज्ञानेश्वरी--पारायण करित व कोठे जाणे जाले तरी चिठी लिहून टाकावी चिठी चे आज्ञेप्रमाणें वर्तावे एकदा गाईस उदकास विलंब जाहाला ह्मणोन स्त्रीस रागास आले तेव्हां स्त्री रुदन करू लागली की याचे संगे विषयसुख ही जन्मी न जाले व्यर्थ क्रोध मात्र करितात ऐसे ऐकोन स्त्रिये चे अंतरी आत्मा आहे तो या वाचेंने कष्टी केला तरी अत:पर कोणासी बोलणेच नाही ह्मणोन मौनव्रत धरिले त्याचे भेटीस प्रतिवर्सीं **देव केशव-बावा** चे भेटीस जात असत एके वर्षी भेटीस गेले तो ते ग्रामांतरास गेले होते यास्तव तेथोन **देव कर्मले**कडे गेले हे वर्तमान **केशव-बावा** घरी आल्यावरी शोध लावोन **कर्मले**कडे आले **केशव-बावा** चे वृत्त ऐसे असे की वृक्ष पक्षी स्त्री-पुरुष पशु मार्गी जो भेटेल त्यास सव्य घ्यावे यास्तव ग्रामास सव्य घेवोन उत्तरेकडील वेसी चे मार्गावरी येता च उत्तरेकडून षोडश वार्षिकी स्त्री मस्तकी इंधन शुभा वेचोन येत होती यांचे भयानक

स्वरूप पाहोन छाया न पडता मार्ग सोडावा ह्मणोन डावेकडे पश्चिमे-कडून चालिली तो याचा अभिप्राय सर्व ग्राम सव्य घेतला परंतु हा प्राणी सव्य घ्यावा ह्मणोन चालिले तो ते स्त्री भयंकर हा कोण पुरुष आंगावर येतो ह्मणोन पाटी टाकोन पळू लागली केशव-बावानी पाटी घेवोन सव्य घ्यावे ह्मणोन ते पुढे पळता आपण मागे पाठी लागले ते स्त्री गृहास येता च भ्रतार श्वसूर पुसो लागले धर्म धाप का आली आहे तो तिणे सांगितले की एक फकीर उन्मत्त पाठी लागला यास्तव पाटी टाकोन पळाले इतकें बोलतां च केशव—बावा हि तेथे आले हस्त करोन सव्य सव्य घेऊ द्या ह्मणोन सवज्ञा करू लागले परंतु ते स्त्री घरात पळोन काव्या पाषाण घेवोन पूजा करावी तो पूर्व दिवसी त्या गावी देव आले होते ते स्नानार्थ जात होते त्यानी हे मूर्ती पाहोन धावोन चरणी सा॥ प्रणिपात केला संगें दाहा—वीस लोक होते त्यानी हि नमन केले हे पाहोन ते शूद्र चकित राहिले पुसो लागले की सत्पुरुपास ऐसी वासना का जाली तेंव्हा देव बोलिले की हे मौनवृती आहेत यांचा नेम सर्वास सव्य घ्यावे यास्तव आले असतील मग त्या स्त्रीस आणोन सव्य घालोन देवानी शाबासकी दिली तू धन्य अससी पळालीस ह्मणोन स्वामी च्या दर्शना चा लाभ आह्मास जाला नाही तर आजी हाणि जाली होती मग उत्तम वस्त्र एक दिल्हे तेथे उभयता सत्त रात्र होते ॥

( १६९ ) एकदा नामल—गावी मोळीभर केरसुण्या मांगीण घेऊन हिंडली परंतु शूद्रास केरसुण्या करता येतात कोणी घेतल्या नाहीत कष्टी होऊन परतोन चालली पाहोन देवास करुणा आली पुसो लागले केरसुण्या कोणी नाही घेतल्या याचे काय घेसी ती बोलिली की दोन पायल्या धान्य द्यावे तितुके देवाने देता च वर ची सर्व पुसो लागली की इतुक्या संमार्जन्या कशास पाहिजेत देव बोलिले प्राणी कष्टी जाहाला याणे कोटुंबास काय न्यावे मग दुसरे दिवसी बीडांत अग्निहोत्री होते त्यांचे घरीं दोन शाळे चे सेवेसी एक एक पाळेने दिल्ही ॥

( १७० ) एकदा **टेंभू** मधे गाई व ह्मैसी पन्नास **रत्नाकर-स्वामी**नी ठेविल्या होत्या त्या **उदाजी चव्हाणा**ने गाव ची गुरे वळोन नेली त्या बरोबर गेल्या तेथे गावकर जाऊन **देवा** ची गुरे ह्मणोन बोलिले परंतु तो ऐकेना इकडे हे वर्तमान **देवास** कळता च **देवा**नी रागे भरून गाई वछा ची भेट करणे ह्मणोन चौघे सिष्य पाठवून अवघी वासरे त्यास नेऊन समर्पिली तेव्हा चव्हाणास कळले की **देवा** वाचून हे दुसरे चें धारिस्ट नव्हे ऐसे समजोन गाई **रत्नाकर-स्वामीस** अर्पोन **टेंभू** चे मोकासबाबे चे पत्र आपले तर्फेन करून दिल्हे ॥

( १७१ ) एकदा **श्रीपत-राया** ची **पुसेसावळी**हून स्वारी **कोपर्ड्यावर** गेली तेथे **रत्नाकर-स्वामी** ची गुरे शंभर होती ती गाव च्या गुरा बरोबर नेली ही **देवा** ची गुरे ऐसे कोणी **श्रीपतराया** पासी बोभाट नेला ते बोलिले की उपाधीस्तव इतकी **देव** गुरे बाळगणार नाही मग **रत्नाकर-स्वामी**नी आपले हास्त-पत्र धाडिले ते वळखोन रायानी गुरे **कराडी देवा** ची असली तर **देव** घेतील ह्मणून पाठविली हे **देवास** कलतां च इतकी उपाध किमर्थ वाढविली आहे ह्मणोन गाई ह्मैसी गृहाप्रत क्षेत्री ठेविली ॥

( १७२ ) **देवा** च्या चित्ती आणिक हि काही दिवस सन्यास-ग्रहण करून मग परमहंस-दीक्षा संपादावी ऐसा बेत होता तो एके दिवसी **आकाबाई** व **मुक्ताबाई** व **सुक्ताबाई** व अनेक भक्ता ची मंडली आहे तो **देव** काही कार्या च्या उद्योगामुळे तेथून गमन करावया साठी उठोन उभे ठाकले ॥

+ + + सातवा गणपती **टेंभू** चे अरण्यांत आठवा **पणदुरे** येथे होता तो **विशालगडास** नेला व **टकले-बोरगावी** शमीगर्भी स्थापिला दाहवा **बिडांत विठलभट** याचे घरी धातुमूर्ती स्थापिला अकरावा **नामल**-ग्रामी **देवा** चे आग्नेय कोणी मानीसीक पूजे च्रे स्थली स्थापिला-बारावा अवतार समाप्त जालियावरी चितेमधे निघाला ऐसे श्रीगजानना

चे बारा अवतारा चे बारा गणपती असावे ह्या हेता स्तव बारा गणपती स्थापिले ॥

( १७२ ) **देवा** ची नित्य-क्रिया या प्रमाणेः-पंच पंच उषः-काली उठोन स्थूळ पात्री उदक घेऊन मृत्तिका-युक्त नैरित्य दिशेस जाऊन भूमी वरी तृण आछादोन देहधर्म जालिया वरी उदन्मुख लिंगींद्रियास एक वेळ मृत्तिका गुदेंद्रियासि पांच वार तेथोन जलाशय द्वादश हस्त टाकोन वाम हस्तास दश वार उभय हस्तास सप्त वार नख-शोधन पात्र-शोधन उभय पदास एक वार मृत्तिका लावोन बारा गंडूश टाकोन क्षीर- कंटक-वर्ज पवित्र तरू चे द्वादश अंगुल करंगुळी प्रमाणे वनस्पती ची प्रार्थना करोन आर्द्र पत्र अथवा कृष्ण मृतिकेने दंतधावन करोन पूर्वमुख वामभागी गंडूस टाकावे शौचकाली सूर्य चंद्र न पाहावे यज्ञोपवीत कर्णी स्थापावे शौचस्थान अस्ट हस्त लांब हस्तद्वय रुंद दशायुक्त श्वेत धोत्र पंचकक्षयुक्त बारा-नेऱ्यायुक्त धोत्र नेसोन उपवस्त्र कटा खालते नेसावे स्वहस्तकृत अतृटित एका तडीचे भोजना पूर्वी त्रिगुणीकृत नाभी खालते अथवा वरते नसावे नाभिप्रमाण तीन यज्ञोपवीतें कार्पासा चीं अथवा ताग-गोकेश-जवसा-वृक्षा च्या त्वचे ची असावीं गायत्री अथर्वेदसूक्ते करून करावी ब्रह्म-अथवा रुद्र-ग्रंथीयुक्त मग द्वादश तिलक लावणे त्रिपुंड्-युक्त तुळसीमृत्तिकामिश्रित भस्मधूळी नंतर द्वादश भस्मा चे त्रिपुंड् लावावे अथवा नाभिमात्र उदकी आर्द्रवस्त्रयुक्त उदका चे लावणे संध्या करावी अथवा तीरी शुष्कवस्त्रयुक्त शिखाग्रंथीयुक्त शट्कुश धरून आचमना-नंतर भूशुध भूतशुध प्राणप्रतिष्ठा मोका बाहीर मातृका नंतर संध्ये चे सप्त न्यास करोन संधे चे त्रिकाळावधाना नंतर प्राणायाम मार्जन-प्रक्षेपण-अघमर्पण करोन अर्घें अश्त्रोपसंव्हार सूर्योपस्थान गाइत्री युपस्थान गाइत्री-न्यास ध्यान चुतुर्वींआंसीती मुद्रा शापत्रय-विमोचन उत्कीलन ज्यात-मृतक-निवारण करोन मानसीक पूजा गाइत्री सूर्या ची करोन अष्टोत्तरशत अथवा चोपन्न अठावीस आधांतरी जप करावा उत्तर

षट्क करोन सप्त मुद्रा करोन संध्या विसर्जोन गोत्र प्रवरोच्चार आचार्यास नमोन संध्या-समर्पण करावे मग सूर्योदया पूर्वी अर्ध घटिका अग्निहोत्रा चे होम देऊन रंगवल्ली अनेक दीप वाद्ये पुष्पफलादि-युक्त श्रीगजानना ची पूजा ध्यान आवाहन आसन पाद्य पंचामृत सिधोदक-स्नान वस्त्र यज्ञोपवीत गंध अक्षता पुष्पे धूप दीप अनेक पक्वान्ने नैवेद्य नाना फळे पूजा जप भोजनकाली मौन धरावे मुख-प्रक्षालन जाले वरी सपवित्र श्रौताचमन करून पूर्वाग्र अथवा उच्चा-आग्र कुश मृगाजिन व्याघ्राजिन श्वेत-कमलासनी पूर्वे-मुख उत्तरे मुख बसोन गुरुमूर्ती ध्यावोन मानसिका पूजे नंतर अन्या संकल्प केलिया वरी प्रातःस्मरामि होता च तीर्थी सीतोदकें प्रवाहाभिमुख मंत्र स्नान करोन अघमर्षण-मार्जन-अर्घ्य जलतर्पणा नंतर शरिरा वरील रोमा पासोन स्नान काली सप्तकोटी तीर्थे श्रवता आहेत यास्तव अंग पुसो नये तीरी गंडूश तीन टाकोन आचमने करोन तांबूल दक्षणा राजोपचार शमीपत्र मंदारपुष्प दूर्वांकुरी निरंजन-दीप घोवाळोन पंच आरतीया ह्मणोन एकवीस नमस्कार प्रदक्षणा घालोन अवर्ण देवता पुजोन प्रसाद शेश घेवोन घटिका दिवसा नंतर भिक्षेस जावे ब्राह्मणगृही एक वैरण मात्र ध्यावी अधिक कोणी घातले तरी चार दिवस तेथे न जावे गीता-पठण करोन ब्राह्मणचरण-नमन करोन मोरेश्वरायनमः या प्रमाणे कीर्तन करोन स्मरण करोन भिक्षा अधीक मिळाली तरी कोणा दुर्बळास द्यावी योगक्षेमा पुरते मात्र घरास आणावे प्रहर दिवसा नंतर मुलांस वेदाध्यान सांगते वेले नेत्री अश्रुपात येत असत बारा घटिका दिवसा पुष्प दर्भ गोमय मृत्तिका भस्म स्नाना चे साहित्य तीळ घेवोन गंगेस माध्या-न्हिक पूर्व प्रकारे स्नान करोन सौर-सूर्य उपस्थान ह्मणोन काही बृहदारण्यवेद ह्मणोन देव-रुषी-मनुष्य-पित्र-तर्पण ब्रह्मयज्ञ करोन चतुरावृत्ती गणपती-तर्पणा नंतर सहस्र-नामपठणे ग्रहास येऊन सक्रतावर्तन अभिशेक पूर्ववत् पूजना नंतर अतिथि पूजोन पंचमहायज्ञ करोन गाय-तुलसीस

अन्नपुष्पे पूजोन स्वहस्ते पवित्र धान्या चा मसूर आंबाडा करडी वेगले करोन सेफू वांगे सेवगा चवली तांदुलजा गाजर मुळा पांढरा भोपळा पाथरी तोंडली पारोसें या वीतरीक्त मेथी पडवळ कारली दोडका कासी-फळ घोळ इत्यादि पवित्र शाखा एके पात्री च सर्वान्न दक्षणहस्त पक्क करोन प्रथक प्रथक काढोन ब्राह्मणास वाढावे आपण मात्र सर्वान्न लवण-घृतवर्ज एकत्र करोन मधुपर्कास कर्दली जंबू औदंबर प्लक्षादि पीवित्र पत्रे पवित्र पात्र घेऊन नैमित्यक दिनी ब्राह्मण-भोजना नंतर नित्य दिनी पंचग्रासा नंतर अंगोली च्या प्रथक् विनियोगे प्राणभूत मुक्तभूमीवर एकदर्भासनी मुक्तशिखा दक्षणे उदकपात्र उदकस्पर्श करोन शिळे करपले उच्चिष्ट वर्ज वळवट पापड सांडगे वर्ज उष्ण तिखट खारट आंबट वर्ज न भक्षावे दिवसा दोनदा भोजन वर्ज्य मौन ग्रासोग्रासी जानु आंत हस्ते पंचागुलिने भोजनी कढि दुग्ध दधि तक्र पिता चा फुत्कार वाजूं नये आपण भांक्षलें अन्न भक्षू नये प्राशिलें उदक पिऊं नये दो हस्तें धरोन तोंडास लावोन जळ श्वान मार्जार शूद्रादिकास उच्चिष्ट देऊ नये भिन्नपत्री ताम्र कांस्य लोह वट अश्वत्य अर्कादि निशिद्ध पत्रा भोजन करूं नये अन्नात केश कीटक निघाला तर तावन्मात्र अन्न टाकोन हस्त प्रक्षालोन उदक स्पर्शोन भोजन करिते वेले दीप गेला तर उदपात्रावर हात ठेऊन आणिक दीप लावी तो पर्यंत सूर्या चे ध्यान करावें उदकी अपवित्र चार स्त्री पुरुष परज्ञानी विधवा कृत पाखगणान वर्ज विप्र सन्यासी अन्नार्थे आला तर वैश्वदेवार्थ प्रथक वोदन काढोन अन्न द्यावे मग वैश्वदेव नैवेद्य करोन भोजन करावे परान्न श्राद्धसंस्कारान्न वर्ज करावे मापप्रमाण उत्तराशा अपोशन घेऊन अनुच्चिष्ट उदके तीन गंडूस टाकून सूक्ष्म उपाये दंत शोधून आंचवल्यावर आचमन-प्राणायाम-युक्त तीर्थ घेऊन पवित्र तरू चे पत्राने मुख शुद्ध करीत असेत दधि-गुढ-मिश्रित तेल-तक्रमिश्रित मधु-घृत समान भक्षू नये प्रत्यक्ष लवण वर्ज माता-पितर-गुरु-द्रोही नास्तीक अभक्त द्वेषी जार

स्तेनकर्मी याचे गृही भोजन करू नये ज्या गृही स्त्रिया कलह करतील भर्त्तार-अवज्ञा बालवध कूष्मांड विष भूत-प्रेतादि प्रयोग करतील ते गृही भोजन करू नये परपात्र-परशय्या-परवस्त्र-परद्रव्य-परस्त्री ग्रहण करू नये परग्रही परान्न परधन जप-होमादि अनुष्ठान केले तर ज्याचे ग्रह अन्न धन त्यास पुण्य जाते भोजनोत्तर ब्राह्मण-श्रवणी प्रश्न करावे हसत बोलूं नये पवित्रासनी बैसावे अन्नार्थी जे येतील त्यांस सामर्थ्यानुसारखे सत्वर अन्न द्यावे विलंब लाविलीया आपले चरणास काही रोग होतो मुंग्या पक्षास धान्य उदक स्थापावे नागवल्ली वाचून सुपारी भक्षू नये सगळी सुपारी भक्षू नये पर्ण-पृष्टीस चूर्ण लावू नये अंगुष्टे लावू नये तर्जनीने लावावे रात्री खदीर भक्षू नये अग्र देठ-सिखा चूर्ण पत्र टाकावे नासिले पत्र फूल देव-ब्राह्मणास न द्यावे ॥ वस्त्रे अयाचित वृत्ताने मिळाली तरी ज्यास वस्त्र नाही त्यास द्यावे धान्य जे मिळेल ते दिवसी कोटुंबा पुरते ठेवावे वरकड अनाथास द्यावे द्रव्य अयाचित वृत्तीने मिळेल ते **कऱ्हाडकर अंतोबा नाईक सवासिया**-पासी ठेऊन अनाथा च्या लग्न-यात्रा-ग्रह-वृतबंध-कर्ज-धर्म-कार्यास विनियोग करावा ग्रामदेवतास नमोन बहिरजले सायं-संध्या सूर्य-साक्ष ने करोन सायं-होम सवछ धेनु व गर्भवती धेनू चे दुग्धे करावे मग पूर्ववत् पंचोपच्यारे पूज्या करोन चंपक ज्याति मोगरा बकुल लोचन पारिज्यात दुपार मालती धत्तूर मल्लिका कमल सेवंती केतक गुलाब बिल्व अक्षत विष्णूस गंध चक्रांकितास तुलसी गणेशास केतक सिवास वाहू नये चंदन रक्तचंदन कृष्णागर केशर कस्तर कर्पूर गव्हले कचोरे या अष्टगंधे पूजावे शमी मंदार दूर्वांकुर समर्पोन आरती चे वेळे अन्य वेव्हार सोडून देवा चे मुखकमल पाहोन अनन्य-भावे **जयधुंडीराजा** या पांच आरत्या ह्मणोन मंत्रपुष्प प्रदक्षणा नमस्कार **विश्वाद्रि-बीज-स्तोत्र माता गणेश-कवच दुर्गपंजर-स्तवराज सहस्रनाम गीतादि**-स्तोत्रें पढोन

नमामि अर्च्याय

हे परंपरा-मंगळ आचरोन स्मरोन नित्यनेमी निर्विकल्प अष्टभाव कंप रोमांच श्वेद बाष्प ध्यान विदेहता सदगदता याही निसी युक्त टाळ्या वाद्य नृत्ये देवा चे नाम-गुण-कीर्तन करिता नास्तिक-पाशांडी-अभक्तास हि अष्टभाव होऊन निद्रा येत नसे कीर्तनी ताबूल घेऊ नये निद्रा केली तरी अजगर होय संवसार गोष्टी सांगेल तरी मेंढा होय अनाद करील तरी वृक होय श्वळण करील तरी मुका होय निष्कपट प्रश्न करावे **देवा** चे कथेत ब्रह्मराक्षस पिशाच्य बहुतां चे समंध गेले कीर्तनी भाविक जनास प्रणवरचना सांगावी

॥ गणेशा चे ध्यान हे चि माझें ज्ञान ॥

हें पद ह्मणता च कोणी प्रश्न केला की ध्यानांत काय आहे त्यास उत्तर ऐसे जे

यद्रोम—विवरेषु ॥ या श्लोकावरी ॥ रोमरंध्री स्थित ब्रह्मांड-कोटी ॥ ऐसे ह्मणता कोणी आशंका घेतली की सर्व जन मळीचा गणेश उंदरा वरी पार्वतीने गजमुख बैसवीला येथे उत्तर ऐसे जे एका पदार्थास दुसरें च म्हणतात देवास सव्य द्यावे म्हणतात परंतु चरण-प्रक्षालनी श्रुती चा अर्थ व

॥ वामं शरीरं सव्यं स्यादपसव्यं तु दक्षिणे ॥

हे कोश व

॥ द्वौ दर्भौ दक्षिणे हस्ते सव्ये त्रीणि तथासने ॥

एवं सव्य डावे अपसव्य दक्षिण भाग असोन विपरीत वाक्य जनात आहे तैसे

आकाश जया ची सीलाखा ।
समुद्रपाळ पींड—रेखा ।

**हे ज्ञानेश्वर** श्रुती वरी बोलिले आहेत जनात विपरीत वाक्य हे तसे ह्मणतात की गणेश मुळी चा ह्मणावा तो उकार विसरोन मळी चा

ह्मणतात परंतु मुळारंभी यासी पूजितात या प्रमाणा वरोन ' अधरे लिंग नाभौ ' हे कारिका आगमी पट्चक्री साहा देवता अधरी सर्वा गोष्टीने थोर पदार्थ जो असतो तो स्थापात्रा लागतो पायासी व उतरंडीस रांझणासारिखा पट्चक्रास अधरीभूत गणेश आपण राहोन लिंगिस्थाधिष्ठोनी ब्रह्मा नामी जाणी पुरी विष्णु हृदयी अनाहति सिव कंटी विशुध्य चक्री जीवेश भ्रूमध्ये अग्नीचक्री परमात्मा शिखास्थानी सहस्रदळी गुरुपादुका एवं गणपती अधरचक्री पार्वती दक्ष ब्रह्माचे पिंडी आहे ह्मणता तरी गजाचे मुख का यासी उत्तर पदार्थ असतो एक दिसतो एक स्थाणू पुरुषाकृती रज्जू सर्पाकृती दिसतो तैसा गणपती गजमुखाकार दिसतो येथे आशंका रज्जू होता व स्थाणू होता ह्मणोन सर्प-पुरुषा चा भास झाला तैसे गणपती कैसा होता का गजमुखा-कार भासला यासी उत्तर प्रवण उमजाया दाखविला हस्ती ह्मणोन भाविती पशू आत्मा ये पथी श्रुती त्रिकांड वेद नाभीपर्यंत कर्मकांड कंठपर्यंत उपासना-काड मस्तक ज्ञानकांड तेथे सिखास्थानीं उप-निषद्भाग ऐसा जे निर्गुण निरहंकार निर्विकल्प निराकृती तेथोन ॐ ऐसा ध्वनी जाला तो अकार उकार मकार त्रिगुण-देवात्मक प्रणव गजमुखाकार दिसो लागला गर्भाधास चंद्र कळे ना ह्मणून पापड दाखविला तैसा अज्ञानास हस्ती उपमा दिली

गजवत् आननं यस्यासौ गजाननः ॥

ॐकार वाच्य वोंकार वोजस्थानो श्री धीपती हे व्यास-वाक्य

॥ ॐमित्येकाक्षरं ब्रह्म ॥

हे भगवद्गीता

॥ जेतुं यस्त्रिपुरं हरेण ॥

हे पुराण वाक्य ब्रह्मयाने गणपती प्रसन्न करोन चार खाणी चौऱ्या-यशी लक्ष योनी केल्या त्या पूर्वी हस्ती नव्हता ॥

देव कोकणात जात तेथे शमीचा महिमा वर्णिता च ते पुसत शमी कैशा आहेत त्याच्या समजाविसीस ईवरा चा दृष्टांत द्यावा लागे तैसा

प्रणव कळायासी हस्ती चा दृष्टांत येथे सामान्य जना ची समजाविसी होईल परंतु पंडिता ची आशंका

॥ गजवदनमचिंत्य० ॥

हे व्यासोक्त ध्यान

॥ अमरा मरणमिछंति ॥

येथे नवाक्षरी मृत्यमिछंति म्हणायासी कोण समर्थ आहे हे सत्य परंतु कोणी एक ग्रहस्तास पुसतो की भोजन केले पंक्तीस कोण होते तो बोलिला भोजन केले मस्करी म्हणता च क्रोध आला मग तो गृहस्त बोलिला की मस्करी म्हणजे सन्यासी पंक्तीस होता तुम्हास क्रोध का आला ऐसे वाक्या चा व्यासा चा अभिप्राय तुमचे चित्ती आला नाही तैसे गज-संज्ञा व्यासाने बहुतास केली आहे तिश्रा आशंका अभ्यंग काळी गौरीन अभ्यंग द्रव्या चा गणेश करून संरक्षणार्थ द्वारी स्थापिला ह्मणून

॥ उमांग-मल जो गौरी ते जो भू स्वर्धुनी भवं ॥

ऐसे गणेशपुराणी आहे यास उतर असे जे स्तंभातु नरासिव्ह प्रगटला परंतु काष्ट काही तो नव्हे तैसे **सिंधूसुरा** पासून गणेशे सोडविले यास्तव गजावाचून संरक्षक बलिष्ट कोणी नाहीं यास्तव पूर्वी प्रणवानन जैसा पाहिला होता तैसा च भावे केशर-कस्तूरी चा करून आवाहन प्राणप्रतिष्टा पूजा करता च प्रगटला परतु मळी चा नव्हे मूळी चा आहे ते समई हे पद केले

॥ सुपारी चे ठायी गणेश पूजिला ॥

आशंका की गौरीने द्वारी प्रतिमा करून स्थापिला होता तो सिवास गृहात येऊ देईना ह्मणोन मस्तक छेदिले तेव्हा गौरीने शोक करिता च सिवे गजासुरा चे शिर लाविले यास्तव

॥ हस्तींद्रानन चंद्रचूड रुचिरं ० ॥

ऐसे ध्यान व्यासाने वर्णिले यास उतर ऐसे जे प्रणवा चे रूप दृश्यादृश्य अछेद्य अविनाश आहे हा निश्चय सर्वज्ञ सिवास कळ-

लाच होता परंतु **गजासुर** सिवभक्त होता त्याने वर मागितला की माझे मस्तक जगद्वंद्य कर तो मस्तक प्रणवामध्ये ऐक्य केला यानंतर **सिंदुरासुर** पार्वति-गर्भी वायुरूपे मस्तक न्यावयास आला तेंव्हा दश्यादश्य गात्रे करून **सिंदुरा** बरोबर देव जाऊन **नर्मदे**ने अनुष्टान केले होते ह्मणोन देव एक्या रूपे **नर्मदे**त राहिला देवा ची लीला विचित्र आहे यास्तव दुसऱ्या रूपे पार्वती-गर्भी प्रकटला दश्यादश्य गात्री **गजासुरा** चे मस्तक प्रणवात मिळविले देवा ची अनंत रूपे आनंत लीला आहेत जैसे विष्णू चे मस्तक उडाले त्याचा सूर्य जाला त्यास सर्व गात्रे आहेत **हयग्रीवा**सी सर्व गात्रे आहेत येथ विष्णू चे पूर्वस्वरूप जे आहे त्यास त्याचा काही नाश जाला नाही तैसे अकार-उकार-मकारात्न आवति ॐ त्रिगुण जे ब्रह्मा विष्णु महेश्वर जे याते आवति ह्मणजे रक्षि जो त्यास ॐ ऐसे ह्मणावे

॥ यदाज्ञया कः स्त्रिजतेथ विश्वं ॥
॥ यदाज्ञया पालयतेऽथ विष्णुं ॥
॥ यदाज्ञया संहरते हरोपि ॥
॥ यदाज्ञया संभ्रमते दिनेशः ॥ १ ॥

ऐसा जो देव ज्याच्या मुखांत च ब्रह्माविष्णुमहेश्वरां ची उत्पत्तिस्थितिलय आहे ॐकाररूपी भगवान् 'यो वेदादौ प्रतिष्ठितः' ऐशा देवास कोणा चें मुख लावावें अैसें नाही ॥ ॐकारवाच्य ॐकार ॐजस्त्वानोषधिपतिः॥ ॐइत्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ॥ परंतु भक्ता स्तव कल्पभेदे करून मछकूर्मवराह नाना रूपें धरिलीं परंतु मूळ जें निर्गुण रूप आहे त्यास विकार नाहि ॥ येथें प्राकृत जनानीं पूर्वपक्ष केला कीं आह्मास शास्त्र कळत नाही परंतु सर्व देवांस गजमुख तुह्मी ह्मणता तर सर्व देवां सारिखें गजानना चें मुख कां नाहि नाम हि वक्रतुंड नासिक लांबलें आहे ॥ यास उत्तर ऐसें जें स्कंदपुराणी विनायकमाहात्म्यीं ऐसें आहेः—

कार्यविध्वंसिनो ये च जीवास्ते वक्रसंज्ञकाः ।
वक्रां स्तुंडेन यो हंति वक्रतुंड स ईर्यते ॥

वक्र ह्मणजे विघ्न करणार जे त्यांस तुंडेन ह्मणजे शुंडादंडें करून हंति ह्मणजे मारी जो तो वक्रतुंड ह्मणावा ॥ कोण्हि एके समई ब्रह्यास गर्व जाला कीं पार्वती चें बाळ सर्वारंभीं पूजा घेतें श्रृष्टिकर्त्यासि आह्मांस कोण्ही पुसत नाहि ॥

लघु परवां चा बाळक गिरजे चा ॥

हें पद तेव्हां केलें ॥ मग विराटरूप देवें दाखविलें ॥

रोमरंध्रिं स्थिति ॥
ब्रह्मांड कोटि दूर्वाग्र दिव्य मुकुटिं ॥

हें पद तेव्हां केलें ॥ ऐसें रूप पाहोनि ब्रह्या चा गर्व हरला परंतु कोणा एका भक्ता चा हेत जाला की दूर्वापुष्पें वाहावी हें जाणोन दीर्घस्वरूप ह्मणोन देवानें नासिकें प्रेमसुखें भक्ता चे हस्तातील पुष्प घेतलें हस्ताने ध्यावे तर विलंब होईल ॥

भलते याती चें सुमन । पारि हो कां भक्ता चे चि जाण ।
मुळीं पाहातां मी निर्गुण । तो दीर्घ घ्राण करूनि सेवी ॥ १ ॥

हे वोवि तेव्हां केली ॥

कोण्ही प्रश्न केला कीं देवास शूर्पकर्ण कां ह्मणतात त्यास उत्तर कीं साधनीं श्रवण थोर आहेत

शूर्पवत्त्यजंते दोषान् गुणान्गृण्हति साधवः ।
दोषग्राही गुणत्यागी चालनीवच्च दुर्जनः ॥ १ ॥

शूर्पे दोषा चा त्याग गुणा चें ग्रहण होतें ऐसें च श्रवणें करून दोष-त्याग गुणग्रहण करावे ह्मणोन भक्तास देवें शूर्पकर्णसंज्ञा केली ॥

श्रवणतालिका द्वंद्व हालवी ।
निजजनासि तो कोण पालवी ।

श्रवणद्वारें माझ्या स्वरूपीं सत्वर याल ह्मणोन भक्तास देव श्रवणें पाल-वितो । मनोभ्रमरास श्रवणे विषयमधा पासोन उडवोन खं-ब्रह्मीं

संचार करवणे ह्मणौन देव संवज्ञा करितो। सर्व साधना चें मूळ श्रवणीं प्रशस्तता असावी ह्मणोन लंबकर्ण संवज्ञा देवें केली।

कोणी प्रश्न केला की देव पूर्वीं द्विरदानन नामें दोन-दंत असतां मग एकदंत कां जाहाला। यास उत्तर ऐसें जें प्रकृति-पुरुषात्मक द्वैतरूप विश्व भासतें परंतु अद्वैत एक चि आहे यास्तव पूर्वीं द्विरद दाखवोन एकत्व भक्तास सुचविलें। **गणेशखंडीं** कथा ऐसी आहे की **गणेशा** पासोन **फरशरामानें** फरश मागितला होता त्या फरशानें एकवीस वेळा क्षत्रिय मारिले या दोषा चा परिहार शिवास पुसायास गेला तों शिवपार्वती एकांतीं होतीं तेथें गण जाऊं नका ह्मणाले त्यास धिःकारोन पुढें गेला तों द्वारमस्तकीं पार्वतीनें गणेश स्थापोन पूजिला होता त्यानें वर्जिले तेव्हां फरशराम व गणेश दोघां चे तुंबल युध्य जाहले गणेशें फरशरामास पाश घालोन सप्तसमुद्रीं सप्त-पातालीं सप्तस्वर्गी फिरऊन परम दुःखित आकर्षण करोन जवल आणि-ला तेव्हां फरशरामें क्रोधानें फरश गणेशा वरी टाकिला तो फरश काय आज्ञा आहे ह्मणोन गणेशास विनवो लागला देवें मनीं वि-चारिलें कीं देवांतक दैत्यास शस्त्रास्त्रें मृत्य नाही ऐसा वर आहे त्यास दंतें करोन मारणें योग्य आहे। आपलें फरश फरशरामास दिले तें वेर्थ जालें तर आपणास च लघुत्व आहे यास्तव गणेशें फरशास आज्ञा केली की दंता वर एऊन पडणे आज्ञे वरून तो पडतां च देव एक-दंत जाहाला जो मोडला वाम दंत तो हस्तीं आयुध धरिला तेणे करून पुढें देवांतक दैत्य मारिला यास्तव एकदंत॥

कोणी प्रश्न केला कीं लंबोदर का यासी उत्तर ऐसे जे श्रीष्ट-कालीं गणेशें ब्रह्मविष्णुमहेश हे तिघे पुत्र उत्पन्न केले त्यासी श्रृष्टिक्रिया सांगितली तेव्हां ते बोलिले कीं श्रृष्टक्रम एक वेळ दाखवाल तैसें करूं मग देवें उदरीं चतुर्दश भुवनें ब्रह्मांडरचना दाखविली ह्मणोन लंबोदर जाहाला लोकांत हि विशेष आनंद ज्यास आहे तो लंबोदर होतो मा ब्रह्मानंदमय जो आहे तो लंबोदर कां नव्हे॥

कोणी पुसिलें कीं सूक्ष्म नेत्र आहेत यासी उत्तर की स्थूळ विचार स्थूल दृष्टीनें होतो परंतु सूक्ष्म विवेकास सूक्ष्म दृष्टि करा ह्मणोन भक्तास संवज्ञा आहे ॥

द्विभुज चतुर्भुज षड्भुज अष्टभुज द्वादश-चतुर्दश-अष्टादश-भुज कार्या सारिखें भक्तसंरक्षणार्थ देवें रूप आयुधें धरिली आहेत ॥

मोद विशेष होतो ह्मणोन भक्तबालकास मोदक दाखवोन जवळ आणितो ॥

अनुहत पनकवाद्या चा गजरा चें सुख दाखवावें ह्मणोन पदीं घुंगुरा चे नादें सांद्रसें जाणवितो हें ज्ञानी भक्त जाणताहेत ॥

भक्त बोलिले कीं कृष्णास अष्टनायका आहेत । त्यास उत्तर ऐसें जे गणेशास दश नायका आहेत । तीव्रा च ज्वालिनी नंदा भोगदा कामरूपिणी । उग्रा तेजोवती सत्या नवमी विघ्ननाशिनी ॥१॥ सिद्धलक्ष्मी दाहावी । सिद्धिबुद्धि दोघी पट्टराण्या । कृष्णभक्त बोलिले की कृष्णास सोळा सहस्र गोपिका आहेत । यास उत्तर ऐसें जें । असंख्यात नागकन्यकानीं गणेशास पातालीं नेऊन वरिले गोपिका परीस सुंदर होत्या । इंद्रास गर्व जाहाला तेव्हां सूर्यास लोपाविलें तेव्हां गणेशे नवा सूर्य करोन प्रकाश केला । यास्तव दिवाकर नांव जाहालें। चिद्रूप गणेश आहे ह्मणोन शक्ति नाम आहे । ऐसे च अनेक अवतार असेत । चैत्र शुक्ल चतुर्थी दोन प्रहरा दिवसा चतुर्भुज रक्तवर्ण **वक्रतुंड**-अवतार धरोन ब्रह्मयास श्रिष्टि करायास वर दिला । वैशाख शुद्ध चतुर्थीस **चिंतामणि**-अवतार धरोन **गणासुर** मारोन **कपिल**-ऋषीस चितामणि दिला । ज्येष्ट शुक्ल चतोर्थीस **विघ्नेश्वर**-अवतार धरोन मूशकारूढ होऊन **विघ्नासुर** मर्दिला । आशाढ शुद्ध चतोर्थीस **बल्लाळ**-अवतार धरोन वेद प्रगट करोन **कमळासुर** मर्दिला । श्रावण शुद्ध चतोर्थीस **गणेश**-अवतार धरोन **शंभूस** वर दिला । भाद्रपद शुद्ध चतोर्थीस **मोरेश्वर**-अवतार धरोन **शिंधुदैत्य** मारिला । भाद्रपद शुक्ल चतोर्थीस **गजानन** अवतार धरोन **सिंदूर** मारिला । **वरेण्या** च्या हेतू-

स्तव दुसरा **गजानन**-अवतार धरोन आश्विन शुद्ध चतोर्थीस गीता-उपदेश केला। कार्तिक शुद्ध चतोर्थीस **नारायण**-अवतार धरोन **सुमदामाधवास** रक्षोन **धूमदैत्य** मर्दिला । मार्गशीर्ष शुद्ध चतोर्थीस **धुंडिराज**-**अवतार** धरोन **दिवोदास** निवटिला। पुष्य शुद्ध चतुर्थीस कलियुगा चे अंती **धूमकेत**-अवतार धरोन म्लेछांचा निःपात करील। माघ शुद्ध चतुर्थीस **विनायक**-अवतार धरोन **देवांतक** व **नरांतक** दैत्य मारिला। फाल्गुन शुद्ध चतोर्थीस अनेक भक्ता स्तव छप्पन्न रूपें धरून अनेक दैत्य मर्दिले। कृतयुगीं वक्रतुंड गणेश विनायक ढुंढिराज हे चार अवतार जाहाले। त्रेतायुगीं चिंतामणि बल्लाल नारायण मोरेश्वर हे चार जाहाले। द्वापारि दोन गजानन विघ्नेश्वर हे तीन जाहाले। कलयुगि धूमकेत येक होणार। येका च्या सिद्धिबुद्धि एका च्या राहीरुक्मिणी। एका चे पुत्र लक्षलाभ एका चे ब्रह्मा मदन। एका चें वहन मयूर एका चे गरुड। येका चा रक्तवर्ण एका चा कृष्णवर्ण। येका चा युक्षुसमुद्र एका चा क्षीरसमुद्र। एका चे गडी अठ्याशी सहस्त्र ऋषी चे बाळ येका चे गोपाळ। येके काशींत क्रीडा केली येके मथुरेंत। येके गंगेंत येके यमुनेंत। येकें शेषा चे फणी वर नृत्य केलें येकें काळिया चे फणिवर। येकें गोकर्णमहाबळेश्वरीं वेणुवादन करून गायी राखिल्या येकें वृंदावनीं। येके पाताळी पद्मिणीशीं रासक्रीडा केली येके कुंजवनीं गवळणीशीं। येके तुंगाद्रि धरिला येके गोवर्धन। येक ऋषिपुत्र आपण जाहाला येक गायीगोपाळ। येकें गौतमा चें अन्न लुटिले येकें ऋषिपत्न्या करवीं आणविलें। येके मीनरूपें मीनासुर मारिला येकें मछअवतार धरिला। येकें अधारचक्रीं राहोन भार घेतला येकें मेरू घेतला। येकें नरकेसरी साठी सिंहासनीं प्रगटोन भुभ्रशेन मारिला येके प्रल्हादा स्तव। येके देवांतक नरांतक मारिले येके रावणकुंभकर्ण। येक कमळासुर येकें शंखासुर। येक सिधुदैत्य येकें सहस्त्रार्जुन। येकें पार्वती सोडविली येकें द्रौपदी। येकें सिधुदैत्या चे बंदीशाळेंतून देव सोडविले येकें रावणाचे! येक नर्मदेंत राहिला येक

गंडकींत । येकें गजाननाचें मुख घेतलें येकें अश्वाचें मुख धरिलें । येकें शिवाचें साह्य करोन त्रिपुरासुर मर्दविला येकें पांडवांचें । येकें दुरासद पाताळीं घातला येक गवासुर । येकें वरेण्यास गीता कथिली येकें अर्जुनास । येकें चिंतामणि धरिला येकें कौस्तुभ । येकास दूर्वा प्रिय येकास तुलसी । येक स्वानंदभुवनीं राहे येक वैकुंठीं । येकें धर्मा स्तव द्वादश अवतार धरिले येक अंबऋषि साठीं दशावतार । येकें शुक्रग्रहीं शुष्कान्न सेविलें येकें विदुराचे । येकें त्रिशिरा ब्राह्मणा चा ग्रास घेतला येकें सुदाम्या चे पोहे । येके अदितीस विश्वरूप दाविलें येके यशोदेस । येकें समुद्रा चा पुत्र चंद्र घेतला येक समुद्रा ची कन्या । येकें विरिजा विदारिली येकें पूतना शासिली । येकें ब्रह्या चा गर्व हरिला येकें इंद्रा चा । येकें भूचंद्र राजा चें शीर मागितलें येकें बिभ्रंशी चें । येकें मोरेश्वर वसविलें येकें पंढरपूर । येकें रामा कोळी तारिला येकें वाल्मीक । येकें शेष कटिसूत्रीं धरिला येकें शेषशयन केलें । येकास मोदक प्रिय येकास उपोशण प्रिय । येका चे चतुर्थी-व्रत येका चे एकादशी । येका चे पार्थिवपूजन येका चे गोकुळपूजन । येका चा शमीमुळीं वास येका चा तुळसीमुळीं । येकास सिंदूर प्रिय येकास गोपीचंदन । येकास प्रवाळ प्रिय येकास तुलसीमणी । येक ज्ञान देतो येक लक्ष्मी देतो । येकें अष्टमहापापी तारिला येकें पंचमहापापी । येकें शमाका उद्धरिली येकें अहिल्या । येकास भृशुंडीनें बैसविलें येकास पुंडलिकें । येकें अंत्यजी उध्धरिली येकें भिल्ली । येकें गर्दभ तारिला येके गज । येक पंचवटीसरोवरीं बुडाला येक यमुना । येकें शमीवृक्षावरी व्याधराक्षस उद्धरिला येकें कुटुंबभक्षक तुलसीवनीं । येकें श्रवणें सोमकांत येकें परीक्षिती । येकें कीर्तन मुद्गल येके + + + + । येक स्मरण भृशंडी येक प्रल्हाद । येके पादसेवन बुद्धि येके लक्षीमी । येके पूजन बली येके प्रथु । येकें नमन विश्वेदेव येकें अक्रूर । येक दास्य सिंधू येक हणुमंत । येक सख्य वरेण्य येक अर्जुन । येक मयुरास वंदन येक

अवळीस । येकें चंद्रांगदसूरसेन तारिला येकें रुक्मांगद । येका चें गंडकीनगरीं लग्न येका चें विधात्या च्या घरीं । ऐसे अनेक गुणानु-वाद वर्णोन,

शुक्ल शुध्ध ध्यान उपासनेला ।

उभा ब्रह्यापासी जय जय वक्रतुंडा ।

ह्या सात वाराच्या आरत्या

पवित्रता परळी ।

हे आरती

श्री गजानन जय गजानन जय जय गजानन ।

हें पद ह्मणोन

भावे स्मरा बुधी राम ।

शेजआरती क्षमापन ह्मणोन

क्षीरासीनं नरं० ॥

पवित्रस्थळीं पवित्रवंसीं पूर्वसदक्षिण समस्तक वामकक्ष सैयनीकवच

नर्मदाऐ नमो ० ॥

भद्रं ते ० ॥

अस्ति वचनं ० ॥

अगास्ति माधव ० ॥

जले रक्षतु ० ॥

हे श्लोक पढोन इस्टदेवते चे ध्यान नामस्मरण करोन इस्टज वामभागि स्थापोन उदपात्र भक्षणीय पदार्थ जवल स्थापोन शयन करावे ॥

शोडस दिन ऋतुकाल त्यांत पूर्व चार रजनी विषम दिन पंच्यांगसंधि शुध्ध दिनत्रय मूळ मघा रेवती जन्मनक्षत्र अस्टमी चतुर्दशी दिवसपर्व गुरु सूर्य चंद्र विशम रासि विशमौसस्थित बलिस्टलग्नी चंद्रबळ असता पुत्रार्थी मधुरान्न भक्षोन आनंदयुक्त पूर्वोत्तराभिमुख नानाबंधरहित सर्वाळंकाररहित इस्टदेवताध्यान उभयतानीं करून गर्भा-धाना चे मंत्र स्मरोन सुयोगानंतर दक्षिण कुक्षीवर शयन घटिका येक

करावें वाजीकरण करितां पुरुषशुक्र अधिक होता तनय होय न्यून होता स्त्री होय समान होता क्लीब होय दिवासंयोगी क्लीब अल्पायुषी होय पर्वी संयोग जाला तर पिशाच होय प्रातःसंधीस संयोग हो तरि मंदबुध्धि होय पूर्वरात्रीस अल्पायुष होय अपररात्रीस दीर्घायुष होय साहावे आठवे रात्रीस तामसी होय दाहावे बारावे रात्रीस राजसी होय चौदावे सोळावे रात्रीस सात्विक पुण्यश्लोक भगवद्भक्त होय या॰ प्रमाणें संयोगा नंतर उभयतांनीं स्नान करावें अथवा द्विगुण शौचविध करून पवित्रासनी देवताध्यान स्मरण आचमन प्राणायामत्रय करोन पुनःशयन करावें पूर्व दक्षण विपरीत केलिया कन्या होय

परयोनौ पतेद्बिंदुः कोटिपूजा विनश्यति ॥
यशो हंति तपो हंति ब्रह्महत्या पदे पदे ॥ १ ॥

( १७३ ) **सिद्धेश्वरबावा** दोघी स्त्रियां च्या संसारकलहास कंटाळोन **देवा** जवळ राहिला स्त्रिया येऊन उपोशणें करोन गाऱ्हाणी देवों लागल्या कीं भर्त्तार गोसावियानीं भुलविला हें कळतां च **देवानीं सिद्धेश्वरास दयार्णवबावा** चे स्वाधीन करोन दशमस्कंध प्राकृत यास पढवणे ह्मणोन सांगितलें परंतु शरीरीं वेथे मुळे आळस करितां च रात्रीं दृष्टान्त टीका करावया ची आज्ञा जाहाली यावर प्राकृत दशम **सिद्धेश्वरास** पढवितां च संसार करूं लागला ॥

(१७४) **वारुण** चे **देशपांडे कऱ्हाडास** आले होते ज्ञानेश्वरी- पारायणवेळे **देवा** चे दर्शन होता च विरक्त होऊन **देवा** संनिध राहावे ऐसा निश्चय कळतां च सर्व कुटुंबा चीं माणसें येऊन **देवास** पुसूं लागलीं कीं ऐसा बोध कां केला मग **देवानीं** ज्ञानेश्वरी चें अर्धे पारा- यण क्षेत्रीं व अर्धे **वारणेंत** करणें प्रतिवर्षीं एक-पारायण पर्यंत समागम घडेल सुखरूप प्रपंचीं परमार्थ साधणें ह्मणतां च तैसें च करूं लागले ॥

( १७५ ) येक रात्रीं कथेंत

नम्र होय भूतां । तेणें कोंडिलें अनंता ॥

हें पद ह्मणतां च **आणाजीपंत पारलेकर** यानीं ऐकतां च हृदयीं बिंबोन

मार्गी प्राणिमात्रास साष्टांग नमितां च इस्टमित्र एऊन देवास उपद्रव करूं लागले कीं हें कां सांगितलें मग देवानीं अभिवादन विधात्यास व विप्रांस नमन व अन्य यातीस मनोमय करावे ऐसें सांगतां च तसें करूं लागले मग त्याचें नांव दंडवते जाले ॥

( १७६ ) एक ब्राह्मण दुधभोपळ्यांत दुग्ध शर्करा घ्रत वेळा मिरें सर्व घाळून पाक करोन विप्रां वाढितां कडू निघाला ह्मणून कस्टी होता च देव बोलूं लागले कीं हे व्यर्थ न होता देवा चे मुखीं पडेल मग वारळापासीं मुंगीया-स्थळीं पसरतां च काकग्रध्रांनीं भक्षिले भूमि भिवली होती ते मुंग्यांनीं भक्षिली तो ब्राह्मण संतुस्ट जाला ॥

( १७७ ) एके वर्षी मोरेश्वरास देव आले यात्रेस रत्नाकर-देवास हि बोलाऊन चतुर्थीस च्यार प्रहर रत्नाकरदेवा करवीं कथा करवोन गणेशपर अपूर्व जडाव कंठमाधुर्य श्रवण होतां च श्रीस्वामीनीं अस्टभावयुक्त आलिगून मस्तक-पाठी-स हात ठेऊन धन्य धन्य ह्मणोन गळ्यातील हार घालोन शाठी पांघरवोन आज्ञा केली की श्रीगजानन या कीर्तनश्रवणें परम संतुष्ट जाला परंतु परंपरागत भाद्रपद चतुर्थीस मोरेश्वरास यावे हे वृत्ति श्रीगजानना चे आदिपीठ पाहात्रे व सकळ संतां च्या भेटी प्रयासा विणे पंढरीस होतात यास्तव आशाढीस जावोन नृसिंहा चे पश्चमेस ग्रामस्थानीं मठ दिला आहे तेथें राहावे व प्रतिदिनीं एकवार सटीक गणेशगीते चे पारायण करावें हीं तीन व्रतें आमचीं चालवावीं व ब्रह्मस्व करूं नये व कोणास याचना करूं नये व उत्साहा-स्तव कोणास संकट घालूं नये संतर्पणा चें साहित्य मिळेल तितुकें च करावें नाहीं तर ब्राह्मणास पिष्टमात्र दे(या)वें नाहीं तर गाईस तृण द्यावें परंतु द्वारपूजा कीर्तन माघमासी करोन यथाशक्ति अतिथीस विन्मुख न होवे ऐशी आज्ञा करोन कऱ्हाडा कडे रत्नाकर-देवास पाठवोन श्रीस्वामी अमळाश्रमास येवोन प्रवाळअदासा ची यात्रा करोन आले अष्टौप्रहरगणेशगीता प्रणवा ची व्याख्या पढावया चा छंद लागला होता क्षणक्षणा निवृत्य होऊन भान नसावे ऐसें होय मग अमळाश्रमीं प्रति-

**स्थानीं चे अयाचित** बोलावोन चातुर्मास्य करावयाचा उद्योग केला तो **कऱ्हाडीं अकाबाई** होती त्यांचे स्वप्नीं संन्यासी येवून चला ह्मणू लागले मग **रघुनाथदेव** समागमें घेऊन **अकाबाई कऱ्हाडी** हून अरणी घेऊन आलिया वर अग्नि सिद्ध केला **श्रावण शुद्ध** चतुर्थी पासोन नित्य द्वारयात्रा येकवीस पार्थिवगणेशपूजन शमीदूर्वा-मंदारा च्या लाखोल्या घालोन संतर्पण रात्रौ कीर्तनपुराणादि उत्साह भाद्रपद दशमी पर्यंत **नामल**-गावीं च केला मग एकादशीव्रत करोन द्वादशीस पार्णे जालिया वर त्रयोदशीस यात्रेकरू अनेक भक्त नारी-केळ-कर्दळी-द्राक्षादि अनेक फळार घेऊन आले होते ते स्वामीदर्शन यात्राकार्य जालिया वर अनंतव्रतास घरास जावे परंतु अनेक दुश्चिन्हें दुःस्वप्नें होऊं लागलीं हें काय आहे ह्मणोन चिंताग्रस्त परस्परें विचार करूं लागले कीं **श्रीस्वामी** च्या व **अकाबाई** च्या शरीरीं स्वस्थ आहे कांहीं रोगा ची बाधा किमपि नाहीं परतु हे दुश्चिन्हें स्वप्नी वृक्ष उन्मळले पाणी कूप तडाग नद्या आटल्या पर्वत भिंती खचल्या देवता केश मुक्त करोन रोदन करूं लागल्या गृहें तस्कर लुटून नेऊं लागले मग **अमळाश्रमीं** जातां च **देव** पुसूं लागले कीं आह्मीं मूळ धाडणार होतो हें तुह्मास कैसें कळलें तेव्हा **यादव नऱ्हेरदेव** बोलिले कीं परसांतील केळ व्याली होती ते पडली व स्वप्नीं संन्यासी बोलाऊं लागले त्या वरोन आलों मग **नऱ्हेरदेवास** एकांतीं पुसू लागले कीं मार्गी अह्मास उजवे तास डावे काकसर्पादि अपशकुन दिशा धुंद नक्षत्रपात कां जाहाले **देव** बोलिले कीं भगवत्सत्ता प्रमाण ॥

(१७८) एकदा **मोरेश्वरा** चे यात्रेस **देव निरा** उतरते वेळेस सांगड तुटतां च दोघे गण होते एकानें सांगडीया ची शेंडी बळकट धरिली येका चे हातास सुलप येतां चि पायांत पाय अडक-वोन डोयी वर चढों लागले तेव्हां **देवानीं**

गजानना दाखवि पाउलें रे ।

हा धावा ह्मणतां च शेण्यां चें वेट लागतां च तिघे वांचले ॥

( १७९ ) येकदा **अलजपुरीं** आंचवते वेळेस दंतशोधनास येके मुलीनें चोवी देते वेळेस तिचे हस्तास रक्त येता **देवास** अश्रुपात आले ॥

( १८० ) एकदां आषाढी एकादशीस सर्व यात्रा उतरली परंतु कंगाल घेऊन आपण उतरावें हें **देवा** चें मानस परंतु नावाडी नायकोन सायंकाळीं घरास गेले **देव** पैलतीरीं

गणेशा उदारा भेटे लंबोदरा ॥

दीना च्या माहेरा देवराया ॥

हें पद ह्मणत बसले तो प्रहररात्रीस बडव्या चे रूपे स्वप्नांत नावाड्या चे पाठी वर तोबे मारून सत्वर नांव घाल ह्मणतां च जागा होऊन विस्मित होऊन नाव घालोन **देवास** उतरलें मग दुसरे दिवशीं महाद्वारी संतसभेंत **उद्धवचिद्घन अद्वैतानंद** व **योगानंद** संन्याशी तिघांनीं श्लोका चे तीन चरण अध्यात्मपर केले तेथे **देवानीं** चतुर्थ चरण केला ॥

( १८१ ) पंढरीस **देवा** च्या दर्शनास **गोसावीनंदन** आले आपली कविता

नेत्री दोन हिरे । हा श्लोक

व

गणपति वंदिन दयाळ । हे पद

ह्मटलें मग प्रार्थना केली कीं **देवा** ची कविता ऐकावी हा हेत आहे मग **देवानीं**

जो शोभे गुण ईश निर्गुण गुणी ।

हे दाहा श्लोक ह्मणोन

ब्रीदावळी आपुली सांभाळी ।

हें पद ह्मणतां च **गोसावीनंदन** सद्गदित साष्टांग नमोन परम संतोषें दोन मास कीर्तन श्रवण करोन **देवा** बरोबर **विजापूरप्रांतीं** जावोन गणेशचरित्र मागें लेहोन घेतलें ॥

( १८२ ) एकदा त्रिंबक बरवेश्वरास देव बोलिले कीं तूं एकनिष्ठ भक्त आहेस ह्मणोन एक गोष्टि तुज पाशि सांगतों ते कोणास सांगो नको ज्येष्ट शुद्ध पौर्णिमा उत्तरायणीं अवतार पूर्ण जाहला असता परंतु अदासाहून येणें व रिधीस आणावया चें होतें व अग्निसिध्धि करणे व श्रावण भाद्रपद चतुर्थीस उत्साह समीप आला या करितां प्लवंग संवत्सर भाद्रपद शुक्ल चतुर्दशी प्राथःकाळीं प्रयाण होईल हें ऐकोन जैसा वज्रें पर्वत कीं वायूनें कर्दळी तैसा मूर्छित पडोन मुख शुष्क जाहाले हे पाहोन देवानीं प्राणसख्या सावध सावध ह्मणोन पाठ थापटोन उठवितां च गंहींवरें नेत्रीं अश्रुपात दाटले कंठ सद्गदित जाहाला बोलवे ना दुःखें शरीर रोमांचें कापों लागलें ऐशी अवस्ता पाहोन देवांस हि गंहिवर येता च त्यास पोटाशीं धरितां च इंद्रियें क्रिया विसरलीं चित्त-चैतन्य समरसलें मना चे संकल्प विकल्प गेले अहंकार हें भान सांडिलें पंचभूतें विरों पाहती ऐशी क्षणक्षणैक विदेहस्थिती होता च देवानीं सांवरोन भक्तराजा सावध सावध ह्मणोन त्यास सावध करितां च त्यास देव बोलिले कीं भक्ता साठीं देवा चे अनेक अवतार होऊन विघ्नें दुःखें दूर करोन पदोपदीं भक्तसंरक्षण करावें लागतें तुमचे माघे पुढें देव चि आहे पांचभौतिका साठीं कांहीं शोक करावा ऐसें नाहीं ॥ हें ऐकोन गद्गदवाणी वारंवार चरणीं लोळोन कर जोडोन दीनमुखें बोलों लागला कीं आज ब्रह्मांड कोसळलें कीं मेरु पर्वत खचले कीं प्रळयाग्नि शरीरीं संचला कीं काळरुद्र गिळो पाहे ऐसें दुःख वाटतें परंतु स्वामी चें रूप काशी च्या वक्रतुंडा सारिखें आरक्त गौर आरक्त मृदु चरण नखें चंद्ररेखे सारिखीं टांचा नवनीता सारख्या मृदू घोटे वर्तुळ पुष्ट वर्तुळ कर्दळीवत् जानू जंघा कटी दृढ निम्न नाभी वर्तुळ दोंदा वरी श्वेत वसन ।विशाल हृदय हस्तद्वय पुष्ट सरळ मृदू सरळ बोटें आरक्त कर माळाजपक ग्रीवा विशाळ कर्ण सुंदर नासिक कमळनेत्र आरक्त वोष्ट प्रसन्न वदन वर्तुळ हानवटी विशाळ भाळीं शिंदुरवर्ण तिळक सर्वांगीं भ-

स्मलेपन अनेक पुष्पहार-मुगुट दिव्य-सुगंध-श्वेत वस्त्र जेवी वत्सास धेनू कीं मीनास जळ तैसे कृपाळूपणें अनाथास दीनास दुर्बळास अज्ञानास विवेकें मृदु भाषणें स्वकीय परकीय समान पदोपदीं गौरवोन ज्यास जें अपेक्षित त्या तें पुरवोन आपण निरभिमान राहावें ऐशी वृत्ति दिव्य मूर्ती पाहातां च सर्व दुःखा चा लय होऊन सुखा चे पर्वत होताहेत ऐसें वारंवार पुढें कैसें भेटेल या करितां परम दुःख जाहालें ॥ हें ऐकोन स्वामी बोलिले कीं विवेकें दुःखाचा लय होतो अवतारादिक गेले प्रळयीं सप्तपाताळ-एकवीसस्वर्ग-युक्त भूगोल बुडेल तेथें क्षणभंगूर अस्थिमासा चा गोळा याचे दुःख कायसे तरी अवतारकृत्य जें होणें तें होयील मनांत मात्र हें ध्यान दृढ धरोन सुखरूप राहणे ॥ ऐसें ऐकोन हि दीनवाणी वारंवार नमन करोन प्रार्थू लागला कीं स्वामी च्या वियोगा चें दुःख सोसे ना मरण होईल ॥ हे ग्लानि ऐकोन कृपे चा सागर अनाथा चें माहेर भक्तवत्सळ **निरंजन योगिराज** मस्तकीं हस्त ठेऊन मुख कुर्वाळून पुनरपि प्रेमें आलिंगोन बोलिले कीं अरे बाळका धन्य धन्य तूं आजी आत्मविचार सर्व दुःखरूप शरीर जन्ममरण तुटावें ऐशी वासना होतां च कोटि पूर्वज उत्धरले सर्व तीर्थें तपें व्रतें दानें पूजा नमनें घडलीं कर्म-उपासना बहुतास सांगितली व ज्ञानमार्ग सांगितले नाहीं आमचे चित्तीं हि सांगावें ऐसें होतें या वर तुझा हि प्रश्न जाहला यास्तव पाशांडी गुरुद्रोही मातापितृद्वेशी देवब्राह्मण-कथापुराणद्वेशी दुराचारी अभक्त शमदमादिसाधनहीन जो असेल त्यास सांगू नको उपतिष्ठणार नाहीं ऐसें जे ज्ञानगंगे चा पूर कीं अमृता चा सागर **निरंजनमहाराज** शिष्यबोधीं अति चतुर उभयतास जाहालें ऐक्यपण अन्यक्रिया विसरोन **राणादेवी** चा दक्षणेस **करवीर** पुष्पवृक्षा चे बागेंत **कर्पूरा** नदी निकट आसनीं बैसोन पंचीकरण आत्मानात्मविचार सांगितला ऐसा जे । गुरु-शिष्य हे कल्पनामात्र आहे तुज मज काहीं भेद नाहीं देव तिर्यग्योनी मनुष्यामध्यें आत्मा

एक चि आहे ह्मणोन सर्वां चे इंद्रियां चे व्यापार एक चि आहेत याति-भेदा स्तव कर्मभेद मात्र आहे परंतु आपणा सहित सर्व विश्व अस्थिमांसा चे समुदायास कोण चालवितो बोलवितो तो एक आत्मा ऐशी श्रुति आहे निर्गुण निर्विकल्प निराकार ब्रह्मस्वरूपा ची चिच्छक्ति स्वरूपीं आहेपणें नाहीं नाहींपणें आहे आहे नाहीं ऐशी विलक्षण शक्ति जे ते प्रकृति स्वयं जड परि आत्मा तिज मध्यें बिंबतां च तीस सामर्थ्य आलें आत्मसंयोगें जें होणें अनंतब्रह्म तितुकें अनेक ब्रह्मरूप माया विस्तारिली शुद्ध-सत्वीं बिंबला तो ईश्वर मलिन सत्वीं बिंबला तो जीव ईश्वरें सूत्रात्मा होवोन हिरण्यगर्भ शरीर धरलें हिरण्यगर्भा चे अवयव ब्रह्मांडि चे लिंग-शरीरें समष्टि-लिंगशरीरा चा येक हिरण्यगर्भ वैश्वानरात्मा समष्टिस्थूळ-शरीरा चा येक व्यष्टिविराट मलिन-सत्वप्रधान जीव ईश्वराधीन सोळा-कळायुक्त प्राज्ञ होता तो तैजसलिंगशरीरी होऊन विश्वाभिमानी जाला पांचभौतिक स्थूळशरीरी विराटा चे स्वाधीन जाहला लिंगशरीरी हिरण्यगर्भा चे स्वाधीन जाहला ईश्वरशक्ति ब्रह्मीं लीन होय तो पर्यंत मलिनसत्वकोटि आहेत ,हिरण्यगर्भ आहे तो पर्यंत लिंगशरीरकोटि आहेत विराट लीन होय तो पर्यंत नाना याति स्थूळशरीरकोटि आहेत हिरण्यगर्भ ईश्वर असतां हि अनेक जन्मी वेदांताभ्यासें गुरुकृपेनें जीव ब्रह्म होय तपें क्रममुक्ति ग्रामीं होताहेत व्रतें अन्य जन्मी विषयप्राप्ती जपें देवताप्राप्ति तीर्थें पापक्षय होय ईश्वरमायेनें आवरणप्रकृतिनें ब्रह्मांड रचिलें तेथें उन्मत्त दैत्य उपद्रव करिताहेत त्यांस निर्दाळोन जीवकोटि आपले भक्त तारावयास ईश्वर अनेक अवतार धरोन जे जे साधक जैसे अधिकारी होते त्यांस वेदा मध्यें तीर्थें तपें व्रतें दान यज्ञ जप पूजन स्वधर्म यात्रा सांगितल्या परंतु जे आत्मविद्येस अधिकारी त्यांस बृहदारण्यक उपनिषद्भाग सांगोन तारिलें तें उपनिषद् सांगावयास अवकाश नाहीं परंतु श्रीगजाननें निजभक्तराज वरेण्यराजास जो पंचीकरणविवेक सांगितला तो तुज शिष्यराया सांगतो ।

आरंभीं गणेश वंदून शारदा प्रार्थून जे सर्वदा स्फूर्तिदा ॥ १ ॥
ऐशा एकावन्न वोव्या **स्वामीनीं** स्वमुखें करून पत्रीं लेहोन शिष्यनायकास योगमुद्रा गुरुप्रतीतीने शास्त्रप्रतीतीने आत्मप्रतीती होतां च ताटस्थमुद्रा लागतां च पुढें काय आहे ह्मणोन **देवानीं** सावध करितां च अष्टभाव जाहले नमन करोन कर जोडोन आत्मप्रतीती बोलूं लागला। पंचभूततत्वें स्थूळ सूक्षिम देव तिर्यक मनुष्य काहीं मी नव्हे बंध मोक्ष नाहीं गुणातीत प्रकृतिपर मी ब्रह्मरूप आहे शोक मोह मज नाहीं अवघें स्वामी चें अविनाश प्रकाशरूप कोंदलें आहे मी नाहीं ऐसा निश्चय बाणलासा जाणोन **देवानीं** मस्तकीं हात ठेवोन तूं धन्य कृतार्थ जाहालास ह्मणोन **द्वारकावतीस** मात्र हें शास्त्र सांगणें तिला **पंढरीस** ठेवावें लागतें ऐसें सांगोन **देव** गृहास आले माध्यान्ही सर्व गणा समवेत **गणेशकुंडी** स्नान करून **देव** बोलिले कीं ज्यास गुरुतीर्थ पाहिजे तेणें येथील न्याव्हें मग ते दिवसीं दिव्यान्न करोन स्वहस्तें प्रसाद सर्वांस वाटिला भोजनानंतर सर्व साधकमंडळीस सांगितलें कीं वोशःकाळीं उठोन शौजविधि करोन अजपास कल्पोन प्रातःस्नान संध्या होम जप पूजा ध्यायन दान व्यवहार माध्यान्हीक पंचमहायज्ञ अतिथि-गाय-तुलसी-पूजन पवित्रशाक-पवित्रान्न-भोजन अयाचित शुक्लवृत्ति देहप्रारब्धें कृशि वाणिज्य ज्योतिषकर्में जीविका करोन परोपकारें सच्छास्त्रसत्संगें काळ हरा सायंसंध्या नित्यनेम गीतापठण केलिया इहपरलोकीं चे मनोरथ पूर्ण होतील ऐसें सांगोन सायंहोम संध्या नित्यनेमा नंतर निद्रास्थानीं **देव** होते ते बोलिले कीं होमशाळे च्या वेदींत बसोन हरिजागर करावा ह्मणोन वेदींत कंबलासनीं पद्मासनीं उदङ्मुखें बैसोन **कृष्णाप्पा बल्लाळदेवास** दूर्वामाहात्म्य काळाख्यान व **ज्येष्ठ रघुनाथदेवास** उपनिषद्भाग **लघु रघुनाथदेवास** सहस्रनाम **शंभुभटास** गीतापठण कोणास कवच कोणास दूर्वा **सुदामदेवास** स्तवराज **मंगळमूर्तीस** गजाननस्मरण करावयास सांगोन आपण नाना कौतुकें करीत श्रवण करीत बहुता जना सहवर्तमान जागर केला परंतु सर्व जनां

ची अंतःकरणीं चिंता होती कीं हें विपरीत काय आहे पंच पंच वोश:-
काल होतां च शौचविध स्नान करोन भस्म चर्चोन तुलसी मस्तकीं कर्णीं
मुखीं कटीस व दर्भ आसनी कटीस उपवीति शिखेस दो हस्तीं पवित्रें
रुद्राक्ष-तुलसी-मणिमाला धरोन कथा सर्व स्तोत्रपाठ संपवोन **अयाचि-
तास** हाक मारितां च पुढें उभे ठाकोन **अयाचित** बोलिले की देवळांत
आह्मी निद्रा केली होती तों देऊळ आंगा वरी पडिलेसें वाटलें एक्या
ब्राह्मणें **देवा**नीं तुमचें स्मरण केलें आहे सत्वर जा ह्मणतां च धांवोन
दारापाशीं येतां च **देवां** ची हाक ऐकिली कां बोलाविलें हें पुसतां च
**श्रीनिरंजनयोगिराज** बोलिले कीं आज प्रयाण करितों । हें ऐकोन
सर्वां चें अंतर खोचोन कित्येक मूर्छित पडले कोणी मुख वक्ष पिटों
लागले कोणी दीर्घ स्वरें रुदन करी कोणी भूमी वर लोळे ऐसा सर्वांनीं
कोळाहळ करोन दीनमुखें विश्वजननी **निरंजनमाउली**स प्रार्थूं लागले
कीं आह्मी बहुत अपराधी पदोपदीं **स्वामी** ची अवज्ञा केली शेवा
हि न घडली परंतु सर्व क्षमा करोन अपत्या परीस अन्न वस्त्र पात्रें
नाना विषय देखोन मातापितरां परीस परोपरी सुखें संरक्षण केलें ऐसें
पुढें कोण करील यास्तव आह्मास अगोधर मृत्य होय तें करावें आह्मीं
हि **स्वानंदभुवनास** येऊं । हें ऐकोन दीनदयाळ हस्त जोडोन सर्वांस
प्रार्थूं लागले कीं हा समय शोका चा नाहीं आनंदे करोन आमची
बोळवण करावी तुह्मास जें सांगावया चें तें सांगितलें च आहे **ऋाशिस**
मात्र सांगतों कीं बरोबर आलिया जन्ममरण आहे यास्तव न येणें कृत-
युगीं लक्ष वर्षें आयुष्य असतां आतां कोठें आहेत नाशिवंता साठीं शोक न
करावा ह्मणोन सर्वां चीं मुखें कुरवाळोन करुणास्वरें वारंवार प्रार्थना करोन
**अयाचिता** चे चरणीं मस्तक ठेवोन सर्वांस दैवत ब्राह्मण आहे हें सांगोन
**आकाबाई** बोलिली कीं **स्वामी** चा वियोग सोसे ना जन्मादारभ्य ज्या
ज्या वनीं ज्या ज्या ग्रामीं संरक्षण मृदुभाषण विनोदकौतुकें केली तीं आठ-
वोन हृदयस्फोट होऊं पाहातो प्राणसख्यानें उत्तर दिले जे या मूर्तीं चे
ध्यानीं अखंड पूजन करणें व स्वप्नीं अखंड दर्शन होईल तुमचें अंत-

बाह्य **निरंजन** चि आहे व हे चि प्रतिमा तृतीय दिनीं चिते मध्यें जो देव निघेल त्यास यास भेद नाहीं त्याची अखंड शेवा करोन येथें चि रहाणें ह्मणजे वियोगदुःख होणार नाहीं व ज्या स्थलीं शकटा चा आंख मोडेल तेथें चि चिता करणें उत्तरकर्म **ढुंढिराज** करील सपिंडीस **रत्नाकर कऱ्हाडाहून** येयील त्यास जें सांगणें तें पत्र लेहोन त्यास पाठऊं भागीरथींत गणेशें क्रीडा केली आहे त्या जळें या कलेवरास स्नान घालोन उत्तरकर्म करणें ऐसें सांगोन प्राणायाम त्रय करोन चरणीं किंकिणी कमलासनयुक्त पीतांबरपरिधान निम्ननाभी नागकटिसूत्र लंबोदर विशाळहृदयीं अनेक रत्नमाळापदकपुष्पहार चतुर्भुजकटककेयूरमुद्रिकायुधयुक्त पाशांकुशवराभय कंबुकंठ सरळशुंड शूर्पकर्ण भालचंद्र सिंदूरचर्चितांग मुकुटकुंडल-प्रसन्नवदन गजानना चें ध्यान करोन ॐ श्री गजानन ॐ जय गजानन ॐ जय जय गजानन त्रिवार गर्जना करवोन शडाननें उन्मीळन शाभयोगे आत्मभाशण सस्वरूपतायोगमुद्रा करोन मुखांतोन विद्युल्लते चे परी जोतीमात्र निघोन गेली शरीराकृति पूर्ववत् राहिली हें पाहोन नाडी चालेनासी **रघुनाथदेवें** पाहोन सर्वांनीं दीर्घस्वरें रुदन आरंभिलें मग अंगणा मध्यें पवित्रासन घालोन **देवास** बैसविलें **बीड-राजोरी-राक्षसभुवन-शाहगड-मंजरथास** वार्ता जाता च प्राथःकाळा पासोन अस्तमानपर्यंत वीस सहस्र मनुष्य मिळालें त्यांनीं जो शोक केला तो लिहिता पूर्वत नाहीं शमी-तुलसी-बिल्व-चंदनकाष्ठां चे संभार पर्वततुल्य पडले बहुत दाटी जाहाली ह्मणोन **रघुनाथदेव त्रिंबक वरवेश्वर बल्लाळदेव बाळदेव हरिहरादिक** अनेक भक्तानी परिघ करून भोंवते बैसले मग स्नानास **भागीरथीजळ** नाहीं तंव **काशी** चे कवाडी दोघे बहुत मनुष्यें कां मिळालीं ह्मणोन वांकडा मार्ग करोन तेथें आले त्यांस **दादोरामा**नें पुशिलें कीं **श्रीनिरंजन** महासिद्ध आहेत त्यांच्या स्नानास **भागीरथीजळ** पाहिजे द्रव्य घेऊन देणें ते बोलिले कीं वीस सहस्र मनुष्यें ज्या साठीं मिळालीं त्याचे स्नानीं आमुचें हें सार्थक होईल ह्मणोन दाहा दाहा शेरां चा

**येक येक कावड दों कावडीतील अर्धे अर्धे पांच पांच शेर देऊन अर्धें रामेश्वरास** ठेविलें मग **देवास** स्नान घालोन अळंकारोन नाना-वाद्यें-छत्र- चामर-अनेक-पताका-मोर्चेल-युक्त पंचाग्नि-शकटा वर स्थापोन अग्रभागीं **काशिराजास** येवोन **अक्काबाई** बैसतां च उत्थानश्राद्ध होऊन सुस्नात अनेक द्विजांनी शकट वोढिते वेळे सर्वांनीं सर्व वाद्यें दुंदुभियुक्त कर्णा ढोल टाळ मृदंग वीणा तुतुरा शृंग झाल्लरी वाजुंत्री-सुर वाजवून शख माहा शोकें दीर्घस्वरें आक्रोश करीते वेळें धूम्रें ब्रह्मांड कोंदलें कित्येकां चे हृदयस्फोट होऊं पाहाति कोणी भूमी वर लोळती कोणी वक्ष-मुखें पिटती मूर्छा पावती कित्येक देहभान विसरले कित्येक पिशाचवत् जाहले वस्त्र-यज्ञोपवीत गेलें न कळे कोणी ह्मणे दिवस कीं रात्री कोणी ह्मणे हे स्वप्नसंपत्ति जो विश्वाचा मायबाप तो कैसा आह्मासी मोकलील कोणी ह्मणे आह्मांशीं मरतां चि भले कोणी ह्मणे जळीं देह टाकावे कीं पर्वतीं कर्वतीं घालावे कीं विषप्रयोगें नाशावे किमर्थ वाचावें या दुःखीं

धांवे पावे **श्रीनिरंजना** । मायबापा सख्या सज्जना ।
कां मोकलिशी बाळका दीना । कृपाघना भेटे गा ॥

आजी आह्मा मीना समुद्र आटला कीं आह्मा पाखिरांस वृक्ष उपळला कीं आह्मा वनचरांचा पर्वत चूर्ण जाहाला कीं पद्मास चंद्र लोपला कीं कमळास सूर्य कंटाळला कीं धेनूनें वत्स लत्ते पाडिलें कीं मातेनें बाळा विष दिलें कीं लेकुरांशीं विकिलें पित्यानें गेला रे गेला मायबाप धन पुत्र मित्र आमुचे प्राण तन मन धन न राहतीं बाल्यत्वा पासोन आजि वरी वस्त्रपात्रद्रव्यें नाना पदार्थें पोशिलें कीर्तन संभाषण विनोद दया दक्षिण्य अवदार्य समत्व भक्ति कर्म उपासना ज्ञानादि अनेक गुण आठवोन परस्परें आलिंगोन रुदती येक येकाशी सांवरी येक येकाशीं समजावी येक पडे येक उठे नादें कोंदले अंबर । सर्वी केले हाहाकार । कांपे वारंवार । धरणी हे ॥ त्रैलोक्या चा तारक तो चि **निरंजनरूपें विनायक-अवतार** संपला ह्मणोन दुःखें देवां

चीं विमानें अंतरिक्षीं दाटिलीं ऐशा शोकें मार्गीं चालतां लोकांनीं पुष्पमाळां चे संभार शकटा वरी टाकिले तेणें **देवा** ची मूर्ति लोपे मग निकट भक्तराज जे होते ते पुष्पहारप्रसाद अष्टदिशेस भिरकावितां च प्रारब्धवंतांस प्रसाद पावे ऐसें पांथिकश्राद्ध करोन अपेत ईशावास्य समास्त्व तदेव पुरुषसूक्तादि अनेक ब्राह्मण चतुर्वेदा चे घोष करीत पुष्पसंभार वांटीत भृशुंडीस प्रदक्षणा करोन गणेशकुंडी मार्जन करोन आशापूरक गणपती चे देवालय सव्य घेवोन भागीरथी च्या पूर्वे कडे गणेशा च्या उत्तरे कडे गाडा येतां च आंख मोडला मग तेथें भूमिशोधन संमार्जन रंगवल्लि चिता करोन पंचाग्नी वर **अयाचित** व **रघुनाथदेव** यानीं विपरीत परिस्तरणयुक्त अंत्येष्टि समापितां च अरणीपात्रें समर्पून करुणास्वरें घृताहुती चे नेत्रोदकयुक्त मंत्र ह्मणतां च चंदन-बिल्व-शमी-तुलसी-काष्टां चे संभारा वर घृता चे कुंभ समर्पितां च अग्निशिखा धडाडिली मग सर्व मंडळी सुस्नात निंबपत्रें भक्षोन स्वस्थानीं प्रवेशले कांहीं आहार करोन रात्रौ गरुडपुराणश्रवणें चिती पाशीं जागर करोन प्राथःकाळा पासोन दश-दिनपर्यंत **देवां** च्या आज्ञे वरोन **ढुंढिराजदेवां**नीं दशदिनकर्म करोन एकादशदिनीं **कऱ्हाडाहुन** रत्नाकरदेवें येतां च पंचभूतविकारें अत्यंत गुरुमोहे बहुत शोक केला क्षणेका विवेकें शोक गिळोन सर्व लोक शोकातुर होते त्यांस समाधान करूं लागले कीं कांहीं चिंता न करणें श्रीगुरुराज **निरंजन महाराज** तुमचें अंतर आहे जे मूर्त्ति पाहिली तिचें ध्यान करोन स्वस्थ मनें पूजासंभाषणादि व्यवहार भावोन विवेकें सुख पावाल ऐसें बहुता परी समाधान करितां सर्व भक्तराजांस ऐसें वाटलें कीं **श्रीनिरंजनयोगिराज** हा चि प्रगटला मायबाप धावण्या धांवला कीं वियोगरोगियास अमृतधन्वंतरी भेटला ऐसे परमहर्ष पावोन परस्परें वर्तमान सांगोन सपिंडीकरण गोशतकदशदानें शय्या-महिशी-दासी-अश्व-भूमि-गृह-दानें वृषोत्सर्ग करोन अकरा श्राद्धें द्विजसंतर्पणें विनायकशांति करोन सर्व मंडळीस द्रव्य वस्त्रें देवोन अभय देवोन निरोप

दिला मग दोघे पुत्र **करहाटक्षेत्रास** पाठवोन **द्वारकावतीस पंढरीस** पाठवोन कित्येक भक्तांस **कऱ्हाडीं** पाठवोन कित्येकांस **अमळाश्रमीं** स्थापना करोन **मंगळमूर्त्तिस राक्षसभुवनीं** स्थापोन व **केशव** व **बल्लाळास मोरेश्वरीं** राहावयाची आज्ञा करोन दोघा पुत्रांसहवर्तमान **अकाबाई** चे सुश्रूशेस स्वामिसंनिध आपण राहिले तेंव्हां **रघुनाथदेव** बोलिले कीं समाप्तिवेळे बरोबर जावयाचा हेत जाणोन **अकाबाईस देवें** आज्ञा केली कीं बरोबर न येणें चितेंत जे प्रतिमा निवेल ते माझी च मूर्त्ती जाणोन शेवा करोन सुखरूप राहणे या वरोन भस्म काढिते वेळे शुंडादंडगंडस्थळें हस्तपाद दोंदा च्या आकृती शिंदूरा चीं पांच बोटें आहेत ऐशी मूर्ति निघाली याचा विचार करावा मग **रत्नाकरबावानीं केशव बल्लाळांस** बोलावून भोंवता प्राकार बांधविला व आपण वृंदावन बांधोन सर्व भक्तमंडळी पाचारोन प्रतिमा स्थापिली व समाप्तिस्थानीं पादुका स्थापिल्या परंतु **देवा** चें दर्शन न जाले या मुळें शरीरी विषयमात्रीं उदासीन होऊन येकान्न-येकभुक्तपणें तप मांडिलें ह्मणोन **देवांनीं नर्मदाबाई** चा पुत्र **विनायक गंगाह्मसल्यास** गेला होता त्याचे स्वप्नांत एक खारीक व शिंदुरें लिहिलें दिव्यपत्र ऐसें जें शोकमोह टाकोन वडिलीं जो दीप लाविला त्याची काजळी फेडोन स्नेह घालणें

**करमाळे** चें विस्मरण । कां पडलें **निरंजन** ॥

स्वरूप दशदिशा भरलें आहे स्वस्वरूप सुखानें रहाणें ऐसें पत्र देवोन सांगितलें कीं **रत्नाकरदेवांस** हें पत्र न वाचितां देणें मग खारीक व पत्र **विनायकें** देतां च वाचितां च सद्गदित होऊन हर्षणावले मग कांहीं वृत्ती चे मुळें दायादानीं भीड घातली कीं तुह्मीं वौशीं तपें रूपें ज्ञानें मान्यतेनें परम थोर आहात तरी वृत्तीचें कार्य करणें या आग्रहास्तव राजद्वारीं उपक्रम करितां च विषा ची बाधा जाली मग आषाढीस **पंढरीस** गेले तां शरीर व्यापलें उशःकाळीं स्वप्नीं येक ब्राह्मण

**येका सुवासिनीस** पुसतो कीं या भक्तास कांहीं उपाय करावा ती बोलिली कीं आपण चित्तीं धरिल्यानें होयील मग ब्राह्मण बोलिला कीं साहावें दिवसीं जें होईल तें पाहणें मग साहावे दिवसीं **कडेगावांस** येतां च रात्रीं अरण्याना चा वनस्पती ची शाक भक्षिली होती त्यांत काय पदार्थ होता त्या मुळें रात्रीं बहुत ढाळ उखाळ जाहले विषा चीं जळमटें पडलीं मग **कऱ्हाडीं** येतां च येका गोसावियानें अवशध देतां च कांहीं डाह होता तो हि शमला मग पूर्वी **देव** होते तेव्हां च **रत्नाकरदेवांस** चतुर्वर्ग नंदन जाहले गणेशें **काशींत ढुंढीराज**-अवतार धरोन अपूर्व क्रीडा केली ह्मणोन **देवानीं** प्रथम पुत्रा चें नांव **ढुंढीराज** ठेवोन

ढुंढिराजा तूं विसावा माझा ।

हें पद ह्मणोन खेळवीत असत । दुसरियास गुरू चें नाम **काशीराज** ठेविलें । तिसरिया चें नांव **विश्वनाथ पाठकानीं** अंतकाळीं सांगितलें होतें कीं आह्मीं वस्त्र--पात्र--पुस्तक--द्रव्या चा वाटा **कान्हेरीस** दिला नसतां वृद्धापकाळीं आमचें बहुत संरक्षण केलें या स्तव तुमचे वंशीं आह्मीं येऊं आमचें नांव ठेवणें या स्तव **विश्वनाथ** नाम ठेविलें । च्वथे बाळा चें नाम हें बाळ भाग्यवान आहे ऐसें **देवें** वारंवार ह्मणतां च व्यवहारीं **भगवान्** ऐसें नाम जाहलें । **देवां** चे वेळेस दोन मास वय होतें तेव्हां जवळ घेऊन आवडीनें खेळवीत असेत ऐसें चौघा पुत्रांस गणेश-उपासना सांगोन वेद शास्त्र-अभ्यास करविला **श्रीरत्नाकरस्वामी देवा** चे वेळे भक्तमंडळी चा परामृश जैसा होय तैसा च करोन उत्साह पुण्यतिथि तपयज्ञादि अनेक अनुष्ठानें करोन **पंढरी मोरेश्वर** ची यात्रा प्रतिवर्षी करोन बहुत काळ असतां मग अवतारसमाप्ती चे वेळे वडील पुत्र **ढुंढीराजदेव** वेदशास्त्रसंपन्न परम बुद्धिमंत जाणोन त्यास आज्ञा केली कीं **पंढरी--मोरेश्वर** ची यात्रा करोन अग्नहोत्रादि कर्मे करोन **अमळाश्रम** चे स्थळ रक्षोन वेदाध्ययन करून संप्रदाय वाढवणें । दुसरे पुत्र **काशीराजदेव** परम शांत वेदशास्त्रसंपन्न कीर्तनभक्ति करणार जाणोन यांस आज्ञा केली जे तुह्मी अपूर्व कवित्वरचना करोन कीर्तन-

भक्तीनें **देव** संतोषवोन **करहाटक**क्षेत्रीं राहोन उत्साह पुण्यतीथि करोन वृत्तिसंरक्षण करणें । तृतीय पुत्र **विश्वनाथदेव** वेदशास्त्रसंपन्न विवेकी क्षमावंत अति चतुर जाणोन त्यांस आज्ञा केली कीं **अमलाश्रमीं ढुंढिराजदेवा** जवळ राहोन अनेक ध्यानें-वस्त्रें-पदार्थां चा संग्रह करोन दास-दासी-अश्व-पशूं चा व सर्व कुटुंबा चा परामृष करोन ग्रामांतरीं जें जें साहित्य लागेल तें आणोन उत्साह पुण्यतिथि करोन अखंड गीतापठण करणें । सर्वां परीस लघु हीन दीन अनाथ बाळक **भगवान्** जाणोन श्रीगुरुनाथ परम दयाळू अष्टभावयुक्त सद्गदितकंठें **श्रीरत्नाकरस्वामी**नीं कनिष्ट बाळास हृदयीं अलंघोन वामांकी वेवोन करें मुख कुरवाळोन आज्ञा केली कीं वेदशास्त्रा चें गायना चें अध्ययन अध्यापन दक्षिणोत्तर यात्रा करोन तप करणें व **निरंजनचरित्रा** चें स्मरण करणें । त्या आज्ञे वरोन बाळपणीं **निरंजनचरित्रा** चें पुस्तक होतें गुरुआज्ञे वरोन त्याचें नित्य पठण होत असे मग **अकाबाई** चे समाप्तीस **नामल** ग्राम दग्ध जाहला तेव्हां तेथें पुस्तक दग्ध जाहलें तेव्हां च देवळांत गृह, बांधले मग वेद-शास्त्र-गायना चा अभ्यास गुरूनें कांहींएक करविल्यावर **अमळाश्रमीं** चार वर्षे गुरुराजें मूळमंत्रा चीं कांहीं पुरश्चरणें करविलीं मग **करहाटक**-क्षेत्रास आलियावर कांहीं दिवस वेद-शास्त्र-गायना चें अध्यापन गुरुराजें करविलें मग महागणपतितर्पण करावया ची आज्ञा जालीया वर आरंभा नंतर मातुश्री **रमाबाई** यानीं आज्ञा केली कीं **श्रीनिरंजनचरित्र** करणें मग पूर्वी **अकाबाई**नीं **श्रीरत्नाकर-गुरुदेवां**स जें **श्रीनिरंजनचरित्र** बाल्यत्वापासोन सांगितलें होतें तें गुरुराजें बाळकास सांगितलें होतें परंतु मातुश्री व बंधुत्रयास साष्टांग नमन करोन व कुळदेवता-इष्टदेवतांस व संत-सरस्वतीस नमोन पार्थिलें कीं कृष्णें वेणू वाजविला तैसें तुह्मास करणें असेल तरी करणें मज सामर्थ्य नाहीं हे ऐकोन सर्वांनीं मस्तकीं हस्तक ठेवोन अभय दिलें कीं श्रीगजानना ची च हे इछा आहे निज-

भक्ता चें चरित्र वाढवावें तुज हें काहीं नाहीं श्रीगजानन पूर्ण करील ऐसें अभय घेवोन मातुश्रीसंनिध **कऱ्हाड**-क्षेत्रीं श्रीगजानना जवळ ईश्वर-संवत्सरीं श्रावण शुद्ध चतुर्थीसं आरंभ अत्यंत प्रेमळ स्वकीय भक्त शमदमपरायण हा ग्रंथ लेहावयास अधिकारी **तुकोबा मोणकोबा किरवडेकर** जाणोन यास लेखना ची आज्ञा केली परंतु स्नान-संध्ये च्या विलंबा मुळें अवकाश अल्प यास्तव गोष्टीरूपें कथा सांगोन लेहिली परंतु बाळेभोळे सर्व भक्तजनास वाचावयास ग्रंथरूप वोविया असाव्या ह्मणोन स्वकीय भक्त **नारायणराम वारुणा**तीरीं चरण-निवासी गुरु-देव-संत-ब्राह्मणां चे ठाई नैष्ठिक शमदमादिसाधनसंपन्न भक्तिवैराग्ययुक्त काव्यकरणीं अति चतुर जाणोन त्यास आज्ञा केली कीं वोवियारूप **श्रीगुरुनिरंजन**प्रसादें ग्रंथ करणें ॥

श्रीबुद्धिकांता चें अवतारचरित्र बुद्धिकांतें बुध्धीस प्रेरणा करोन गोष्टीरूप ज्या कथा बोलविल्या त्यांत न्यूनाधिक देवा चे अवतार भक्त संत सज्जन करितील **श्रीगुरुनिरंजना** चे गुण देवास हि वर्णवे ना तेथें मनुष्यास काय सामर्थ्य ज्या भक्तास **श्रीगुरुनिरंजना** चे गुणचरित्र जें श्रुत असेल तें सुखरूप या ग्रंथीं लेहोन स्थापावें **श्रीरत्नाकरदेवा**नीं या चरित्रा ची फळश्रुत जे सांगितली होती ते ऐकावी । एकवार हें **निरंजनचरित्र** पठण केलिया दशगोदान घडे । द्विवारें स्मार्त घडे । त्रिवारें **गोदावरी**स्नान घडे । चतुर्वारें चार मोक्ष घडती । पंचवारें पंचभूतविरहितता जाये । दशवारें **भागीरथी**स्नान घडे । विंशतिवारें त्रिस्थळीयात्रा घडे । तीस वेळे पढतां **रामेश्वरास** गंगास्नानाभिषेक पुण्य घडे । चत्वारिंशतिवारें अग्नहोत्र घडे । पंनासवारें चातुर्मास्य घडे। साठीवारें पशुयज्ञ घडे । सत्तरवारें सोमयाग । ऐंशीवारें वाजपीय । नवदवारें अश्वमेध । शतवारें सर्वतीर्थयात्रा घडे । येक दिनीं पठण केलिया कथालाभ होय । द्वि दिनें धान्यलाभ । सप्तकें धनलाभ । दोन सप्तकें मित्रलाभ । पांच सप्तकें वृत्तिलाभ । आठ सप्तकें कारागृह-मुक्ति । ९ सप्तकें शत्रु वश होय । १० सप्तकें राजा वश होय ।

अकरा सप्तकें सर्व जन वश होय। प्रतिदिनीं एकत्रारें रोगनाशन। द्विवारें कलहनाशन। त्रिवारें भूतप्रेतपिशाचनाशन। रात्रौं कटुतैलादीपा-संनिध येक मंडळ येकवार पढतां ब्रह्मराक्षस प्रत्यक्ष अथवा स्वप्नीं इछित सांगे। तुलसीछायेस बैसोन जपतां ज्ञान होय। शमीछाये खालते लक्ष्मी वाढे। मंदारछाये खालते पुत्रलाभ होय। बिल्वछाये खाले दूर गेलिया चें आकर्षण होय। निंबछाये खाले स्वकीयस्त्री वश होय। चंपकछाये खाले स्वकीयपुरुष वश होय। अश्वत्थछाये खाले संतति वाढे। गायी च्या गोठियांत पढतां पशुवृध्दि होय। समुद्रग्रामीं नदीतीरीं पढतां मोक्ष होय। शिवालयीं शिव प्रत्यक्ष होय। विष्णु-स्थानीं विष्णु प्रत्यक्ष होय। नवग्रहप्रतिमासंनिध ग्रहपीडा नाशे। हनुमंतसमीप मंडळपर पढतां सर्व रोग नाशे। निरंतर पढतां सर्वकाम पूर्ण होय। ऐसें हें **श्रीनिरंजनचरित्र** परमरहस्य देवांस दुर्लभ पाषांडी-नास्तिक-अभक्तांस न देणें न दाखवणें। सशयात्मक पठण केलिया काम्यफळा चा संशय होईल। भावें भक्तीनें पठण केलिया सिद्धि होईल। **अमळाश्रमीं** एक वर्ष समाधी जवळ जो पठण करील त्यास **श्रीनिरंजन** प्रत्यक्ष होऊन मनोरथ पूर्ण करील हें अनुष्ठान प्रातःस्नान करोन शुचिष्मंत नित्यकर्म करोन मंत्रपुरश्चरणा सारिखें करावें काम्य अनुष्ठानें कामना विधि सारखी करावी या चरित्रपठणीं ज्यास अत्यंत आवड तो श्रीगजाननास प्राणा परीस आवडेल। गणेशसंनिध जो पढेल त्यास इहलोकीं सर्व कामना पूर्ण करोन परलोकीं सरूपता देईल। हें चरित्रअमृत दैवीसंपत्तिवंत शेवीतील। आसुरी-राक्षसी-राजस-तामस-प्रकृतिवंतांस प्रिय होणार नाहीं। जो या चरित्रा अवमानील त्याचा गृहभंग होईल। जो गुणवर्णन लटिकें ह्मणेल तो निरयास जाईल। हा ग्रंथ परमपावन परमपवित्र सर्वपापनाशक कलयुगीन मूढांस तारक या सारिखा दुसरा उपाय नाहीं हें सत्य सत्य सत्य। **निरंजन**रूपें गजानन। **रत्नाकर**रूपें आपण। अवतरोन भगवद्भजन।

करी वर्णन तो चि तो ॥ जव **निरंजन**। तेणें चि नाना क्रीडा करोन। स्वयें चि केलें कवन। ग्रंथ पूर्ण पूर्णत्वें ॥ शके ( १६८३ ) वृशा संवत्सर उत्तरायण ग्रीष्मरितौ ज्येष्ट शुद्ध एकादशी मंदवारीं चतुर्थ प्रहरीं ग्रंथ संपला ॥

मग बंधुत्रय मातुश्री व सकळ संतमंडळी पुढें हा ग्रंथ ठेविला त्यानीं वाचोन पाहतां च अष्टभावयुक्त प्रेमें आलिंगोन पाठ कृपाकरें थापटोन सर्व सुखाचें स्थान हा ग्रंथ **श्रीनिरंजन** तुझ्या मुखें वदविला तूं धन्य तुझे सकळ मनोरथ पूर्ण होऊन ब्रह्मरूप होसील ह्मणोन मस्तकीं हस्तक ठेवितां च साष्टांग नमोन कर जोडून भावें सद्गदित स्वें विनंति केली जे या ग्रंथीं न्यूनाधिक पूर्ण करणें व साधकास फळश्रुती प्रमाणें फळ द्यावें व ग्रंथ ज्या गृहीं भावें प्रतिदिनी पूजोन वाचतील त्यांचे गृहीं लक्ष्मी-पुत्र-पशु-दाशी-दास-वस्त्र-धन-धान्य-वृधि व्हावी व चोर-सर्प-व्याघ्र-अग्नि-शत्रू-राज-अपमृत्यू-अवलक्ष्मी-ब्रह्मराक्षस-चेटक-भूत-प्रेत-यक्षादिका चें भय न व्हावें। हें ऐकोन महातपस्वी देवब्राह्मण संतसज्जन कृपाकटाक्षें बोलिले कीं त्रिवार दिलें तूं मागतोस तैसे च होयील हें सत्य सत्य सत्य। प्रल्हादवचना स्तव देव प्रगटला भक्ता चें वचन देवास आपल्या वाक्या परीस प्रमाण करावें लागतें ह्मणोन भीष्मा ची प्रतिज्ञा सत्य करविली तैसें या ग्रंथी फळश्रुती सत्य होयील ह्मणोन भक्तानीं स्ववचनें आशिर्वाद दिला तो सत्य च होईल येथें संशय नाहीं ऐसा निश्चय मनीं दृढ धरोन देव-ब्राह्मण संत-सज्जन यांच्या दासा चा दास निज स्वात्मनि धरोन स्वस्वरूपीं धन्य **भगवान पाठक** ग्रंथकार नितरां केला ॥



